श्रीशंकर.

'आर्यभिषक्' पुस्तकावलि, अनुक्रमांक २५.



# औषधी-गुणदोष.

निघंटशिरोमणि-गुणदोष-प्रकरण.

'सार्थ श्रीचरकसंहिता' मासिक पुस्तकातून छापलेलें.

शंकर दाजी शास्त्री पदे,

चिकित्सक, संपादक-आर्यभिषक्.



मुंबई 'श्री गोवर्धन मुद्रालयां' त छापविलें.

शके १८२०-सन १८९९.

किंमत १॥ रुपया.





## अर्पणपत्रिका.

श्रीमंत राजश्री परशुराम श्रीनिवासराव

ऊर्फ

दादासाहेब प्रतिनिधि,

संस्थान औंध

यांस

हे पुस्तक.

त्यांची विद्याभिरुचि, धर्मनिष्ठा व आर्यवैद्यका-
वरील प्रीति इत्यादि सद्गुणांस अनुसरून,
त्यांच्या परवानगीनें
सप्रेमादरविनयपुरःसर अर्पण करीत आहे.



# प्रस्तावना.

रोगांवर औषधांचा उपयोग करण्यास, औषधांच्या गुणदोषांचें जितकें बारीक ज्ञान होईल तितकें जरूर पाहिजे आहे. खात्रीनें गुण येणें हें त्या ज्ञानावर अवलंबून आहे. आर्यवैद्यकांत यासंबंधीं जी स्वतंत्र ग्रंथरचना आहे तीस 'निघंट' असें पारिभाषिक नांव आहे. त्यांपैकीं नामांकित अशा सहा सात निघंटांचा शोध पाहून, त्या सर्वांतील निवडक व विशेष तेवढा भाग घेऊन, **निघंटशिरोमणि** नांवाचा ग्रंथ, एका अर्वाचीन विद्वानानें संस्कृतांत तयार केलेला आह्मांस मिळाला; तो स्वतंत्र छापण्याची व्यवस्था करून, त्यापैकीं गुणदोषाचें प्रकरण, मराठी भाषांतर रूपानें या पुस्तकांत दिलें आहे. असा ग्रंथ आजपर्यंत मुळींच छापलेला नाहीं. अर्थात् या ग्रंथानें, या विद्येचें एक मोठेंच कार्य केलें आहे यांत संशय नाहीं!

आमचे परमपूज्य हितचिंतक **श्री० रा० परशुराम श्रीनिवासराव** ऊर्फ **दादासाहेब प्रतिनिधि**, संस्थान औंध यांनीं, आमच्या उद्योगास उत्तेजन यावें ह्मणून जी उदार व अनुकरणीय शालीनता प्रकट केली आहे, त्यांबद्दल आह्मीं त्यांचे फार फार आभारी आहों. आणि अशाच प्रकारें चहूंकडून चार प्रकारची मदत होईल तर आयुर्वेदोद्धाराचें काम चांगल्या प्रकारें तडीस जाण्यास हरकत पडणार नाहीं अशी खात्री आहे. परमेश्वर, आमच्या सर्व प्रकारच्या आश्रयदात्यांस, सौख्य व सद्वासना चिरकाल देऊन, या कार्यांत आह्मांस सफळ करवो इतकीच त्यापाशीं अनन्य भावानें प्रार्थना आहे.

# वर्णवार अनुक्रमणिका.

---

## या पुस्तकांत संक्षेपांत दिलेल्या खुणांचा खुलासा.

रा. नि. (राजनिघंट). ध. नि. (धन्वंतरिनिघंट). के. नि (केयदेवनिघंट) ग. नि. (गणनिघंट). द्र. र. (द्रव्यरत्नाकरनिघंट). म. नि. (मदननपालनिघंट).

---

श्रीशंकर.

# औषधी-गुणदोष.

( निघंटशिरोमणि-गुणदोष-प्रकरण. )

## १. गुडूच्यादि वर्ग.

१. गुडूची ( गुळवेल. )—किंचित् उष्णवीर्य, तुरट, कडू; आणि तृषा, ज्वर, उलटी, भ्रम, पांडुरोग, प्रमेह, वातरक्त ( रक्तपिती ), दाह यांचा नाश करणारी व रसायनी* आहे.-रा. नि. रक्तमूळव्याध, कोड, कृमी, त्रिदोष यांचा नाश करणारी, ग्राही ( गाठाळणें, जमविणें—अर्थात् मलाला जमविणारी ), मेध्य ( स्मरणशक्तीस हितकर ), आयुष्यकर; आणि कफवात, कंडू, पित्त यांचा नाश करणारी व बलकर आहे.-ध. नि. पाककालीं मधुर, हृद्य ( हृदयाला हितकर ), अग्निवर्धक ( अर्थात् दीपन ); आणि खोकला, कामीण ( कावीळ), आमदोष, ज्वर यांचा नाश करणारी आहे.-के. नि. दोषज्वराचा नाश करणारी व दीपन आहे.-द्र. र.

२. कंद-गुडूची. ( कंद-गुळवेल. ) कडू, उष्ण; आणि विष, भूतज्वर, वलीपलित ( अंगावरील सुरकुत्या ) यांचा नाश करणारी आहे-रा. नि.

---

*अशक्तपणा, रोग इत्यादिकांना दूर करून, ओज रक्षण करणारें, अर्थात् आयुष्याचें रक्षण करणारें तें रसायन. तो गुण गुळवेलींत आहे; म्हणून हीस 'रसायनी' असें म्हटलें आहे.

३. मूर्वा. ( मोरवेल. )-कडु, उष्ण, तुरट; आणि वांति, कोड, कफवात, प्रमेह, विषमज्वर यांचा नाश करणारी आहे.—रा. नि. रसकालीं (किंचित् ) मधुर, कंडूचा नाश करणारी, पचण्यास जड, अग्निप्रदीपक; आणि त्रिदोष, कोड, मद, मुखशोष, सामान्य ज्वर, तृष्णा ( तहानेचा रोग ), हृद्रोग, रक्तपित्त यांचा नाश करणारी आहे.—ध. नि कफपित्तास शमविणारी आहे.-द्र. र. तोंडातून रक्त पडण्याचा प्रतिबंध करणारी आहे.—ग. नि.

४. पटोल. ( कडू पडवळ.)—रसकालीं कडू व उष्ण, पाककालीं तिखट; आणि बलास (पडसें), कफपित्त, कंडू, कोड, रक्तज्वर, दाह यांचा नाश करणारें आहे.-रा. नि. याचें पान.-पित्त, कफ व रक्तदोष यांचा नाश करतें; फल-त्रिदोषांचाही नाश करतें, व वेल-कफाचा नाश करते.-ध.नि. वेल शीतकर आहे. इच्या बियांतील तेल-कफाचा व ऐंशी प्रकारच्या वातरोगांचा नाश करणारें आहे.-द्र. र इचें फल.-त्वचेसंबंधीं दोषाचें शामक आहे.- ग. नि.

५. काकोली.-शीत, रसकालीं मधुर, वीर्यवर्धक; आणि क्षय, पित्त, वायु, रक्तदाह, ज्वरदाह व कफ यांचा नाश करते.-रा. नि वृष्य, जड व तृप्तिकारक; आणि वातपित्त व त्रिदोष यांचा नाश करणारी आहे.-के. नि. रक्तपित्त, व हृद्रोगाला शमविणारी आहे.-द्र र. वात व तृषेचा नाश करते.—म. नि. वात, दाह, रक्तपित्त. शोष यांचा नाश करते.—भा. प्र.

६. क्षीरकाकोली.—हृद्रोगाचा नाश करणारी आहे.- द्र. र.

७. अरण्यमुद्ग. ( रानमूग )— शीत; आणि खोकला, ज्वर, वातरक्त यांचा नाश करणारी आहे.-रा नि. मधुर; व कृमी आणि कफाचा नाश करणारी आहे.-ध. नि. हलकी; त्रिदोषांचाही नाश करणारी, आणि संग्रहणी, मुळव्याधि, अतिसार यांची नाशक आहे.-के. नि. कृमीसंबंधी येणाऱ्या ज्वराची नाशक आहे.-द्र. र. रुक्ष आहे.—भा. प्र. कफपित्ताची नाशक व रक्तस्तंभक आहे.-ग. नि.

८. जीवंती. ( हरणदोडी. )—मधुर, शीत, कफकर, वीर्यवर्धक; आणि रक्तपित्त, वातरक्त, दाह, ज्वर, यांचा नाश करणारी आहे.—रा. नि. नेत्राला हितकर व त्रिदोषनाशक आहे.—ध. नि. स्निग्ध, ग्राही व बलकर आहे.—के. नि.

९. बृहत्पर्णा. ( थोर हरणवेल. )—वीर्यवर्द्धक, रसायनी व पिशाचबाधेचा नाश करणारी आहे.—रा. नि.

१०. हेमजीवंती. ( पिवळी हरणवेल. )—वृष्य, बलकर, नेत्राला हितकर, मधुर, शीत; आणि वात, रक्तपित्त, दाह यांचा नाश करणारी आहे.—रा. नि.

११. लिंगिनी. ( शिवलिंगी. )—तिखट, उष्ण, दुर्गंधी, रसायनी, सर्वसिद्धि करणारी व देवांना प्रिय आहे.—रा. नि. रसाचें नियमन ( व्यवस्थित ) करणारी, पित्तल; आणि क्षय, कफ, कोड यांचा नाश करणारी आहे.—द्र. र.

१२. कोशातकी. ( कडू दोडकी. ) शीत, कडू, तिखट, कषाय—( तुरट )-संबंधी योजनेंत प्रसिद्ध, पित्त-वात-कफांचा नाश करणारी; आणि मल व आध्मान ( पोटफुगी ) यांचें शोधन करणारी आहे.—रा. नि. आमाशय व पक्वाशयाचें शोधन करणारी, कडू, रूक्ष, पचनास हलकी, पाककाळीं तिखट; आणि विष, उदररोग, खोकला, पांडुरोग, सूज, कफ, पाणथरी, गुल्म, कावीळ, कोड यांचा नाश करणारी आहे. हिचें फळ.—पाककाळीं शीत आहे.—के. नि. फल-भेदक, शीत, पचनास हलकें; आणि त्रिदोष व प्रमेह यांचें नाशक आहे.—म. नि.

१३. स्वयंगुप्ता. ( खाजकुहिरी )—हिचें बीज-वाताचें शमन करणारें, वीर्य व बलवर्धक ( वाजीकरण ) आहे.—म. नि. जड, कडवट; वात व कफ-नाशक; आणि बलकर आहे.—भा. प्र. अतिशय थंड आहे.—ग. नि.

१४. कटुतुंबी ( कडू भोपळा. )—तीक्ष्ण, वांतिकारक, पाककाळीं तिखट; कफ-वाताचें शोधन करणारी; आणि श्वास, व्रण, शूल, सूज,

विष यांची नाशक आहे.-रा. नि. रसकालीं व पाककालीं शीत व लघु ( हलकी ) आहे.-ग. नि. पाककाळीं तिखट, हृदयाला शीत; आणि वातपित्त, श्वास, ज्वर यांची नाशक आहे.-के. नि. हृद्य व वात-पित्त-ज्वरांची नाशक आहे.-भा. प्र.

१५. **अमरवल्ली.** ( **अमरवेल.** )—( पाककालीं ) तिखट, मधुर, वृष्य, रसायनी, बलकर, देवांनाही प्रिय; आणि पित्ताचा नाश करणारी आहे.-रा. नि. ग्राही, कडवट, पिच्छिल ( पाककालीं बुळबुळीत रस होणारी?), तुरट; आणि नेत्ररोगांचा नाश करणारी आहे.-भा. प्र.

१६. **देवदाली.** ( कांटे इंद्रावण, घुले इंद्रावण, देवडंगरी. )-कडू, ऊष्ण, तिखट; आणि पांडुरोग, कफ, मूळव्याधी, श्वास, खोकला, कावीळ, पिशाचव्याधी यांचा नाश करणारी आहे.-रा. नि. इचें फल-कृमी, कफ, गुल्म, शूल, वात यांचें नाशक आहे.-भा. प्र. वांति, उंदीराचें विष, कफ, पांडुरोग यांचा नाश करणारी आहे.—ध. नि. रस-काळीं व पाककाळीं कडू, तीक्ष्ण; आणि आमवात, कफसंबंधी सूज, खोकला, ज्वर, हिध्मा, अरुचि, क्षय यांचा नाश करणारी आहे.-के. नि.

१७. **वंध्याकर्कोटकी.** ( **बांझकर्टोली.**)—कडू, तिखट, ऊष्ण; आणि कफ, स्थावरादि विषें यांचा नाश करणारी आहे.-रा. नि. पाक-कालीं तिखट व उष्णवीर्य आहे.--ग. नि. स्थावर-जंगमविषें, मस्तक-रोग, ( ? ) योनिकंद यांची नाशक आहे.-ध. नि. हलकी, व्रणशोधक; आणि पडसें, विष, विसर्प यांचा नाश करणारी आहे.—के. नि.

१८. **तिक्ततुंडी.** ( **कडू तोंडली.** )—रसकालीं तिखट ( व कडू ), रेचक; आणि कफ, वांति, विष, रक्तपित्त, अरुचि यांचा नाश करते.-रा. नि.

१९. **आखुकर्णी.** ( **उंदीरकानी.** )— ( विपाकीं ) तिखट,ऊष्ण, पाचक, मारक; आणि कफपित्त, आनाह, ज्वर, शूल यांचा नाश कर-णारी आहे.-रा. नि. हृद्रोग, कफ व जंतु यांची नाशक आहे.-ध.नि.

विपाककाळीं तिखट, व मुत्र—रोगाची नाशक आहे.—के. नि. हलकी, शीत, अतिशय कडु ( रसकाळीं ? ) व तुरट आहे.—भा प्र.

२०. ऐंद्री. ( लघु इंद्रावण. )—कडु, तिखट, शीत, रेचक; आणि गुल्म, पित्तोदर, कफज कृमी, कोड, ज्वर यांचा नाश करिते.—रा. नि. प्रमेह, अरुचि, कृमि, कफ, पांडुरोग, मूढगर्भ, सर्वांगावरील गांठी, विषापासून उद्भवलेल्या गांठी यांचा नाश करिते.—के. नि. मूढगर्भ व व्रण यांची नाशक आहे.—ध. नि.

२१. महत्फला. ( थोर इंद्रावण. )—वरील गुणांचीच हीहि आहे. तीहून रस, वीर्य व विपाक यांच्यांत इचे गुण थोडे जास्त आहेत.

२२. शांखिनी. ( शंखवेल )—कडु, आंबट, दीपन, रुचिकर, रेचक; आणि कृमी, कोड, विष, आम, त्रिदोष यांचा नाश करते.—रा. नि. रसकाळीं व पाककाळीं मधुर; आणि उदर व आनाह यांची नाशक आहे.—ग. नि.

२३. ईश्वरी. ( रुद्रजटा. )—रसकाळीं तिखट; आणि श्वास व खोकला यांची नाशक आहे.—रा. नि. हृद्रोग, पिशाच्च व राक्षस यांची नाशक आहे.—के. नि.

२४. ज्योतिष्मती. ( मालकांगोणी )—रसकाळीं कडु व थोडी तिखट, दाह करणारी, बुद्धि व धारणाशक्ति ( मेधा ) वाढविणारी, दीपन; आणि वात—कफांचा नाश करते.—रा. नि. तुरट ( पाककाळीं ? ), मोहकर, स्निग्ध, वर्णकर; आणि व्रण, पांडुरोग, विसर्प यांचा नाश करणारी आहे.—के. नि. पाचक, तिखट, सारक, अति उष्ण, वमन (उलटी) करणारी, तीक्ष्ण, अग्निवर्द्धक; आणि कफवाताची नाशक आहे.—ध. नि. आमवाताची नाशक आहे—म. नि. मुखरोगाची नाशक आहे.—भा. प्र. कंठरोग व उचकी यांची नाशक आहे.—ग. नि.

२५. तेजोवती. (थोर मालकांगोणी.)—सदर्हूहून थोड्या जास्त गुणाची आहे.

२६. श्वेत-गिरिकर्णी. (पांढरी गोकर्णी)-शीत, कडू, नेत्राला हितकर; आणि पित्त, विष व त्रिदोषांचेंही शमन करणारी आहे.-रा. नि. संग्रहणी, कंठरोग, शूळ, कोड, प्रमेह, आम, व्रण, सूज यांची नाशक आहे.-द्र. र. ग्रहसंबंधी दोषांची नाशक आहे.-म. नि. शीतवीर्य, सदैव स्निग्ध; आणि कंठरोग, वातपित्त यांची नाशक आहे.-अ. को.

२७. महानीला ( निळी सपली )-कडू, शीत; आणि उन्माद, मद, रक्तातिसार, ज्वर, दाह, श्वास, खोकला, ओकारी यांची नाशक आहे.-रा. नि. कफ, कोड, क्षय, पित्तज जंतु, ग्रहदोष, कंठरोग यांची नाशक आहे.-म. नि. स्निग्ध, शीतवीर्य; आणि वातपित्ताचा नाश करणारी आहे.-ग. नि.

२८. क्षीरमोरटा. ( मोरवेल. )-याला चीक फार असतो; मधुर, किंचित् तुरट, वृष्य, वेलीला वाढविणारा, बलकर; आणि पित्त, दाह, ज्वर यांचा नाश करितो.-रा. नि. रसकाळीं व पाककाळीं शीत; आणि कफपित्त, तृषा, दाह, ज्वर यांची नाशक आहे.-ध. नि. मळाचा अवष्टंभ करणारी, वातकर व रूक्ष आहे.—के. नि. जड; आणि रक्तपित्त, मेद (?), प्रमेह, तृषा, हृद्रोग, कंडू, कोड यांचा नाश करणारी आहे.-म. नि.

२९. इंदीवरा. ( उतरणी. ) तिखट, शीत, नेत्राला हितकर; आणि पित्तकफ, खोकला, व्रण, कृमी यांची नाशक आहे.—रा. नि. व्रणरोपण; आणि पाप, योनिदोष, वात यांची नाशक आहे.—ग. नि. व्रणाचें शोधन करणारी; मूत्रकृच्छ्र, इसब, आणि गर्भ व योनी यांसंबंधी वाताची पीडा यांचा नाश करणारी आहे.—के. नि. कफवात व सूज यांची नाशक आहे.-द्र. र.

३०. बस्तांत्री. ( बोकडी. )—रसकाळीं तिखट, चांगल्या बीजाचा गर्भ सुखानें उत्पन्न करणारी, गर्भाचें बीज उत्पादन करणारी; आणि

खोकला व त्रिदोष यांची नाशक आहे.-रा. नि. लघु, कडू, मधुर, तुरट, शीत; पाककाळीं तिखट*, वाताला कोपविणारी व कफपित्ता-ची नाशक आहे.-के. नि.

३१. **सोमवल्ली.** ( **रानशेर.** )—तिखट, मधुर, शीत; आणि पित्त, दाह, तृष्णा, उपविष यांचा नाश करणारी आहे.

३२. **प्रतिसोमा, महिषवल्ली.** ( **रानशेर-भेद** )-ही रस, वीर्य व विपाकांत सोमवल्लीप्रमाणें असून, सप्त धातूंना समप्रमाणांत करणारी आहे.- **नि. शि.**

३३. **वत्सादनी.** ( **वासनवेल.** )-मधुर, वृष्य, रुचिकर, तृप्ति दे-णारी; आणि पित्त, दाह, रक्तपित्त, विषदोष यांचा नाश करणारी आहे.- **रा. नि.** ऊष्ण, ग्राही, वृष्य; आणि सूज, कफ, मूळव्याधी, वायु यांची नाशक आहे.-**द्र. र.**

३४. **गोपालकर्कटी.** ( **गोपालकांकडी** )-शीतवीर्य, मधुर; आणि पित्त, मूत्रकृच्छ्र, मूतखडा, प्रमेह, शोप यांची नाशक आहे.-**रा. नि.**

३५. **काकनासा.** ( **थोर कावळी** ) -मधुर, शीत, रसायन, स्नायूंना दृढता आणणारी; आणि पित्त व वलीपलित यांची नाशक आहे.-**रा. नि.**

३६. **काकादनी.** ( **तांबडी कावळी** )-तिखट, ऊष्ण, कडू, रसायन, रुचिकर, वलीपलित न होऊं देणारी, आणि वातदोषांची नाशक आहे.-**रा. नि.** केशांना हितकर; आणि मस्तकदोष व ग्रहदोषांची नाशक आहे.-**द्र. र.** तुरट, रस आणि पाककाळीं तिखट; वांति करणारी; आणि कफ, सूज, गुळव्याधी, चित्रविचित्र रीतीनें उमटणारा कोड यांची ना-शक आहे.-**के. नि.**

* राजनिघंट व कैयदेव निघंट यांत 'तिखटपणा' विषयीं भेद दिसतो. पण त्याव-रून, रस व पाक या दोन्ही काळीं ती 'तिखट' आहे असें समजण्यास हरकत नाहीं. कडू, तुरट, मधुर हे रसही थोड्या प्रमाणांत असतात.

३७. **रक्तगुंजा. ( तांबडी गुंज. )**—तीक्ष्ण, उष्ण; तिचें **बीं**—वांति करणारें; **पान**—विष व शूल ( पोटदुखी ) यांचें नाशक आहे.-**रा. नि.** वातपित्त, ज्वर, मुखशोष, श्रम, श्वास, तृष्णा, मद, रक्तार्बुद यांची नाशक आहे.—**भा. प्र.** रसकालीं कडू, तुरट, रूक्ष, नेत्रांना व केशांना हितकर, वीर्यवर्द्धक, बलकर; आणि इंद्रलुप्त ( टक्कल ), मद, मोह आणि राक्षस व ग्रहसंबंधीं दोष, विष, कंडू, कोड, कृमि, व्रण यांची नाशक आहे.—**के. नि.**

३८. **श्वेत गुंजा. ( पांढरी गुंज. )**- तांबड्या गुंजेप्रमाणेंच गुणांनीं असून, वश्य-कर्मांत उपयोगीं आहे.-**रा. नि.**

३९. **वृद्धदारु. ( वरधारा. )**- चिकट, बलकर; आणि कफ, वात, खोकला, आमदोष यांची नाशक आहे.-**रा. नि.** रसायन; वीर्य, बुद्धि, मेधा, बल, अग्नि यांची वृद्धि करणारी; स्वर व कांति यांना उपयोगी; सारक; आणि सूज, आमवात, वातप्रमेह, कफ यांचा नाश करणारी आहे.-**के. नि.** दोन्ही वृद्धदारु* हे कडू, उष्ण, तिखट; आणि सूज, कृमि, मेद, वातोदर यांचा नाश करणारे आहेत.-**ध. नि.** रक्तमुळव्याधीचा नाशक आहे.-**म. नि.**

४०. **†ताम्रवल्ली.**—लघु, वृष्य, तुरट; आणि कफ, अग्निमांद्य, श्वास, खोकला यांची नाशक आहे.-**रा. नि.**

---

* वृद्धदारूंत दोन भेद आहेत, एकाचें नांव ' वृद्धदारू ' व दुसऱ्याचें ' जीर्णफंजी ' असें आहे. यास मराठींत अनुक्रमें " वरधारा, म्हातारीचा वेल, सांबवेल " आणि " फांज, फांजी, फांद " अशीं नांवें आहेत.

† ताम्रवल्लीलाच ' कैवर्तिका ' असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलेंच निघंटशिरोमणींत गृहीत केलें आहे. कांहीं ठिकाणीं या दोन निराळ्या मानल्या आहेत. तथापि गुणांनीं सारख्या आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. माळव्यांत " कैवर्तिका " असें व चित्रकूट-प्रदेशांत " ताम्रवल्ली " अशीं या एकाच वनस्पतीला निराळीं नांवें असतील असाही संभव वाटतो. कदाचित् त्यामुळें असा मतभेद झाला असेल, अथवा एकाच वनस्पतींत दोन प्रकार असतील.

४१. कांडीर. ( कांडवेल. )-तिखट, कडू, उष्ण, सारक, अग्नि-दीपक; आणि व्रण, गुल्म, उदर, प्लीह, शूल, लूताविष[1] यांचा नाशक आहे.-रा. नि. वात व शूल यांचा नाशक आहे.-द्र. र. कफपित्त, कृमी, कोड यांची नाशक आहे.-ग. नि.

४२. जंतुघ्ना. (जंतुका, पापडी, रंगबाशा.)—शीत, कडू, रुचि उत्पन्न करणारी, दीपन; आणि रक्तपित्त, कफ, दाह, तृष्णा, विष यांचा नाश करणारी आहे.-रा. नि. तुरट, वर्णकर; आणि कंडू, कोड, व्रण, पित्त, कफ यांची नाशक आहे.-के. नि.

४३. आम्लपर्णी. (कडमड वेल.)—तीक्ष्ण, आंबट, रुचिकर, दीपन; आणि गुल्म, कफरोग, पाणथरी, शूल, वायु यांची नाशक आहे.-रा. नि.

४४ शंखपुष्पी. ( शंखाहुली. )—शीत, कडू, मेधा व स्वर (आवाज ) यांना हितकर, वशीकरणांत सिद्धिकर; आणि ग्रह, भूत वगैरे संबंधी दोष यांची नाशक आहे.-रा. नि. आयुष्यास रक्षक, तुरट; बळ, अग्नि आणि कांति यांची वृद्धि करणारी; आणि मानसिक व्याधि

१-त्रिमंडला, श्वेता, कपिला, पीतिका, अला, मूत्रविषा, रक्ता, कथना, सौवर्णिका, नालवर्णा, लासिनी, एणपदी, कृष्णा, स्निग्धमुखी, कांता आणि नतागुणी असे साधारणपणें सोळा प्रकारचे विषकारक जंतु आहेत, त्यांस 'लूता' ह्मणतात. यांचा दंश फार तीव्र असतो. त्यामुळें दंशस्थानीं दुर्गंधी उत्पन्न होते, रक्त वहातें, ताप, दाह, अतिसार, त्रिदोषजन्यरोग, अंगावर अनेक प्रकारच्या फुटकुळ्या, चकत्या, सूज, इत्यादि उत्पन्न होतात. आणि त्या मृदु, काळसर तांबूस आणि सरणाऱ्या ( जागा सोडणाऱ्या ) अशा असतात. पहिल्या आठ ( त्रिमंडलापासून कथनापर्यंत ), यांच्या दंशांच्या आंतील भाग काळसर, धुरकट व छिद्रयुक्त असून दंशस्थान, वारुळासारखें किंचित् उर्ध्वगतिक असतें. सौवर्णिकापासून पुढील आठ अतिशय वाईट आहेत. त्यांच्या दंशावर पांढरी सूज असते; अंगावर पांढऱ्या, तांबड्या, पिवळ्या अशा पुटकुळ्या येतात; आणि ताप, अत्यंत दाह, श्वास, उचकी, मस्तक-स्तंभ इत्यादि लक्षणें होतात. या 'लूता' असाध्य मानल्या आहेत. एकंदर लूतांचें विष, कदाचित् विषमारक औषधांनीं त्या वेळीं शमलें तरी पुन्हा अहित सेवनानें उत्पन्न होऊं शकतें. मुंग्यांनाही 'लूता' असें कोणी ह्मणतात. पण सर्वसाधारण मुंग्यांना हें नांव नसून, ज्या मुंग्या तीव्र विषारी असतात त्यांनाच हे नांव देतां येईल.

( पीडा ), कोड यांची नाशक आहे.-भा. प्र. रसकाळीं तिखट, उष्ण, रसायन; आणि विष, पित्त, पडसें, अपस्मार यांची नाशक आहे.-ध. नि. प्रमेह, कृमी, व्रण यांची नाशक आहे.- ग. नि.

४५. आवर्तकी. ( तगरवल्ली, आहुळी. )-तुरट, आंबट, शीत; आणि पित्तनाशक आहे.-रा. नि. वृष्य; आणि कोड, उर्ध्व दोष (कंठापासून वर होणारे विकार ), अधोदोष ( बस्तिसंबंधीं विकार ), त्रिदोष, अतिसार यांचें शमन करणारी आहे.-ध. नि.

४६. कर्णस्फोटा. ( कानफोडा, कपाळफोडी. )-तिखट, कडु, शीत; आणि विष, ग्रह, भूत यांची नाशक आहे.-रा. नि.

४७. कट्वी. ( कुटकी. )- ( पाककाळीं ) तिखट. शीत, रुचिकर; आणि सर्व ज्वर, क्षय यांची नाशक आहे.- रा. नि.

४८. अमृतश्रवा. (अमृतवल्ली.)-किंचित् कडु, रसायन; आणि कामीण ( कावीळ ), सूज, विष, कोड यांची नाशक आहे.-रा नि.

४९. पुत्रदात्री. ( पुत्रदाई )-तिखट, उष्ण, संतोषकारक; आणि कफ व वंध्यत्वदोषाची नाशक आहे.-रा नि

५०. पलाशी. ( पळशी )-मधुर, आंबट, पथ्यकर, पित्तवर्धक; आणि मुखदोष, अरोचक यांची नाशक आहे.-रा नि.

## २. शताव्हादि वर्ग.

५१. शताव्हा. ( बाळंतशोप. )-तिखट, ( पाककाळीं[१] ) कडू, स्निग्ध; आणि कफ, अतिसार, ज्वर, नेत्ररोग, व्रण, पाणथरी, बस्तिविकार यांची नाशक आहे.-रा. नि. उष्ण; आणि कफ, वात यांची नाशक आहे.-ध. नि. पित्तवृद्धिकर, मेधाकर, लघु, दीपन; आणि कफपित्त, शूल, दाह, वांति, तृष्णा, गुल्म, योनिरोग यांची नाशक आहे.-द्र. र.

५२. मिश्रेया. ( बडीशेप. )-मधुर, पाककाळीं तिखट, स्निग्ध; आणि कफ, वात-पित्त, पाणथरी, जंतु (कृमी) यांची नाशक आहे-

१. रसकाळीं किंचित् तिखटपणाही असतो असें समजावयाचें.

रा. नि. (किंचित्?) कडू, शीत, वृष्य, बलकर; आणि मूळव्याधि, क्षय, क्षत-(व्रणामुळें)-क्षीण, वात, रक्तपित्त यांची नाशक आहे.-ध. नि. रसकाळीं (किंचित्) तीक्ष्ण, लघु, अग्निदीपक, उष्ण, बलकर, रुक्ष, त्हदयास हितकर; आणि विष्टजन्य कृमी, * वीर्यदोष, वायु यांची नाशक आहे.-के. नि. योनिशूलाचा नाश करते.—द्र. र.

९३. **शालिपर्णी.** (**रानगांजा**)-रसकाळीं कडू, जड, उष्ण; आणि वात, विषमज्वर; प्रमेह, मूळव्याधी, शोक, संताप यांची नाशक आहे. -**रा. नि.** विष, वांति यांची नाशक आहे.-**भा. प्र.** लघु, भेदक; आणि श्वास, पित्त-वात, तृषा, खोकला, दाह यांची नाशक आहे.-**ध. नि.** (पाककाळीं?) मधुर, वृष्य, तृप्ती देणारी, रसायन; आणि विष, श्वास, तिन्ही दोष, कृमी, प्रमेह, क्षत—(व्रणामुळें)-कास (खोकला), अतिसार यांची नाशक आहे.—**के. नि.**

९४. **समष्ठीला.** (काकुंबा, कोतुंबा, कडवणा.)-तिखट, उष्ण, रुचिकर, मुखशोधक, दाह करणारी, दीपन; आणि कफ-वाताची नाशक आहे.—**रा. नि.**

९५. **बृहती.** (डोरली)—तिखट, कडू, उष्ण; आणि वातज्वर, खोकला, श्वास, अरुचि, त्हद्रोग, आंव यांची नाशक आहे.—**रा. नि.** ग्राही व पाचन आहे.- **ध. नि.** त्हद्य, दीपन; आणि कोड, मुखसंबंधी मल, शूल यांची नाशक आहे.-**के. नि.** कफ-वाताचा नाश करते.-**द्र. र.**

---

* येथें 'वीर्य' शब्दानें 'वीर्यविकार' अर्थात् वीर्याचें अशुद्धत्व याचा नाश करणारी आहे असा अर्थ घेतला पाहिजे. कारण ही वृष्य, बलकर वगैरे असल्यामुळें वीर्यनाशक असूं शकणार नाहीं. शिवाय 'बाळंतशोप' संबंधी नि. शि. त 'बस्तिहृत' म्हटलें आहे. तेथें, बस्तिनाशक नसून, बस्तिरोगनाशक अशा अर्थानें 'बस्तिहृत्' या पदाची योजना केली आहे. ज्या मूळावरून 'बस्तिहृत्' असा संक्षेप केला आहे, त्या राजनिघंटाच्या मूळांत त्याविषयीं 'बस्तिकर्मणि शस्यते' असें आहे. अशाच रीतीनें संक्षेप करण्याचा प्रघात आहे म्हणून येथेंही 'वीर्य, शब्दावरून, वीर्यदोष यांचा नाश करणारी बडीशेप आहे असें समजणेंच युक्त दिसतें.

५६. **पीततंडुला.** ( **मोतरिंगणी.** )-कडू, तिखट, उष्ण; आणि बृहतीच्या गुणासारखी असून, इच्यांत पाण्याची धार × बंद करण्याची शक्ति आहे.—रा. नि.

५७. **श्वेतबृहती.** ( **पांढरी डोरली.** )—रुचिकर; अंजनानें अनेक प्रकारचे नेत्ररोग व वात--कफ यांची नाशक आहे.—रा. नि.

५८. **कंटकारी.** ( **रिंगणी.** )—तिखट, उष्ण, दीपन; आणि श्वास, खोकला, पीनस, कफ-वात, ज्वर यांची नाशक आहे.—ध नि. कडू, रूक्ष, भेदक, पाचक; आणि पार्श्वरोग ( फांसळ्यांतील रोग ), मूत्रकृच्छ्र, पीनस यांची नाशक आहे.-के. नि. इचें फळ.-भेदक, रुचिकर, हृद्य, कडू; पित्त व अग्नि वाढविणारें; आणि कफ, वायु, कंडू, खोकला, प्रमेह, कृमी, ज्वर यांचें नाशक आहे.-के. नि. इचें फळ.-भेदक, रुचिकर, हृद्य, कडू, पित्त व अग्नि यांना वर्द्धक; आणि कफ-वायु, कंडू, खोकला, प्रमेह, कृमी, ज्वर यांचें नाशक आहे.-के.नि. ही सारक आहे.- द्र. र. ग्राही; आणि मुखाची विसरता, कोड, शूल, अग्निमांद्य यांची नाशक आहे.- भा. प्र.

५९. **लक्ष्मणा.** ( **पांढरी रिंगणी.** )—रुचिकर, उष्ण, नेत्रांना हितकर, दीपन, रसाची नियामक ( प्रमाणांत आणणारी ); आणि कफ-वाताची नाशक आहे.-रा. नि. गर्भोत्पत्ति करणारी आहे.– द्र. र. पार्श्वभाग ( फांसळ्या ) यांचा शूळ घालविणारी व सारक आहे.– इचें फळ शुक्ररेचक[१] आहे.–भा. प्र.

६०. **पृष्टिपर्णी.** ( **पिठवण.** )--तिखट, उष्ण, आंबट, कडू; आणि खोकला, अतिसार, वातज्वर, व्रण, उन्माद, दाह यांची नाशक

---

×"युक्त्या द्रव्यविशेषेण धारा-संस्तंभसाद्विदा।" पात्रांतील पाणी, पालथें केलें असतांही न पडण्याचा चमत्कार, युक्ति आणि इतर पदार्थांचें मिश्रण या योगानें करून दाखवितां येतो असें राजनिघंटांत लिहिलें आहे.

१. भावप्रकाशांत "तयोः ( श्वेत-रक्तयोः ) फलं कटु रसे पाके च कटुकं भवेत्। **शुक्रस्य रेचनं** भेदि तिक्तं पित्ताग्निकृल्लघु॥" असे आहे. त्यावरून, 'शुक्राचें रेचन करणारी' असा अर्थ करू गेल्यास विसंगत दिसतो. तथापि 'शुक्राला स्रवविणारी' असें यावरून ह्मणण्यास हरकत नाहीं. उष्ण, भेदक वगैरे गुणही त्यास अनुरूप आहेत.

आहे.-रा. नि. रूक्ष; आणि रक्तपित्त व उचकी यांची नाशक आहे.-ग. नि. त्रिदोष-ज्वर, खोकला यांची नाशक आहे.-द्र. र. लघु, वृष्य; आणि रक्तातिसार, तृषा, दाह, वांती यांची नाशक आहे.- म. नि. वृष्य; व रसकाळीं मधुर; आणि श्वासनाशक आहे.-भा. प्र.

६१. **गोक्षुरक. ( गोखरू. )** —याचे गुणदोष, वनशृंगाटकाप्रमाणें आहेत.

६२. **वनशृंगाट. ( सराटे. )**—शीत, मधुर, तृप्तिकर, रसायन; आणि मूत्रकृच्छ्र, मुतखडा, प्रमेह, दाह यांचे नाशक आहेत.- रा. नि. वातनाशक आहेत.- द्र. र. मूळव्याधीचे नाशक आहेत.-भा. प्र. वृष्य; आणि शूल, हृद्रोग याचे नाशक आहेत.-ध. नि. पुष्टिकर, दीपन; आणि बस्ति-वात, त्रिदोष, श्वास, खोकला यांचे नाशक आहेत.- के. नि.

६३. **यवासा. ( तांबडा धमासा. )**--कडू, मधुर, दीपन, बलकर; आणि तृष्णा, वांति, विसर्प, शीतपित्तसंबंधीं पीडा, दाह यांचा नाशक आहे.-रा नि. मदनाशक आहे.--भा. प्र. रक्तपित्त व ज्वर यांचा नाशक आहे --ध. नि. तुरट, शीतवीर्य; आणि कफ, प्रमेह, मद, भ्रम, कोड, विसर्प, खोकला, वातरक्त यांचा नाशक आहे.-के. नि. वातपित्त, कफ व रक्तदोष यांचा नाशक आहे.-ग. नि.

६४. **वासक (अडूळसा )**- कडू , तिखट, शीतवीर्य; आणि कावीळ, रक्तपित्त, कफ, ज्वर, क्षय, श्वास यांचा नाशक आहे.--रा. नि. ऊर्ध्वमार्गानें ( तोंडावाटें ) पडणारें रक्त व रक्तपित्त यांचा नाशक आहे.-ग. नि. हृद्रोग, वांति, कोड, तृषा यांचा नाशक आहे.-ध. नि. वातकर असून, ज्वर, प्रमेह, अरुचि, कफ यांचा नाशक आहे.-के. नि. प्रमेहनाशक आहे.-द्र. र.

६५. **शितिवार. ( कुरडू. )**—ग्राही, तुरट, उष्ण, मेधाकर; आणि त्रिदोष, अरुचि, ज्वर यांची नाशक आहे.-रा. नि. रूक्ष, वृष्य, जड; आणि

वात-पित्त, विष, सूज, बस्तिवात, मूत्रकृच्छ्र, कफ-वात यांची नाशक आहे.-के. नि. सारक, अग्निवर्धक व कफवात-नाशक आहे. द्र. र.

६६. **क्षुद्र-दुरालभा.** ( लहान धमासा. )—आंबट, पाण्याची शुद्धि करणारी; आणि ज्वर, कोड, श्वास, कास ( खोकला ), भ्रम यांची नाशक आहे.-नि. शि

६७. **दुरालभा.** ( धमासा, कांटेचुबूक. )—तिखट, कडू, उष्ण; आणि वातपित्त-ज्वर, गुल्म, प्रमेह यांची नाशक आहे.-रा. नि.

६८. **अग्निदमनी.** ( आगीदवणा. )—तिखट, उष्ण, रूक्ष, रुचिकर, हृद्य, दीपन; आणि गुल्म, पाणथरी, वात-कफ यांची नाशक आहे.-रा. नि.

६९. **बाकुची.** ( बावंची. )—तिखट, कडू, उष्ण; आणि कृमी, कोड, कफ यांची नाशक आहे.-रा. नि. तिचें फल.—पित्तल, तिखट; आणि कोड, कफ वात यांचें नाशक आहे -के. नि. वात कृमींचें नाशक आहे.-द्र. र. पांढरा कोड व कफ-वात यांचें नाशक आहे.-म. नि. केशांना हितकर; आणि सूज, आंव, पांडुरोग यांचें नाशक आहे.-भा. प्र. त्वचेचा दोष, विष, कंडू, खरूज, व्रण यांचें नाशक आहे.-ध. नि. दीपन, मधुर, रूक्ष, रुचिकर, हृद्य, सारक, मेधाकर; आणि श्वास, कास, कृमी, प्रमेह, ज्वर, पित्त-कफ, विष्टंभ यांची नाशक आहे.—के. नि.

७०. **शणपुष्पी.** ( खुळखुळा. )—रसकाळीं कडू, तुरट, वांतिकर; आणि रक्तदोष, अजीर्ण, ज्वर, कफ-वात यांची नाशक आहे.-रा. नि. त्रिदोषांची नाशक आहे.-द्र. र. वात, कंठरोग, हृद्रोग, मुखरोग यांची नाशक आहे.-ध. नि. कफ-पित्त नाशक आहे.—के. नि.

७१. **लघु शणपुष्पी.** ( लहान खुळखुळा. )—कडू, वांतिकर व रसनियामक आहे.—नि. शि.

**७२. श्वेत-शणपुष्पी. ( पांढरा खुळखुळा. )** तुरट, उष्ण, पथ्यकर, रसनियामक; आणि मोहन, स्तंभन इत्यादि कौतुकें करण्याच्या कामांत उपयोगीं आहे.—**नि. शि.**

**७३. श्वेत शरपुंखा. ( पांढरी उन्हाळी. )**—तिखट, उष्ण, रसायन; आणि कृमी, वात यांची नाशक आहे.—**रा. नि.**

**७४. कंटकशरपुंखा. ( काटेउन्हाळी. )**—सदरप्रमाणें गुणाची असून, शूलनाशक आहे.—**रा. नि.**

**७५ शण. ( ताग. )**—आंबट, तुरट; मलाचा, गर्भाचा व आमाचा पात आणि वांति करणारा; आणि वातकफ, अग दुखणें यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

**७६. अंबष्टा. ( अंबाडी. )** तुरट, आंबट, रुचिकर, दीपन; कफ, कंठरोग, पडसें, वात यांची नाशक आहे.—**रा. नि.** शीतवर्य आणि अतिसारनाशक आहे.—**के. नि.** पित्तनाशक आहे.—**द्र. र.** पक्क झालेल्या अतिसाराची नाशक आहे.—**ध. नि.** रक्तातिसारनाशक आहे.—**ग. नि.**

**७७. नीली. ( नीळ. )**—तिखट, तीक्ष्ण, उष्ण, केशांना हितकर; आणि कास, कफ, आमवात, विष, गुल्म, उदर, कृमी, ज्वर यांची नाशक आहे.—**रा. नि.** सारक; आणि कोड, मूळव्याधी, गंडमाला, अर्बुद यांची नाशक आहे.—**द्र. र.** हृद्रोग, वात—गुल्म, पांथरी यांची नाशक आहे.—**ध. नि.** रसकाळीं व पाककाळीं कडू; व मूत्रकृच्छ्र, प्रमेह, कफ—वात, वातरक्त, उदावर्त, आमवात, विष यांची नाशक आहे.—**के. नि.** मोह, भ्रम, त्रिदोष यांची नाशक आहे.—**म. नि.** वात व कफ यांची नाशक व रेचक आहे.—**भा. प्र.**

**७८. महानीली. ( मोठी नीळ. )**—रंगास उत्तम, वीर्यवृद्धि करणारी; आणि वरील गुणांनीं युक्त आहे.—**रा. नि.**

७९. **गोजिव्हा. (पाथरी.)**—तिखट, शीतवीर्य, व्रणरोपण; आणि सर्व दंतरोग, विष, पित्त यांची नाशक आहे.-रा. नि. पाककाळीं व रसकाळीं मधुर, शीत, वातकारक, ग्राही, हृद्य; आणि कास, अरुचि, कफ-पित्त, श्वास, प्रमेह, रक्तविकार यांची नाशक आहे.- के. नि.

८०. **अपामार्ग. ( अघाडा. )**—तीक्ष्ण, उष्ण, तिखट, वांतिकर, ग्राही; आणि कफ, मूळव्याधि, कंडू , उदर, आंव, विष, रक्तविकार यांचा नाशक आहे.-रा. नि. दीपन, सारक; आणि मेद, वात, शूल, सिध्म-कुष्ठ, अपची (गंडमालेचा भेद, ) कंडू, इसब, यांचा नाशक आहे.-के. नि. कफ-वात नाशक आहे.-ग. नि.

८१. **रक्तापामार्ग. ( तांबडा अघाडा.)**-शीत, तिखट, ग्राही, वांतिकर; आणि व्रण, कंडू, विष, कफ-वात यांचा नाशक आहे.—रा. नि. शीत, रसकाळीं व पाककाळीं मधुर, पचन होण्यास कठीण, वातकर, रूक्ष, विष्टंभी; आणि रक्तपित्ताचा नाश करणारा आहे.-के. नि. वांतिकर व श्वासनाशक आहे.-द्र. र. याच्या बियांचेही हे सर्व गुण आहेत.-के. नि.

८२. **बला. ( लघु चिकणा )**—कडू, मधुर; बल, वीर्य व पुष्टी देणारी; कफ-शोधक; आणि पित्त, अतिसार यांची नाशक आहे.-रा. नि. तिचें मूळ, साल व बीक.—मूत्र-शर्करा, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे. ही-स्निग्ध, शीत, मधुर, वृष्य आणि त्रिदोषांची शमन करणारी आहे.-के. नि.

८३. **बलोत्तरा. ( थोर चिकणा. )**—मधुर, आंबट; आणि त्रिदोष, दाह, ज्वर यांची नाशक आहे.-रा. नि.

८४. **महाबला. ( सहदेवी. )**—वीर्य व बल यांची वर्द्धक; आणि विषमज्वर, हृद्रोग, सूज, वातार्श यांची नाशक आहे.-रा. नि.

८५. **अतिबला. ( पेटारी, मुद्रिका. )**—कडू; आणि वात, कृमी, दाह, तृषा, वांति, विष, अतिशय घाम यांचा नाश करणारी आहे-रा. नि.

८६. **नागबला.** ( **गांगेटी** )-जड, उष्ण, आंबट, मधुर; आणि कंडु, कोड, व्रण, वात-पित्त यांचा नाश करिते.-**रा. नि.**

८७. **महाराष्ट्री.** ( **मराठी.** )-तिखट, तीक्ष्ण, तुरट, मलशोधक; आणि व्रणांतील कीड व रसदोष यांची नाशक आहे.-**रा. नि.** कफ-वात, श्वास, रक्तविकार, विष, दाह, भ्रम, मूर्च्छा, तृषा यांची नाशक आहे.-**ध. नि.** शीतल, पाककाळीं व रसकाळीं तिखट, रुक्ष, हृदयाला प्रिय, रुचिकर, अग्निवर्धक, संग्रही, नेत्रांना हितकर; आणि दाह, रक्तविकार, व्रण यांची नाशक आहे.-**के. नि.** लघु व वीर्यवृद्धि करणारी आहे.-**म. नि.** शोधक; आणि कफपित्त, ज्वरसंबंधी दाह, प्रमेह, ज्वर यांची नाशक आहे.-**ग. नि.** रक्तविकार व दाहाची नाशक आहे.-**द्र. र.**

८८. **अश्वगंधा.** ( **आस्कंध.** )-तिखट, उष्ण, कडू, बलकर; आणि वात, श्वास, कास, क्षय, व्रण यांची नाशक आहे.-**रा. नि.** वात-कफ, विषजन्य व्रण यांची नाशक व कांती वाढविणारी आहे.-**ध. नि.** कंडू, चित्राविचित्र कोड, कृमी, क्षतक्षय, सूज यांची नाशक आहे.-**के. नि.** वीर्यवर्धक आहे.-**म. नि.**

८९. **हपुषा.** ( **मोठी शेरणी.** )-लघु शेरणीप्रमाणेंच इचेही गुणदोष आहेत.

९०. **ध्वांक्षनाशिनी.** ( **लघु शेरणी.** )-तिखट, कडू, उष्ण, जड; आणि पाणथरी, विष, कफ, पडसें, धुपणी, मोठें उदर, मलबद्धता,

---

१ चारी प्रकारच्या **बलेचे** ( बलाचतुष्टय ) **गुणदोष**:—स्निग्ध, रसकाळीं व पाककाळीं मधुर, शीत, ग्राही; ओज, बल व आयुष्य वाढविणाऱ्या; दृढता आणणाऱ्या; पौष्टिक, कांतिकर; आणि वातरक्त, रक्तपित्त, योनिदोष, क्षत-क्षय, भयंकर कोड यांचा नाश करतात. **फल**-रस व पाकीं मधुर, शीतवीर्य, जड, वीर्याचें स्तंभन करणारें, चेतनोत्पादक, लेखन ( जमलेल्या दोषी भागास झरविणारें ); आणि अवष्टंभ, पोटफुगी, वायु, विष, पित्त, कफ, रक्तविकार, प्रमेह यांचें नाशक आहे.-**के. नि.**

शूल, गुल्म, मूळव्याधी यांचा नाश करणारी आहे.–रा. नि. वायूचाही नाश करते.–ध. नि. दीपन, ग्राही; आणि वातोदर, पित्तोदर यांची नाशक आहे.–के. नि. वातार्शनाशक आहे.–म. नि.

९१. **शतावरी.**–महाशतावरी–प्रमाणें आहे.

९२. **महाशतावरी. (थोर शतावरी.)**–वृष्य, मधुर, शीत, उत्तम रसायन; आणि पित्त, कफ-वात यांची नाशक आहे.–रा. नि. स्तनांत दूध उत्पन्न करणारी, हृद्य आहे.–म. नि. **तिचे अंकुर.**–कृशता, क्षय, त्रिदोष यांचा नाश करतात. ही जड, स्निग्ध, वीर्यकर, बलकर; मेधा, अग्नि व पुष्टता यांची वृद्धि करणारी; नेत्राला हितकर; आणि वातरक्त, रक्तपित्त, गुल्म, संग्रहणी, अतिसार, वातपित्तजनित व इतर मूळव्याधि यांची नाशक आहे.–के. नि.

९३. **एलावालुक**–तुरट, रुचिकर; आणि कफ-वात, मूर्च्छा, ज्वर, दाह यांचा नाश करते.–रा. नि. विषनाशक आहे.–द्र. र. मूत्ररोग नाशक आहे.–म. नि. श्वास, अरुचि, विष, हृद्रोग, गुदसंबंधी दोष यांचें नाशक आहे.–भा. प्र. शोधक, पाककाळीं तिखट, शीत, बलकर, लघु; आणि कंडू, व्रण, वांति, तृषा, कास, कुष्ट, पडसें, रक्तपित्त, कृमी यांचें नाशक आहे.–ध. नि.

९४. **तेरणी. (तेरडा.)**–शीतवीर्य, कडू; आणि व्रणनाशक आहे.–रा. नि.

+९५. **कलिकारी. (कळलावी.)**–तिखट, उष्ण, सारक, गर्भपातकारक; आणि कफ-वात, शल्य (शरीरांत कांहीं गुंतणें), कास यांची नाशक आहे.–रा. नि. शूलनाशक आहे.–म. नि. व्रण, सूज यांची नाशक आहे.–ध. नि. पित्तकर; आणि पडसें, कोड, मूळव्याधी, व्रण, जंतु यांची नाशक आहे.–के. नि.

९६. **जयंती. (शेवरी.)**–कडू, तिखट, उष्ण, कंठशोधक; आणि वात, भूतदोष यांची नाशक आहे. इच्यांतच काळी जात आहे ती रसायन आहे.–रा. नि. विष व त्रिदोष यांची नाशक आहे.–ध. नि.

वादांत जय देणारी; आणि पित्त-कफ, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे.—**के. नि.** शीत व कफनाशक आहे.—**द्र. र.**

९७. **काकमाचिका. ( कांगोणी. )**—तिखट, कडू, उष्ण; आणि कफजन्य शूल, सूज, मूळव्याधी, कोड, कंडू यांची नाशक आहे.—**रा. नि.** वांति, उचकी यांची नाशक व नेत्रांला हितकर आहे.—**भा. प्र.** रसायन व त्रिदोषांची नाशक आहे.—**ध. नि.** हृद्य, वृष्य, स्वराला उपयोगी; आणि प्रमेह, श्वास, कास, ज्वर, अरुचि यांची नाशक आहे.—**के. नि.** स्निग्ध, वीर्यकर आहे.—**म. नि.**

९८. **मूषकमारी. ( उंदीरमारी. )**—तिखट, नेत्राला हितकर; आणि व्रणदोष, नेत्ररोग, उंदिरांचें विष यांची नाशक आहे.—**रा. नि.**

९९. **विजया. ( भांग. )**—तिखट, तुरट, कडू, ऊष्ण, संग्राही, वाणीला हितकर, बलकर, मेधाकर, दीपन; आणि वातकफाचा नाश करणारी आहे.—**रा. नि.** पित्तकर, मदकर व शरीराला कृश करणारी, ( मेद व कफ यांना झरविणारी ) आहे.—**के. नि.**

१०० **मार्कव. (माका.)**—नेत्राला हितकर, कडू, उष्ण, केशांना हितकर रंग (काळा) आणणारा; आणि कफ, आंव, सूज, चित्राविचित्र कोड यांचा नाशक आहे.—**रा. वि.** ज्वरनाशक आहे.—**द्र. र.** दांतांस हितकर आहे.—**भा. प्र.** त्वचेला हितकर; आणि पांडुरोग, अंडवृद्धि, विष यांचा नाशक आहे.—**ध. नि.** नेत्ररोग, शिरोरोग, कफ–वात, कास, कृमी, श्वास, कोड यांचा नाशक आहे.—**के. नि.**

१०१. **पीतमार्कव. ( पिंवळा माका.)**—सदर प्रमाणेंच गुण आहेत.

१०२. **नीलमार्कव. ( निळा माका.)**—माक्याप्रमाणेंच असून, रसायन आहे.— **रा. नि.**

१०३. **काकजंघा. ( कांग. )**—कडू, उष्ण आणि कृमी, व्रण, कफ, बधिरता ( बहिरेपणा ), अजीर्ण, विषमज्वर यांचा नाश करते.—**रा. नि.** शीत, तुरट, आणि कफ–पित्त, तांबडा कोड, कंडू, विष यांचा नाश करते.—**के. नि.** रक्तपित्त व विष यांची नाशक आहे.—**द्र. र.**

१०४. चंचू. ( चुंच. )—मधुर, तीक्ष्ण, तुरट, मळाला शोषून घे-णारी ( बद्ध करणारी ); आणि गुल्म, उदर, मलबद्धता, मूळव्याधि, संग्रहणी यांची नाशक आहे.—रा. नि. सारक, शीत, अग्नीला वाढ-विणारी, धातूंची पुष्टी करणारी, बलकर, मेध्य; आणि वात, त्रिदोष यांचा नाश करते.—भा. प्र. मूत्रकृच्छ्र, बस्तिवात यांची नाशक आहे.—ग. वि.

१०५. बृहच्चंचु. ( थोर चुंच. )—तिखट, उष्ण, मलाची शोधक, रसायन; आणि गुल्म, शूल, उदर, मूळव्याधी, विष यांची नाशक आहे. तिचें बीज.—तिखट, उष्ण; आणि गुल्म, शूल, विष, त्वग्दोष, कंडू, कोड यांचें नाशक आहे.—रा. नि.

१०६. क्षुद्रचंचु. ( लहान चुंच. )—मधुर, तिखट, उष्ण, तुरट, दीपन, अवष्टंभ[1] करणारी; शूल, गुल्म, मुळव्याध, यांची शमन करणारी आहे.—रा० नि०

१०७. सिंदुवार. ( पांढरी निर्गुडी. )—तिखट, कडू; आणि कफ, वात, क्षय, कोड, कंडू, शूल यांची नाशक आहे.—रा० नि. कृमी, कोड, पानथरी, गुल्म, अरुचि यांची नाशक आहे.—ध. नि. नेत्राला हितकर, दीपन, मेध्य, केशांना उपयोगी; आणि अरुची, मेद, आंव, शूल, व्रण, पडसें, सूज, श्वास, कास यांची नाशक आहे. तिचें फूल.—विष व पित्त यांचें नाशक आहे.—के. नि. स्मृती वाढविणारी आणि आमवातनाशक आहे.—द्र. र. धूप किंवा लेप यांत योजल्यानें विष, रक्तगुल्म, उदावर्त यांची नाशक आहे.—ग. नि.

१०८. नील-सिंदुक. ( निळी निर्गुडी. )—तिखट, कडू, रूक्ष, आणि कास; कफ, सूज, वायु, प्रदर, आध्मान यांची नाशक आहे. —रा. नि.

[1] 'अवष्टंभ' शब्दानें, मल दाट करणारी असें समजावें. अधोवाताचा प्रतिबंध करणारी असें नव्हे.

१०९. **शेफालिका.** ( **राननिर्गुंडी, पांढरी निर्गुंडी** )-वातकफ, संधीवात, गुदवात यांची नाशक आहे.-**रा. नि.**

११०. **भेंडा.** ( **रान भेंडी.** )-रसकालीं आंबट, किंचित् उष्ण, ग्राही, रुचिकर आहे.-**रा. नि.** वृष्य आहे.-**द्र. र.**

१११. **पुत्रदा.** ( **पुत्रदाई** )-मधुर, शीत, गर्भ उत्पन्न करणारी; आणि पित्त, दाह, थकवा, स्त्रियांचे योनी व रजोदोष यांची नाशक आहे.-**रा. नि.**

११२. **तक्राव्हा** ( **ताका** )-तिखट, कडू; आणि कठीण व दोषी व्रण, प्रमेह, प्रदर, पित्त यांची नाशक आहे.-**रा. नि.**

११३. **स्वर्णुली.** ( **सोनोली.** )-तिखट, शीत, तुरट; आणि व्रणनाशक आहे.-**रा.नि.** कास, श्वास, कफपित्त यांची नाशक आहे.-**द्र.र.**

११४. **खसखस.**--मधुर; वीर्य, कांति व बल देणारी आहे.-**रा.नि.** वृष्य, ग्राही, जड, वातकर; आणि पित्तनाशक आहे. **द्र. र.**

११५. **सिग्रुडी.** ( **शेगुडी.** )-तिखट, उष्ण, रसायन, शरीराला बळकटी आणणारी; आणि पाठींतील शूल व वायु यांची नाशक आहे.--**रा. नि.**

११६. **अरण्यकुसुंभ.** ( **रान कडई.** )-पाककाळीं तिखट, दीपन, आणि कफनाशक आहे.-**रा. नि.**

११७. **आहुली.** ( **तरवड** )-तीक्ष्ण, नेत्राला हितकर, शीत; आणि पित्त, दाह, मुखसंबंधीं पीडा ( दुखणें ), कंडू, जंतु, शूल, व्रण यांची नाशक आहे.-**रा. नि.**

११८. **भूम्याहुली.** ( **भुई तरवड.** )-तिखट, कडू; आणि ज्वर, कोड, सिबें यांची नाशक आहे.-**रा. नि.** सारक, तुरट; आणि सूज, कफ-पित्त, आनाह, उदर, गुल्म, तृषा, विष, वांति, कोड, कृमी, श्वास, दाह, ज्वर यांची नाशक आहे.-**के. नि.**

११९. **कासमर्द.** (**कासवदा.**)-कडू, उष्ण, मधुर, पाचक, कंठशोधक; आणि कफ-वात, अजीर्ण, कास, पित्त यांचा नाशक आहे.-

रा. नि. विष, कास यांचा नाशक आहे.—के. नि. सारक, शीत, विषूचिका ( महामारी, बाखा, Colera कॉलरा ), कफ-वात यांचा नाशक आहे.—द्र. र. त्याचें पान.—उष्ण, वृष्य, पाचन; आणि वात-नाशक आहे.—म. नि. पित्तनाशक आहे.—भा. प्र.

१२०. **आदित्यपत्र**—तिखट, उष्णवीर्य, दीपन; आणि वात, कफ, गुल्म, अरुचि यांचें नाशक आहे.—रा. नि.

१२१. **श्वेताम्ली ( पांढरी पिठोंडी. )**--मधुर, वृष्य, बलकर व पित्त-नाशक आहे.--रा. नि.

१२२. **नीलाम्ली.** ( काळी पिठोंडी, निळुंबी. )--मधुर, रुचिकर; आणि कफ, वात, ज्वर यांची नाशक आहे.--रा. नि.

१२३. **अजगंधा.** ( **तिळवण.** )--तिखट, उष्ण; आणि वातगुल्म, कानांतलि व्रण व शूल, वातोदर यांची नाशक आहे.--रा. नि. हृद्य, अग्निवर्द्धक, दृष्टिमांद्य करणारी, वीर्यवृद्धि करणारी, आणि वात-कफ-नाशक आहे.--म. नि.

१२४. **पीताजगंधा** ( **पिंवळी तिळवण** )--नेत्रांत घालण्यास उत्तम आहे.--रा. नि.

१२५. **आदित्यभक्ता** (सूर्यफूल.)--शीत, तिखट, कडू; आणि भय ( भीति ), त्वग्दोष, कंडू, कोड, भूतबाधा, व्रण, शीतज्वर यांची नाशक आहे. रा.नि. सूज, उष्णता, पांडुरोग, कोड, पडसें यांची नाशक आहे.-- ग.नि. मूत्र विशेष करणारी आहे.--म. नि. आवाजाला उत्तम, रसायन, पथ्यकर; आणि फोडांचा नाश करणारी आहे.--ध. नि. पाककाळीं मधुर, जड, मलावष्टंभ ( मळ गोठवणारी ); करणारी, पित्तल, रूक्ष; आणि कफनाशक आहे.-- द्र. र. अति उष्ण, लघु, रूक्ष, सारक ( अधोवात व मल सोडणारी ); आणि कफ, रक्तपित्त, अरुचि, श्वास, कास, ज्वर, विस्फोट ( फोड ), कोड, मूतखडा, योनिरोग, मूत्रकृच्छ्र, पांडुरोग यांची नाशक, आहे.--के. नि. कफ, वात, आंव, जंतु यांची नाशक आहे. भा. प्र.

१२६. **विषमुष्टि.** ( विषदोडी, भुईदोडी. )–तिखट, तीक्ष्ण, रुचिकर, दीपन; आणि कफवात, कंठरोग, रक्तपित्त, दाह, यांची नाशक आहे.–**रा. नि.** प्रमेह, कृमि, श्वास, गुल्म, उंदिरांचें विष, सर्व प्रकारच्या मूळव्याधी यांची नाशक आहे.–**के. नि.**

१२७. **डोडी.** ( वेलीदोडी, खोबरदोडी. )–तिखट, कडू, उष्ण, दीपन, रुचिकर; आणि कफवात, कंठरोग, रक्तपित्त, दाह यांची नाशक आहे.–**रा. नि.**

१२८. **कालांजनी.** ( **काळी कापशी.** )–तिखट, उष्ण, आंबट; व आंव आणि कृमीची शोधक; तशीच अपानवायूचें शमन व उदरस्थ रोग यांची नाश करणारी आहे.–**रा. नि.** कृमि, कफोदर, हृद्रोग, यांची नाशक आहे.–**द्र. र.**

१२९. **कार्पासी.** ( देवकापशी. )–मधुर, शीत, स्तनांत दूध वाढविणारी, बलकर; आणि पित्तकफ, तृषा, दाह, श्रम ( थकवा ) भ्रांति, मूर्च्छा, यांची नाशक आहे.–**रा. नि.** तिचें **बीं.**–कफकर, स्निग्ध, वृष्य आहे.–**के. नि.** तिचें **पान.**–मूत्रवृद्धिकारक, वात, रक्तविकार, कानांतील दुखणें, कर्णनाद, व कानातील पू, स्राव वगैऱ्यांचा नाश करणारें आहे.–**भा. प्र.**

१३०. **अरण्यकार्पासी.** ( **रानकापशी.** )–शीतवीर्य, रुचिकर; आणि शस्त्रानें लागलेल्या व्रणाची नाशक आहे.–**रा. नि.**

१३१. **कोकिलाक्ष.** ( **तालीमखाना, कोलिस्ता.** )–मधुर, वृष्य, बलकर, रुचिकर, तृप्ति देणारा; आणि शीतापित, अतिसार, कफ यांचा नाशक आहे.–**रा. नि.** स्निग्ध, बुळबुळीत, वृष्य; आणि वात, तृषा, मूतखडा, रक्तीआंव, वात यांचा नाशक आहे.–**के. नि.** प्रमेह, वात, यांचा नाशक आहे.–**द्र. र.** सूज, वातरक्त, यांचा नाशक आहे.–**भा. प्र.**

१३२. **सातला.** ( **थोर सोनुली.** )–तिखट, कडू, तुरट, लघु; आणि पित्त, विसर्व, विष, गुल्म, विस्फोट ( फोड ), व्रण, सूज यांची

नाशक आहे.—रा. नि. मूत्रकृच्छ्रनाशक आहे.—ग. नि. वातकर, लघु, शोधक; आणि कफ, रक्तपित्त, सूज, उदर, आनाह, यांची नाशक आहे.—ध. नि. शीतवीर्य, तीक्ष्ण, कडू, वांति व रेचक करणारी, हृदयाला प्रिय, आणि हृद्रोग, कफ, पित्तजनित उदावर्त, गुल्म, उदर, विष, कृत्रिमविष, कृमि, सूज, आव, अरुचि यांची नाशक आहे.—के. नि.

१३३. **कामवृद्धि.** (**कामज वृक्ष.**)—याचें **बीज.**—मधुर, बलवर्द्धक, काम—( मैथुनेच्छा )—वृद्धिकर, रुचिकर, इंद्रियाची विशेष वृद्धि करणारी आहे.—रा. नि.

१३४. **चक्रमर्द.** ( तरवटा, टाकळा )—तिखट; आणि मेद, वातकफ, व्रण, कंडू, कोड, इसब, खरूज यांचा नाशक आहे.—रा. नि. शीत, रूक्ष, हृद्य, मधुर, मलावष्टंभी ( ग्राही ), मल व मूत्र यांचा नाशक; आणि पित्तवायु, कफ, कोड, ज्वर, श्वास, कास, मेद, अरुचि, कृमि, यांचा नाशक आहे.—के. नि. याचें **फल**-तिखट, व उष्ण; आणि त्याची **भाजी**—विष व मल यांची नाशक आहे.—के. नि. ग्राही; आणि त्रिदोष, मस्तकदुखी, शोकोद्भव कफ यांचा नाशक आहे.—द्र. र.

१३५. **झिंझिरीटा.** ( **झिंझरूट.** )—तिखट, शीत, तुरट, बलकर, वृष्य, तृप्ति देणारी, स्त्रीचें दूध वाढविणारी; आणि अतिसारनाशक आहे.—रा. नि.

## ३. पर्पटादि वर्ग.

१३६. **पर्पट.** ( **पित्तपापडा.** )—शीतवीर्य, कडू; आणि पित्त—कफ, ज्वर, रक्तविकार, दाह, अरुचि, ग्लानि, मद, भ्रम यांचा नाशक आहे.—रा. नि. मुखरोगनाशक आहे.—ग. नि. रसकाळीं व पाककाळीं कडू, संग्राही, वातकारक; आणि दाह, वांति, तृषा, पित्त यांचा नाशक आहे.—के. नि. पित्तजनित प्रमेहाचा नाशक आहे.—द्र. र.

१३७.जीवक—मधुर, शीत, गर्भधारणा करविणारा; स्वर, वीर्य व कफ यांची वृद्धि करणारा; आणि रक्तपित्त, वायु, क्षय, दाह यांचा नाशक आहे.— रा. नि.

१३८.ऋषभक.— मधुर, शीत; वीर्य व कफ यांना करणारा, गर्भाचें संधान करणारा; आणि दाह, क्षय, ज्वर, पित्तरक्त व वांतीचा नाशक आहे.—रा. नि.

१३९.श्रावणी (धाकटी मुंडी)—तुरट, तिखट, उष्ण; आणि कफपित्त, आमातिसार, खोकला, विष, वांति यांची नाशक आहे.—रा. नि. वात, रक्तपित्त, आम, अरुचि, गंडमाला, अपस्मार, श्लीपद ('रसविकार Elephentixs एलिफंटा) यांची नाशक आहे.—ध. नि. वीर्यानें उष्ण, मेधाकर; आणि वात—कफ, अपची, पाणथरी, प्रमेह, पांडुरोग, योनिरोग, मूत्रकृच्छ्र, कृमी यांची नाशक आहे.—के. नि.

१४०.महाश्रावणी. ( मोठी मुंडी. )—उष्ण, स्वराला हितकर, रुचिकर, कडू, रसायन, किंचित् दुर्गंधियुक्त; आणि वायु व प्रमेहाचा नाश करणारी आहे.—रा. नि.

१४१.मेदा.—मधुर, शीत; आणि पित्त, दाह, खोकला, क्षय, ज्वर, वातदोष यांची नाशक आहे.—रा. नि. जड, दुग्धवर्धक; आणि वात-पित्तनाशक आहे.—ध. नि. पडसें व वीर्य यांना वर्धक व तृप्तिकर, आहे.—के. नि. वात, रक्तपित्त, रक्तवात व क्षतक्षय यांची नाशक आहे.— भा. प्र.

१४२. महामेदा.—शीत, रुचिकर; कफ व वीर्यवर्धक; आणि रक्त, दाह, पित्त-क्षय याची नाशक आहे.— रा. नि.

१४३.ऋद्धि.—मधुर, स्निग्ध, कडू, शीतल; रुचि व मेधा करणारी; आणि कफ, कोड, कृमी यांची नाशक आहे.—रा. नि. कफ व वीर्य करणारी; आणि क्षय, पित्त, वात, रक्तज्वर, याची नाशक आहे--ध. नि. त्रिदोषजनित मूर्च्छा व रक्तपित्ताची नाशक असून, गर्भाची वृद्धि करणारी आहे.— के. नि.

१४४.वृद्धि.—सदरहू प्रमाणेंच गुणदोष आहेत.

१४५.धूम्रपत्रा. ( गंधाणी. )— रसकाळीं कडू, उष्ण, रुचिकर दीपन; आणि सूज, कृमी, खोकला यांची नाशक आहे.--रा. नि.

१४६. प्रसारिणी. ( चांदवेल. )—जड, उष्ण, कडू; आणि विष्टंभ सूज, मल, वातजनित मूळव्याधि यांची नाशक आहे.—रा. नि. कफ नाशक आहे.—म. नि. सारक, जखम मिळवून आणणारी, वृष्य; बल तेज व कांति वाढविणारी; आणि त्रिदोषनाशक आहे.—ध. नि. रस काळीं कडू, वीर्यकर, उष्णवीर्य; आणि वातरक्त व त्रिदोषनाशक आहे.—के. नि.

१४७.पाषाणभेदी.—मधुर,कडू; आणि प्रमेह व तृषा नाशक आहे.—रा. नि. शीतल, भेदक; आणि योनिरोगनाशक आहे.— के. नि. मूत्ररोग, व्रणदोष, गुदभ्रंग यांची नाशक आहे.— ग. नि. बस्तिशुद्धि करणारी; आणि पोटशूळ, मूत्रकृच्छ्र, त्रिदोष, प्रमेह, हृद्रोग, पांथरी, गुल्म, मूळव्याधि यांची नाशक आहे.—ध. नि. सूज, हृद्रोग, शर्करा, ( Sugar शूगर ), शिस्नसंबंधीं शूल, यांची नाशक आहे.—भा. प्र. सारक आहे.—म. नि.

१४८.वटपत्री पाषाणभेदी ( वडवती पाषाणभेदी.)--शीत, दुर्गंधि; आणि मेह,व कृच्छ्र(उन्हाळी)यांचा नाश करणारी,बलदायक,व्रणनाशक, अग्निदीपक आहे.—रा. नि. योनिरोगाचा नाश करणारी; मूत्ररोधनाशक आहे. हिचें फळ, मधुर, रूक्ष, मलस्तंभक, लेखन (रसादि धातु व वातादिदोष यांचें शोषण करून त्यांस पातळ करणारी ), कफ,पित्तनाशक; मलावरोध व पोटफुगी यांना करणारी, हलकी, मलबद्धक, पित्तनाशक आहे.—के. नि. मलस्तंभक, वातुळ, थंड आहे.—म. नि.

१४९. श्वेतशिला. ( पांढरा दगडी पाषाणभेद )— थंड, गोड; आणि मेह, मूत्रकृच्छ्र, मूत्ररोध, मूतखडा, शूळ, क्षयरोग व पित्त यांचा नाश करणारा आहे.— रा. नि.

१५० क्षुद्रपाषाणभेदी. ( क्षुद्रपाषाणभेद.)—व्रणनाशक; आणि मूत्रकृच्छ्र व मूतखडा यांची नाशक आहे.

१५१.गृहकन्या.( कोरफड.)--थंड,कडू;आणि खोकला, पित्त, कफ, विष, कुष्ठ व श्वास यांची नाशक व रसायनी आहे.—रा. नि. यकृत् व पित्तनाशक, कंठरोगनाशक; धातुवर्धक, बलदायक, त्वग्रोगनाशक आहे.–ध. नि. मलभेदक; व ग्रंथि, अग्निदग्धव्रण, फोड, रक्तपित्त व कफज्वर यांची नाशक आहे.— के. नि. सारक, आणि पाणथरीची नाशक आहे.–द्र. नि. नेत्रांना हितकारक आहे.—भा. प्र.

१५२.बर्हिचूडा. ( मयूरशिखा. )—मधुर; मूत्रकृच्छ्रनाशक, बालग्रहनाशक, वश्यकारक आहे.–रा. नि. कफ, अतिसार; आणि पित्त व कफातिसार यांची नाशक आहे.—द्र. नि.

१५३. क्षीरिणी. ( पिसोळा. )–कडू, थंड; रेचक; व सूज, वात, कृमि, कफ व पित्तज्वर यांचा नाशक आहे.–रा. नि.

१५४. स्वर्णक्षीरी.(काटेधोत्रा.)--थंड,कडू; आणि कृमि, पित्त, कफ, मूत्रकृच्छ्र, मूतखडा, सूज, दाह, ज्वर; यांचा नाशक आहे.–रा. नि. उत्क्लेश–( दोषांचा पाक होऊन स्वस्थानापासून च्युत होणें )–कारक, मदकारक आहे.–म. नि. विष, पित्त व रक्तपित्तनाशक आहे.– ध. नि. कंडू, रक्तविकार, मलबद्धविकार, कामला यांचा नाशक आहे. वातनाशक आहे.– द्र. नि. पांडुनाशक आहे.– गणनि.

+ १५५.त्रायमाणा. (त्रायमाण.)–थंड, मधुर; व गुल्म, रक्तज्वर, कफ, भ्रम, तृषा, क्षय, ग्लानि, विष, वांति यांची नाशक आहे.–रा. नि. तिखट;आणि रक्तपित्त, शूल यांची नाशक आहे–ध. नि.हृद्रोग,रक्तगुल्म, पित्त यांची नाशक आहे–के. नि. सारक आहे–म. नि. कफ व पित्त यांची नाशक आहे–ग. नि.

१५६. रुदंती(रुद्रवंती)–तिखट,कडू,तुरट,उष्णकारक;आणि रक्तपित्त, कृमि, कफ, श्वास, प्रमेह यांची नाशक व रसायन आहे–रा. नि.

१५७ **ब्राह्मी.** ( ब्राह्मी )–थंड, तुरट, कडू; व वात, रक्तपित्त यांची नाशक; बुद्धि व स्मृति देणारी आहे –रा. नि. बुद्धिवर्धक, स्वरकारक, पाककाळीं मधुर, हृद्य, स्मृतिदायक; आणि अरुचि, मल, विष, श्वास, कास, रक्तविकार, मेह व पांडुरोग यांची नाशक आहे–के. नि. रसकाळीं कडू; व सूज, पांडु, ज्वर, अग्निमांद्य, कुष्ठ, कंडू, प्लीहा, वात व कफ यांची नाशक आहे– ध. नि. सारक;व रक्तप्रमेह, ज्वर यांची नाशक आहे–म० नि०, भा. प्र.

१५८·**जलब्राह्मी** ( बांब )–कडू, उष्ण, सारक; आणि आमवातनाशक आहे–रा. नि.

१५९ **वंदाक** ( बांदें )-कडू, थंड; आणि कफ, पित्त, श्रम यांची नाशक;सिद्धिदायक,वृष्य व रसायन आहे–रा. नि. व्रणरोपण करणारें आहे. –ध. नि. कफ, वात, रक्तविकार व विष यांचें नाशक आहे–के. नि.

१६० **अरण्यकुलत्थिका.** ( विवळ्या. ) –नेत्रांस हितकारक, कडू; व मूळव्याध, शूल यांची नाशक; तिखट, आणि मलबद्धता, व पोटफुगी यांची नाशक आहे.–रा० नि० डोळ्यांस हितावह, व्रणांस रोपण करणारी, नेत्रांची गळ दूर करणारी, स्थावर व जंगम विष नाशक, आणि फोड, डोळ्यांचा कंडू, डोळ्यांतील व्रण यांची नाशक आहे.– ध० नि० मूळव्याध, उचकी, रक्तविकार यांची नाशक आहे.–ग० नि०

१६१ **तंदुलीयक.** ( तांदुळजा ) – थंड, मधुर, विषनाशक, रुचिकारक, अग्निदीपन, पथ्य; आणि पित्त, दाह व श्रम यांचा नाशक आहे.– रा. नि. रक्तविकार व ज्वरनाशक आहे.–ग. नि. रक्तपित्तनाशक, रूक्ष, रसकाळीं व पाककाळीं मधुर आहे.–ध. नि. मद, पित्त, विष, रक्तविकारनाशक आहे.-के. नि. मलमूत्रविसर्जक आहे.–म. नि.

१६२ **चिविल्लिका.** ( चिलघोळ. )– तिखट, तुरट, जीर्णज्वरनाशक,रसायनी आहे.–रा. नि. सारक, थंड;आणि प्लीहा, रक्तदोष, कृमि, त्रिदोषनाशक आहे.–म. नि. कफ, पित्त, प्रमेह, मूत्रकृच्छ्रनाशक आहे

—ध. नि. रुचिकारक, अग्निदीपक आहे.—द्र. नि. वात, कफ यांची नाशक, व पुष्टिकारक आहे. इचें फळ मत्स्यमारक आहे.—भा. प्र.

१६३ **हस्तिशुंडी.** ( हस्तिशुंडी. ) — तिखट, उष्ण व सन्निपातज्वरनाशक आहे.— रा. नि.

१६४ **कुटुंबिनी** ( पहारकुटुंबी, शिरदोडी. )— मधुर, ग्राहिणी ( अग्निदीपक व आमाचें पाचन करणारी ); आणि कफ, पित्त कंडू, रक्तविकार, व्रण यांची नाशक व रसायन आहे.

१६५ **स्थलपद्मिनी** ( स्थलकमळणी )—कडू, थंड, वातहारक, रक्तपित्त, प्रमेह, अतिसार यांची नाशक आहे—रा. नि. उष्ण, तिखट, आणि कफ, वात, मूत्रकृच्छ्र, मूतखडा, शूल, विष, श्वास, कास यांची नाशक आहे. —भा. प्र. मोह, अपस्मार यांची नाशक आहे—ध. नि. कफ, श्वास, रक्तविकार, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे—म. नि. शूलनाशक आहे—ग. नि. तृषा व दाहनाशक आहे—द्र. र.

१६६ **नागदमनी**—(नागदवण)—कडू, उष्ण, त्रिदोषनाशक, तिखट; आणि उदर, पोटफुगी यांची नाशक व काष्ठशोधक आहे—रा. नि. मोह व अपस्मारनाशक आहे—ध. नि. तृषा व दाह नाशक आहे—द्र. नि. व्रण; राक्षस व ग्रह यांची पीडा; सर्पदंश, लूताविष व जालगर्दभनामक रोग यांची नाशक आहे—के नि. कफ व वातनाशक आहे—द्र. नि. जयकारक, धन देणारी, मतिदायक आहे—भा. प्र. कोठ्यांतील शूल; व योनिदोषनाशक आहे—ग. नि.

१६७ **नागदंती**.(नागाळी)—तिखट, कडू व रूक्ष; आणि वात, कफ, गुल्म, शूल, उदर, कंठरोग यांची नाशक आहे—रा. नि. तृषा, वांति यांची नाशक आहे—ग. नि.

१६८ **विष्णुक्रांता**. (विष्णुक्रांता)—तिखट, कडू; व कफ, वात, विष यांची नाशक, पाचक व शुभकारक आहे—रा. नि. बुद्धिदायक, स्मृतिदायक; व व्रण, कृमि व कफ यांची नाशक आहे—के. नि.

१६९ **कुणंजर**. ( कुंजीर. )—मधुर, रुचिकर, अग्निदीपक व पाचक

आहे. रा नि. थंड, वृष्य (वीर्यवर्धक); आणि प्रमेह, रक्तपित्त यांची नाशक आहे.-द्र. नि.

१७० **भूम्यामलकी.** ( भुईआंवळी. ) -तुरट, आंबट थंड; व मूत्ररोग, वात, पांडुरोग, रक्तपित्त, कफ, विष, कुष्ठ, श्वास, तृषा व दाह यांची नाशक आहे रा. नि. उचकी,क्षतक्षय यांची नाशक आहे.-के.नि.

१७१ **गोरक्षी.** ( गोरखचिंच. )-मधुर, कडू, थंड;आणि दाह, पित्त, विस्फोट ( फोड ), वांति, अतिसार, ज्वर, शोष यांची नाशक आहे. -रा. नि.

१७२ **गोलोमी.** ( पाथग. )-तिखट, कडू, त्रिदोषनाशक, व थंड आहे.- रा. नि. रक्तमूळव्याधनाशक, ग्राहिणी, अग्निदीपक; आणि मूतखडा व प्रमेहनाशक आहे -द्र. नि.

१७३ **दुग्धफेनी** ( दूधफेनी. )-तिखट, कडू, तुरट, थंड; आणि विष व व्रणनाशक, रुचिकारक; व रसायनी आहे.

१७४ **चांगेरी, क्षुद्राम्लिका.** ( आंबवती ) -- रसकाळीं आंबट, उष्ण, अग्निदीपक, रुचिकारक, ग्राहिणी; आणि मूळव्याध व कफ यांची नाशक आहे.-रा. नि आमवातनाशक आहे.-ध. नि. पित्तकारक, अतिसारनाशक, कफवातनाशक आहे.-के. नि. मुखशुद्धिकर आहे.-द्र. नि. कुष्ठनाशक आहे.- म नि.

१७५ **रक्तपादी.** (लहान लाजाळू.) तिखट, शीतल; व पित्त,अतिसार, सूज, दाह, श्रम, श्वास, व्रग, कुष्ठ, कफ यांची नाशक आहे.-रा.नि. कफ,पित्त,योनिरोग,रक्तपित्त यांची नाशक आहे.-के.नि.रक्तदोष दाह, विष, यांची नाशक आहे.--द्र. नि. विसर्प, लूताविष, भूतबाधा यांची नाशक व व्रणरोपण करणारी आहे.--म. नि.

१७६ **वैपरीत्या लज्जालु.** ( थोर लाजाळू. ) उष्ण, तिखट, कफनाशक,पाऱ्याची सिद्धि करणारी व नाना कौतुककारक आहे-रा.नि. व्रण, पित्त, अतिसार, यांची नाशक आहे.--द्र. नि. कफ, पित्त, योनिरोग यांची नाशक आहे.--म. नि.

१७७ **हंसपादी.** (बारीक लाजाळू भेद.)तिखट, उष्ण; आणि विष, भूतबाधा, भ्रम, अपस्मार यांची नाशक व रसायन आहे.-**रा. नि.** विजयकारक आहे.-**ध. नि.** थंड,जड, व्रणरोपण करणारी; व रक्तविकार, दाह, अतिसार, विसर्प, लूता, भूतबाधा व व्रण यांची नाशक आहे.

१७८ **अश्वकाथरिका.** ( घोडाकाथरा. ) कडू, वातनाशक, अग्निदीपक आहे.--**रा. नि.**

१७९ **श्वेता पुनर्नवा.** (पांढरी घेटुळी.) उष्ण, कडू; व कफ, काम, हृद्रोग, शूळ, पांडुरोग, सूज, वात यांची नाशक आहे--**रा. नि.** सूज, उदर यांची नाशक आहे.--**म. नि.** रूक्ष, रुचिदायक, व्रणनाशक आहे.--**ध० नि०** अग्निदीपक;व वात,कफ यांची नाशक;हृद्य, रुचिदायक, व मूळव्याध, व्रण, उदर, विष यांची नाशक आहे.--**के. नि.**

१८० **रक्ता पुनर्नवा.** (तांबडी घेटुळी)--कडू, सारक; व सूज, रक्तप्रदर, पित्त, पांडुरोग यांची नाशक आहे.--**रा. नि.** रक्तपित्त व कफ नाशक आहे.--**द्र. नि.** थंड, पाककाळीं तिखट, लघु, संग्राही, वातुळ; व पित्त, कफ व रक्तदोष यांची नाशक आहे.-**के. नि.**

१८१ **नीला पुनर्नवा.** ( काळी घेटुळी. )–कडू, तिखट, उष्ण, रसायनी; व हृद्रोग, पांडु, सूज, श्वास, वात, कफ यांची नाशक आहे.–**रा. नि.**

१८२,१८३ **श्वेतावसु, रक्तावसु.** ( पांढरी वसु, तांबडी वसु )--तिखट, कडू, उष्ण, पाककाळीं शीत, अग्निदीपक; व अजीर्ण, वात व गुल्म यांची नाशक आहे. पांढरी वसु रसायनी.--**रा. नि.**

१८४ **सर्पिणी.**( सर्पिणी. )विषनाशक, स्तनवर्धक आहे.--**रा.नि.**

१८५ **वृश्चिका.** ( खाजकोलती. )–पिच्छल ( चिकट ), आंबट; व अंत्रवृद्धिनाशक आहे.– **रा. नि.**

१८६ **मत्स्याक्षी.** ( जलपिंपळी. ) – शीतळ, कडू, रुचिकारक; व व्रण, कफ यांची नाशक आहे.– **रा. नि.** मलभेदक आहे.–**द्र. नि**

ग्राही, वातुळ, पाककाळीं तिखट; व कफ, पित्त, रक्तदोष, कुष्ट यांची नाशक आहे.–के. नि.

१८७ गुंडाला. ( गोंडाळ. )–तिखट, कडू, उष्ण; व व्रण, सूज यांचें नाशक आहे.–रा. नि. कृमिनाशक आहे.–द्र. नि. थंड, सारक, त्रिदोषकारक; रूक्ष; व ज्वर, रक्तशोष यांचें नाशक आहे.–भा. प्र.

१८८ भूपाटली. ( भुईपाडळ. )–तिखट, उष्ण, पारदशुद्धिकर आहे.–रा. नि. बलकारक, वीर्यवर्धक आहे.–द्र. नि.

१८९ पांडुफली. ( पाटली, पांढरफली. )– थंड, मूत्रकृच्छ्रनाशक, रक्तदोषनाशक, बलकारक; व मूत्रघात, तृषा व पित्त यांची नाशक आहे.–रा. नि.

१९० केना. ( केना )–मधुर, थंड, दुग्धवर्धक, रुचिकारक आहे.– रा. नि. वीर्यवर्धक; व प्रमेह, रक्तपित्त यांची नाशक आहे.–द्र. नि.

१९१ ब्रह्मदंडी ( उटकटारी. )– तिखट, उष्ण; व कफ, सूज व वात यांची नाशक आहे.–रा. नि.

१९२ द्रवंती. ( लघुउंदीरकानी. )–मधुर, थंड, पारदबंधक, रसायनी; व ज्वर, कृमि, शूळ यांची नाशक आहे.–रा. नि.

१९३ द्रोणपुष्पी. ( कुंभा, गोमा. )– तिखट, उष्ण, रुचिकारक; व वात, कफ, अग्निमांद्य व वातज्वर यांचा नाशक आहे.–रा. नि. पाककाळीं मधुर, रूक्ष, भेदी; व वात, पित्त, कफ, आम, कावीळ, सूज यांचा नाशक आहे.–के. नि. जड, वीर्यवर्धक, कृमिनाशक आहे.– म. नि. तमकश्वासनाशक आहे.–भा प्र.

१९४ महाद्रोणा. ( देवकुंभा. )–तिखट, कडू, पारदशोधक, मलभेदक; व भूतदोष, वातरोग, कफ, अग्निमांद्य यांचा नाशक आहे.– रा. नि.

१९५ झेंडुक. ( झेंडू. )–तिखट, तुरट; आणि भूतज्वर नाशक आहे. –रा. नि. प्रमेहनाशक आहे.–द्र. नि.

१९६ गोरक्षदुग्धि. ( गोरखदुधी. )– मधुर, वीर्यवर्धक, संग्राही

थंड, वश्यकारक, पारदाची सिद्धि करणारी आहे.—रा. नि. मलस्तंभक; आणि प्रमेहनाशक आहे.—द्र. नि.

## ४. पिप्पल्ल्यादिवर्ग.

१९७ **पिप्पली.** ( पिंपळी. )—ज्वरनाशक, वीर्यवर्धक, स्निग्ध, उष्ण, तिखट, कडू, अग्निदीपक; आणि वात, श्वास, कास व कफ यांची नाशक आहे.—**रा. नि.** वात, कफ, क्षय यांची नाशक आहे.—**ध. नि.** ओली पिंपळी — थंड, जड, मधुर, स्निग्ध, कफकारक, जीर्णज्वरहारक आहे.—**भा. प्र.**

१९८ **गजपिप्पली.** (गजपिंपळी)—तिखट, उष्ण, रूक्ष, मलशोषण करणारी; कफ, वात यांची नाशक, आणि दूध व कर्ण यांस वाढविणारी आहे.—**रा. नि.** पाककाळीं तिखट, उष्णवीर्य, अग्निदीपक; व वात, कफ, कृमि, श्वास, अतिसार, कंठरोग यांची नाशक आहे. **वाळलेली पिंपळी**-हलकी, पाककाळीं मधुर, रसकाळीं तिखट, सारक; व कावीळ, कफ, गुल्म, कुष्ठ, कंठरोग यांची नाशक आहे.—**म. नि.** मूत्रकृच्छ्र, मूतखडा, फोड, योनिशूल यांची नाशक आहे.—**ग. नि.** मलभेदक, वीर्यवर्धक, पाककाळीं मधुर, पित्तकारक, रसायनी; व कास, उदर, कुष्ठ, गुल्म, मूळव्याध, आमवात, प्रमेह, शूल यांची नाशक आहे.—**म. नि.**

१९९ **सैंहली पिप्पली.** ( सिंहली पिंपळी. )— तिखट, उष्ण, कृमिहारक, अग्निदीपक, कोष्ठशोधक; आणि कफ, वात, श्वास यांची नाशक आहे.— **रा. नि.** शीत, रेचक, वीर्यवर्धक, आम व वात यांची शोधक आहे.— **द्र. र.**

२०० **वनपिप्पली.** ( रानपिंपळी. ) —रुचिकारक, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक आहे. ओली पिंपळी गुणांनीं अधिक असून वाळलेली गुणांनीं कमी आहे.— **रा. नि.**

२०१ **पिप्पलीमूल.** ( पिंपळमूळ. )—तिखट, उष्ण, कफ, कृमि, यांचें नाशक; अग्निदीपक, वातरोगनाशक, रुचिकारक, पित्तकारक

आहे.- रा. नि. श्वासकासनाशक आहे. - द्र. नि. उदरनाश पाचक, रूक्ष आहे.-म. नि. मलबद्धता, प्लीहा, गुल्म, क्षय य नाशक आहे.-भा. प्र.

२०२ शुंठी. ( सुंठ. )-तिखट, उष्ण, स्निग्ध; आणि कफ, शो शूळ, बद्धगुदोदर, श्वास, पोटफुगी, श्लीपद यांची नाशक आहे.-रा. नि आमवातनाशक व पाचक आहे.- म. नि. अरुचिनाशक, वीर्यवर्धक व वात, उदर, कास, पांडुरोग यांची नाशक आहे.-ध. नि. पाकक ळीं मधुर, मलसंग्राहक, हृद्य, सुस्वरकारक; व वात, कफ, हृद्रोग मूळव्याध, आम, उचकी, मलबद्धता, उलटी यांची नाशक व पित्तका रक आहे.-के. नि.

२०३ आर्द्रक. ( आलें. )- तिखट, उष्ण, हृद्य, पाककाळ शीतळ, अग्निदीपक, रुचिकारक; व सूज, कंठरोग, कफ यांचें नाशक आहे.-रा. नि. सारक आहे.-द्र. नि. मलभेदक, जड आहे.-म. नि.

२०४ मरिच. ( मिरें. )-तिखट, कडू, उष्ण, लघु, पित्तकारक व कफ, वात, कृमि, हृद्रोग यांचीं नाशक आहेत.-रा. नि. ओलीं मिरीं-फार उष्ण नसून पाककाळीं स्वादु, पित्तशामक, कफाला पातळ करणारीं व जड आहेत. वाळलेलीं मिरें-रसकाळीं व पाककाळीं उष्ण, लघु, अग्निदीपक, वीर्याला कमी करणारीं; व श्वास, शूळ यांची नाशक व शोषक आहेत.- ध. नि. पू व रक्त यांचीं नाशक, साधारण उष्ण, व फार पित्तकारक नाहींत अशीं आहेत.-द्र. र.

२०५ श्वेतमरिच. ( पांढरीं मिरें. ) - तिखट, उष्ण, विषनाशक, भूतबाधानाशक, वाताला कमी करणारीं, दृष्टिरोगनाशक असून, रसायन औषधांत घालण्यास योग्य आहेत.- रा. नि.

२०६ धान्यक. ( धणे. )-मधुर, थंड, तुरट, अग्निदीपक; व पित्त, कास, तृषा, ओकारी, कफ, ज्वर यांचे नाशक आहेत.-रा. नि. ज्वरातिसारनाशक आहेत.-द्र. नि. मूत्रल, लघु, रक्तमूळव्याधनाशक, ग्राही आहेत.-भा. प्र. नेत्रांस हितकारक, हृद्य, रुचिकारक, पाककाळीं

स्वादु, वीर्यवर्धक, मूत्रल, त्रिदोषनाशक, पाचक, उष्णवीर्य; व मलबद्धता, दाह, श्वास, गुदभ्रंश, कृमि यांचें नाशक आहे.—के. नि.

२०७ यवानी. (ओंवा)—तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक; व वात, मूळव्याध, कफ, पोटफुगी, कृमि, वांति यांचा नाश करणारा आहे.—रा. नि. आमवातनाशक, सारक आहे.—द्र. नि. रुचिकारक, पाचक, हृद्य, लघु, कफनाशक, पित्ताला वाढविणारा; व वीर्य, वात, उदर, मलबद्धता, गुल्म यांचा नाशक आहे.—के. नि. वात, कफ, गुल्म यांचा नाशक आहे.—म. नि. हृद्रोगनाशक आहे.—ग. नि.

२०८ चव्य. (चवक.)—तिखट, उष्ण, रुचिकारक, लघु, अग्निदीपक, कृमिनाशक; व खोकला, श्वास व शूल यांचें नाशक आहे.—रा. नि. कफवातनाशक आहे.—ध. नि. मूळव्याधनाशक आहे.—द्र. नि.

२०९ चित्रक. (चित्रक.) पाककाळीं अग्निसारखा, तिखट; व सूज, कफ, वात, उदर, मूळव्याध, कृमि, कंडू यांचा नाशक आहे.—रा. नि. कासनाशक आहे.—म. नि. उष्णवीर्य, अग्निदीपक, रूक्ष, रुचिकारक; व आम, सूज, कुष्ठ यांचा नाशक आहे.—के. नि. तिखट आहे ह्मणून कफाचा नाश करितो, उष्ण आहे ह्मणून वात नाश करितो, त्रिदोषांचा नाश करितो व अग्निदीपन करितो, व कडू आहे ह्मणून पित्त नाश करितो.

२१० रक्तचित्रक. (तांबडा चित्रक.) स्थूल शरीर करणारा, रोचक, कुष्ठनाशक, पारदनियामक, लोहवेधक रसायन आहे.—रा. नि.

२११ विडंग. (वावडिंगें.)—तिखट, उष्ण, लघु; आणि वात, कफ, अग्निमांद्य, अरुचि, भ्रांति, कृमि यांचीं नाशक आहेत.—रा. नि. गुल्मनाशक आहेत.—द्र. नि. मलावष्टंभनाशक आहेत.—के. नि. मलबद्धनाशक आहेत.—ग नि. पाककाळीं तिखट, रूक्ष, उष्णवीर्य; व पोटफुगी, आंव, शूल, मलावष्टंभ, प्रमेह, उदर यांचीं नाशक आहेत.—म. नि.

२१२ वचा. (वेखंड.)—तीक्ष्ण, तिखट, उष्ण; व कफ, आम-

ग्रंथि, सूज, वातज्वर, अतिसार, वांति, भूतबाधा, उन्माद यांचें नाशक आहे.-रा. नि.

२१३ श्वेतवचा. ( पांढरें वेखंड. )-अति गुणकारक; स्मृति, बुद्धि, आयुष्य यांस वाढविणारें; अग्निदीपक, वीर्यवर्धक; व कफ, वात, भूतबाधा, कृमि यांचें नाशक आहे.-रा. नि. मल व मूत्रशोधक आहे.-भावप्र. कंठास हितकर, बुद्धिवर्धक; व वात, कफ, कृमि, मलबद्धता, शूल, पोटफुगी यांचें नाशक आहे.-ध. नि. पाककाळीं तिखट, अग्निदीपक, आयुष्यवर्धक, स्वर उत्तम करणारें; व राक्षसपीडा, अपस्मार, जंतु यांचें नाशक आहे.-कै. नि.

२१४. कुलंजन. ( कोळिंजन. )-तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक व मुखरोगहारक आहे.-रा. नि. कफ, वात यांचें नाशक, सुस्वरकारक, रोचक; आणि हृदय, मुख, कंठ यांचें शोधक आहे.-द्र. नि. व भा. प्र.

२१५ जीरक. ( जिरें. )-तिखट, उष्ण, वातनाशक, अग्निदीपक; व गुल्म, पोटफुगी, अतिसार, संग्रहणी, कृमि यांचें नाशक आहे.-रा. नि. क्षयनाशक आहे.-द्र. नि. रूक्ष, रुचिकारक, संग्राही, चक्षुष्य ( डोळ्यांस हितकारक ), पित्तकारक, गर्भाशयशोधक, बुद्धिवर्धक, हृद्य, पाचक; आणि वांति, वात, कफ यांचें नाशक आहे.-कै. नि. बलकारक, वीर्यवर्धक, कफनाशक, ज्वरनाशक आहे.-भा. प्र.

२१६. श्वेतजीरक. ( पांढरीं जिरें. )-थंड, रोचक, तिखट, मधुर, अग्निदीपक, चक्षुष्य; व कृमि, विष, पोटफुगी यांचें नाशक आहे.-रा. नि.

२१७ कृष्णजीरक. ( शहाजिरें. )-तिखट, उष्ण, चक्षुष्य, ग्राही; व कफ, सूज, अरुचि, जीर्णज्वर यांचीं नाशक आहेत.-रा. नि. मस्तकरोगनाशक आहेत.-द्र. नि. रक्तपित्तशामक, गर्भाशयशोधक, कफपित्तहारक, वीर्यवर्धक व शूलनाशक आहेत.-ग. नि.

२१८ उपकुंचिका. ( कलोंजी. )-तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक;

व वात, गुल्म, आमदोष, कफ, पोटफुगी, अजीर्ण, कृमि यांची नाशक आहे.–रा. नि.

२१९ **अरण्यजीरक.** ( कडू कारेळें. )–तिखट, शीत, व्रणनाशक आहे.–रा. नि. स्तंभक, वातकफनाशक आहे.–द्र. र.

२२० **मेथिका.** ( मेथी. ) – तिखट, रक्तपित्ताला वाढविणारी; व कफ, अरुचि, अग्निमांद्य, वात यांची नाशक आहे.–रा. नि. दाह, वांति, कफ, खोकला, वातरक्त यांची नाशक आहे.– द्र. नि. वात, कफ, ज्वर यांची नाशक आहे.– म. नि.

२२१ **हिंगुपत्री.** ( बाफळी. )–तिखट, तीक्ष्ण, कडू, उष्ण, रोचक, अग्निदीपक, पाचक; आणि कफ, वात, आम, कृमि यांची नाशक आहे.– रा. नि. वातगुल्मनाशक आहे.—म. नि.—प्लीहा, मलबद्धता, मूळव्याध, गुल्म, हृदय व बस्ति यांतील शूळ यांची नाशक आहे.— ध. नि. कफनाशक आहे.–के. नि. अष्ठीलानाशक आहे.- द्र. नि.

२२२ **हिंगु.** ( हिंग. )—हृद्य, तिखट, उष्ण, चक्षुष्य; आणि कृमि, वात, कफ, मलबद्धता, पोटफुगी, शूळ, गुल्म यांचा नाशक आहे.--रा. नि. सारक, हृद्रोगनाशक आहे.— ध. नि. रक्तपित्तकारक; व श्वास, कास, उदर, मलबद्धता, अजीर्ण यांचा नाशक आहे.—के. नि. पित्त-वर्धक आहे.— म. नि.

२२३ **नाडीहिंगु.** ( डिकेमाली. )— तिखट, उष्ण; व कफ, वात, मलबद्धत्व, मलावष्टंभ यांची नाशक आहे.—रा. नि. आमनाशक, अग्निदीपक आहे.—ध.नि. गुल्म, प्लीहा, विष यांची नाशक आहे— द्र. नि.

२२४ **अग्निजार.** ( अग्निजार. )–उष्णवीर्य, तिखट, पित्तकारक; आणि उदर, वात, कफ, सन्निपात यांचा नाशक आहे.–रा. नि. हृद्रोग, कफ, शैत्य यांचा नाशक आहे.–ध. नि.

२२५ **रास्ना.** ( रास्ना. ) जड, कडू, उष्ण, पाचक; व वातरक्त, विष, कास, सूज, कफ यांचा नाशक आहे.—रा. नि. वात, उदर,

आम यांचा नाशक आहे.—ध. नि. श्वास, कास, विष, ज्वर, उचकी, शैत्य, आमवात, वातशूळ यांचा नाशक आहे.—ध. नि.

२२६ **स्थूलैला** ( थोर वेलदोडे. ) व **एला.** ( बारीक वेलदोडे ) —शीतळ, कडू; व पित्त, कफ, हृद्रोग, मळपीडा, पुंस्त्व यांचें नाशक आहेत.—**रा. नि.** मूतखड्याचे नाशक आहेत.—**द्र. नि.** बस्तिरोगनाशक आहेत.—**म. नि.** पित्त आणि गर्भ यांचे नाशक आहेत.—**ग. नि.** कफ, वात, विष, व्रण, बस्तिरोग यांचे नाशक असून, मुख, कंठ व मस्तक यांची शुद्धि करणारे आहेत.—**ध. नि.** रूक्ष, वामक; व मूत्रकृच्छ्र, मूळव्याध, श्वास, कास, कफ, पित्त, मंदाग्नि, अरुचि, कफ, पित्त, उचकी, तृषा, कंडू यांचे नाशक आहेत.—**के. नि.**

२२७ **सैंधव.** ( सैंधेलोण. ) – वीर्यवर्धक, चक्षुष्य, रुचिकारक अग्निदीपक; व त्रिदोष, व्रणदोष, मलबद्धत्व यांचें नाशक आहे.—**रा. नि.** हृद्य, शूलनाशक, स्निग्ध आहे.—**के. नि.** वांतिकारक आहे.—**ग. नि.**

२२८ **सौवर्चल** ( पादेलोण. )— लघु, खारट, तिखट, उष्ण; व वातगुल्म, ऊर्ध्ववात, आम, शूळ, मलबद्धत्व, अरुचि यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मूळव्याध, उदर यांचें नाशक आहे—**द्र. र.** उद्गारशुद्धिकारक आहे.— **म० नि०** अग्निदीपक, वातानुलोमक, रोचक; व शूळ, हृद्रोग, कफ, मलबद्धत्व, पोटफुगी, शूळ यांचें नाशक आहे.—**कैय. नि.** पित्तकारक, निर्मळ, लघु आहे.—**भा. प्र.**

२२९ **काचलवण.** ( बांगडखार )—रोचक, पित्तकारक, दाहकारक, कफवातहारक, अग्निदीपक; आणि गुल्म, शूल यांचा नाशक आहे.—**रा. नि.** रक्तपित्तनाशक, अतिउष्ण आहे.—**म नि.**

२३० **बीडलवण.** ( बीडलोण. )—उष्ण, अग्निदीपक, रोचक; आणि अजीर्ण, शूल, गुल्म, प्रमेह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** कफरोगनाशक आहे.—**ग. नि.** हृद्रोग, कफ यांचें नाशक, तीक्ष्ण व वातानुलोमक आहे.—**ध. नि.** ऊर्ध्वाधःकफनाशक, वातानुलोमक, रूक्ष, लघु,

व्यवायि ( अपक्कच साऱ्या देहाला व्यापून टाकणारें ); आणि मलबद्धत्व मलावष्टंभ, हृद्रोग यांचें नाशक आहे.—के. नि.

२३१ **सांभर.** ( सांभरलोण. )—उष्ण, किंचित् आंबट, मलनाशक, अग्निदीपक, कोष्ठशुद्धिकर; आणि कफ, वात, मूळव्याध यांचें नाशक आहे.—रा. नि.

२३२ **समुद्रलवण** ( मीठ. )—लघु, हृद्य, पलितकारक, रक्तदायक, पित्तकारक, दाहकारक, कफवातनाशक, अग्निदीपक आणि रोचक आहे. रा. नि. पाककाळीं मधुर; व वात, कफ यांचें नाशक आहे.—के. नि. जड, फार थंड नाहीं, पाककाळीं फार उष्ण नाहीं, मलभेदक, दाह न करणारें, स्निग्ध, शूलनाशक, फार पित्तकारक नाहीं.—ध. नि. कफवातहारक आहे.—द्र. नि. वातकारक आहे.—म. नि.

२३३ **द्रोणेय** ( द्रोणीचें मीठ. )—फार उष्ण नाहीं व दाहकारक नाहीं, मलभेदक, थोडें स्निग्ध, शूलनाशक आणि थोडें पित्तकारक आहे.—रा. नि.

२३४ **औखर** ( खारी मीठ. )—तिखट, खारट, कडू, वातकफ यांचे नाशक, दाहकारक, पित्तकारक, ग्राही, आणि मूत्राचा शोष करणारें आहे.—रा. नि. पाककाळीं तिखट, व्यवायी आहे.—ध. नि. शूल, रक्तदोष यांचें नाशक, आणि वातानुलोमन करणारें आहे.—द्र. नि. वातनाशक आहे.—भा प्र.

२३५ **रोमक** ( सोरा. )—तीक्ष्ण, अति उष्ण, तिखट, कडू, अग्निदीपक, दाह व शोषकारक, ग्राही आणि पित्तकोपकारक आहे.—रा. नि.

२३६ **अजमोदा** ( अजमोदा. )—तिखट, उष्ण, रूक्ष, रुचिकारक; आणि कफ, वात, शूल, पोटफुगी, उदररोग यांचा नाशक आहे.—रा. नि. बस्तिरोगनाशक आहे.—म. नि. कडू, अग्नीदीपक, पाककाळीं तिखट, रूक्ष; आणि उचकी, कृमि, मलबद्धता, ओकारी यांचा नाशक आहे.—ध. नि. हृद्य, वीर्यवर्धक; आणि नेत्ररोगनाशक आहे.—के. नि.

२३७ **रेणुका** ( रेणुकबीज. )—तिखट, शीतळ, मुखशुद्धिकर; आणि

खरूज, कंडू, तृषा, विष, दाह यांचें नाशक आहे.—रा. नि. पाककाळीं तिखट, बुद्धिवर्धक, पाचक, गर्भपातकारक; आणि कफ, वात यांचे नाशक आहे.—के. नि. पित्तकारक आहे.—द्र. नि. कफनाशक आहे.—ग. नि.

२३८ बोल. ( बोळ. )--तिखट, उष्ण, कडू, तुरट; आणि रक्तदोप कफ, पित्त, प्रदर यांचा नाशक आहे.--रा. नि. मलभेदक आणि प्रमेह, वात, कफ यांचा नाशक आहे.--द्र. नि. पुंस्त्वनाशक आहे.—ग. नि. बुद्धिवर्धक, गर्भाशयशोधक; आणि त्रिदोप, कुष्ठ, अपस्मार, रक्तदोप, ग्रह, ज्वर यांचा नाशक आहे.--के. नि. अग्निदीपक, शीतळ आणि पाचक आहे.—म. नि.

२३९ कर्चूर. ( कचोरा )—तिखट, कडू, उष्ण, मुखशुद्धिकर; आणि कफ, कास, गलगंड यांचा नाशक आहे.—रा. नि. त्रिदोष, मुखरोग, ज्वर यांचा नाशक आहे.—द्र. नि. लघु आणि श्वासनाशक आहे.—भा. प्र. रुचिकारक, अग्निदीपक; आणि वात, कफ, प्लीहा, गुल्म, मूळव्याध, कास यांचा नाशक आहे.—ध. नि. कुष्ठ, व्रग, वातगुल्म यांचा नाशक आहे.—म. नि. कफ, कृमि यांचा नाशक आहे.—ग. नि.

२४० पाठा. ( पहाडमूळ. )—कडू, जड, उष्ण; आणि वातपित्तज्वर, पित्त, दाह, अतिसार, अस्थिभंग यांचें नाशक आहे.—रा. नि. अजीर्णनाशक आहे.—द्र. नि. गुल्म आणि उदर यांचें नाशक आहे.—म. नि. विषनाशक आहे.—भा. प्र. ग्राही, वातुळ; आणि कुष्ठ, वांति, गुल्म, कंडू, विष, हृद्रोग, व्रण, शूल, श्वास, कृमि, पित्त, कफ, रक्तदोप यांचें नाशक आहे.—के. नि.

२४१ वृक्षाम्ल. ( अमसोल. )—आंबट, तिखट, तुरट, उष्ण; आणि कफ, मूळव्याध, तृषा, वात, उदर, हृद्रोग, गुल्म, अतिसार, व्रण यांचें नाशक आहे.—रा. नि. शूल, जंतु यांचें नाशक आहे.—भा. प्र. संग्राही, लघु; आणि वात, कफ यांचें नाशक आहे.—के. नि. खोकला, प्रमेह यांचें नाशक आहे.—द्र. नि.

२४२ **अम्लवेतस.** ( अम्लवेतस. )—अतिआंबट, तुरट, उष्ण; आणि कफ, मूळव्याध, वातगुल्म, अरोचक यांचें नाशक आहे—**रा. नि.** कफनाशक आहे.— **म. नि.** शेळीच्या मांसाचा द्राव करणारें; आणि प्लीहा ( पाणथरी ), उदावर्तरोग, उचकी, अजीर्ण, कफ, वात यांचें नाशक आहे.— **भा. प्र.** कडू, स्निग्ध, अग्निदीपक; आणि आम-नाशक आहे.—**ध. नि.** मलभेदक, लेखन, हृद्य, लघु, नेत्रांस हितका-रक; आणि कफ, रक्तपित्त, मलबद्धत्व, पोटफुगी, उचकी, शूल, वात, श्वास, कफ, वांति यांचें नाशक आहे.—**के. नि.**

२४३ **कटुकी.** ( कुटकी. )—अतितिखट, कडू, शीत, रेचकारक; आणि पित्त, रक्तदोष, कफ, अरोचक, श्वास, ज्वर, यांची नाशक आहे.— **रा. नि.** कामलानाशक आहे.—**म. नि.** विषमज्वरनाशक आहे.—**ध. नि.** मलभेदक, अग्निदीपक, रूक्ष; आणि कफ, पित्तज्वर, प्रमेह, श्वास, कास, कुष्ठ, कृमि, क्षय यांची नाशक आहे.—**के. नि.**

२४४ **अतिविषा.** ( अतिविष. ) —तिखट, उष्ण, कडू; आणि कफपित्तज्वर, आमातिसार, खोकला, विष, ओकारी यांचें नाशक आहे.— **रा. नि.** अग्निदीपक, पाचक; आणि कफ, पित्त, अतिसार, कृमि यांचें नाशक आहे. – **के. नि.** याचें बीज वात-शामक आणि वाजीकरण करणारें आहे. —**म. नि.**

२४५ **भद्रमुस्ता.** ( भद्रमोथा. ) —तुरट, कडू, शीत, पाचक, सं-ग्राही; आणि पित्तज्वर, कफ यांचा नाशक आहे. —**रा. नि.** कफ, रक्तातिसार, तृषा, कृमि यांचा नाशक आहे. – **ध. नि.** रक्तपित्तनाशक आहे. —**द्र. नि.** ग्राही, अग्निदीपक आहे—**भा. प्र.**

२४६ **नागरमुस्ता.** ( नागरमोथा. ) —कडू, तिखट, तुरट, शीत; आणि कफ, पित्तज्वर, अतिसार, अरुचि, तृषा, दाह, श्रम यांचा ना-शक आहे. —**रा. नि.**

२४७ **यष्टीमधु** ( ज्येष्ठमध. ) —मधुर, थोडें कडू, शीत, चक्षुष्य, रुचिकारक; आणि पित्त, शोष, तृषा, व्रण यांचें नाशक आहे —**रा. नि.** वीर्यवृद्धिकर, रसकाळीं गोड; आणि शोष, क्षय, विष, वांति, शीतपित्त यांचें नाशक आहे. —**ध. नि.** कांतिकर, स्निग्ध, वीर्योत्पादक, केशांना हितावह, स्वरकारक; आणि वातरक्त, विष, ओकारी ग्लानि, सूज यांचें नाशक आहे. —**के. नि.** क्षयनाशक आहे. —**भा. प्र.** व्रणशोधक आहे. — **ग. नि.**

२४८ **मधुवल्ली** ( वेली ज्येष्ठमध. )--मधुर, रुचिकारक, बलकारक, वीर्यवर्धक, शीतल, जड, चक्षुष्य; आणि व्रण, रक्तपित्त यांचें नाशक आहे.---**रा. नि.**

२४९ **भार्गी.** ( भारंग. ) ---तिखट, कडू, उष्ण; आणि कास, श्वास, सूज, व्रण, कृमि, दाह, ज्वर यांची नाशक आहे.,– **रा. नि.** वातनाशक आहे. ---**द्र. नि.** रक्तगुल्मनाशक आहे. --- **भा. प्र.** वातज्वर, उचकी यांची नाशक आहे. ---**ग. नि.** गुल्म, ज्वर, वातरक्त, क्षय, पीनस, ( पडसें ) यांची नाशक आहे, ---**ध. नि.** तुरट, लघु, अग्निदीपक, पाचक, रुक्ष; आणि सूज, कफ, वात, अरुचि, गुल्म, मूळव्याध, क्षय यांची नाशक आहे. --**के. नि.**

२५० **पुष्करमूल.** ( पुष्करमूल. )--तिखट, उष्ण, कडू; आणि कफवातज्वर, कास, अरुचि, कफ, सूज, पांडु यांचें नाशक आहे -- **रा. नि.** शूलनाशक आहे. **प्र. नि.** उचकी, सूज, पोटफुगी यांचें नाशक आहे. **ध. नि.** मलभेदक आणि ओकारी, पाठीचा शूल यांचें नाशक आहे.--- **के. नि.** सूजनाशक आहे --- **भा. प्र.**

२५१ **भृंगी.** ( काकडशिंगी. )— कडू, जड, उष्ण; आणि वात, उचकी, अतिसार, कास, श्वास, रक्तपित्त यांची नाशक आहे.—**ग. नि.** तृषानाशक आहे.— **भा. प्र.** उचकी, ऊर्ध्ववात यांची नाशक आहे.—

ध. नि. क्षय, अरुचि, ज्वर, ओकारी यांची नाशक आहे.– **के. नि.** कृशत्वनाशक आहे.– **म. नि.**

२५२ **लघुदंती.** ( दांती. ) –तिखट, उष्ण; आणि आंव, शूल, त्वग्दोष यांची नाशक आहे. –**रा. नि.** रसकाळीं कडू, उष्ण, अग्निदीपक, कफ, उदर, वातोदर, व्रण यांची नाशक आहे. –**ध. नि.** कफ, वात, मूळव्याध, गुल्म, क्षय यांची नाशक आहे. – **द्र. नि.** रक्तदोष, शूल, कुष्ठ, कंडू, कफोदर, दाह यांची नाशक आहे. –**भा. प्र.**

२५३ **बृहद्दंतिका.** ( थोर दांती. ) –तिखट, उष्ण, रेचक; आणि कृमि, शूल, कुष्ठ, आंव, उदर यांची नाशक आहे. —**रा. नि.** शूल, मूतखडा यांची नाशक आहे. –**द्र. र.** रसकाळीं व पाककाळीं तिखट, अग्निदीपक; आणि कफ, रक्तपित्त, कृमि, सूज, उदर यांची नाशक आहे. –**म. नि.** मलबद्धता, पाणथरी यांची नाशक आहे. —**ग. नि.**

२५४ **जेपाल.** ( जेपाल. ) —तिखट, उष्ण, रेचक अग्निदीपक; आणि कृमि, कफ, वात, उदर यांचें नाशक आहे. —**रा. नि.** मलभेदक, वांतिकारक; आणि कफ, उदर यांचें नाशक आहे.— **द्र. नि.** जड, स्निग्ध, रसकाळीं व पाककाळीं मधुर; आणि पित्तप्रकोप, कफ, कास यांचें नाशक आहे.— **भा. प्र०**

२५५ **त्रिवृत्.** ( तेड, निशोत्तर. )– कडू, तिखट, उष्ण, रेचक; आणि कृमि, कफ, उदर, कुष्ठ, कंडू, व्रण, यांचें नाशक आहे.– **रा. नि.** पित्तज्वरनाशक आहे.–**भा. प्र.** रूक्ष, मधुर; आणि कफ, पित्त, वात यांचें नाशक आहे.–**के. नि.**

२५६ **रक्तत्रिवृत्.** (रक्त निशोत्तर. )–रसकाळीं कडू, तिखट, उष्ण, रेचक; आणि संग्रहणी, मलबद्धत्व यांचें नाशक आहे.–**रा. नि.** काळें निशोत्तर–गुणांनीं कमी असून कंठाला आकर्षण करणारें; आणि मोह, मूर्च्छा, दाह, भ्रम यांचें नाशक आहे.– **के. नि.**

२५७ **त्वच.** ( दालचिनी. )–तिखट, शीत, कंठशुद्धिकारक; आणि कफ, कास, पांढरी आंव यांची नाशक आहे.–**रा. नि.** वीर्याला कमी करणारी, स्वच्छ; आणि हृद्रोग, बस्तिरोग, वात, मूळव्याध, पीनस, कृमि यांची नाशक आहे.–**म. नि.** अरुचि, कंडू यांची नाशक आहे. – **भा. प्र.** लघु, उष्ण, बस्तीला शोधन करणारी; आणि कफ, वात, विष, मस्तकरोग यांची नाशक आहे.–**ध. नि.** कडू, स्वादु, उष्ण, मधुर, रूक्ष, पित्तकारक, शुक्रनाशक; आणि हृद्रोग, बस्तिरोग, मूळव्याध, आमवात यांची नाशक आहे.– **के. नि.**

२५८ **तमालपत्र.** ( तमालपत्र. )–लघु, कडू, उष्ण, मुख व मस्तक यांचें शोधन करणारें; आणि कफ, वात, विष, बस्तिरोग, कंडू यांचें नाशक आहे.–**रा. नि** हल्लास ( उचकी ), अरुचि, मूळव्याध, यांचें नाशक आहे.–**ध. नि.** लघु, बुळबुळित, स्वरकारक, हृद्य; आणि कफ, कफपित्तरोग, क्षय यांचें नाशक आहे.– **के. नि.**

२५९ **नागकेशर.** ( नागकेशर. ) –किंचित् उष्ण, लघु, कडू; आणि कफ, बस्तिवात, आंव, कंठरोग, मस्तकशूल यांचें नाशक आहे.– **रा. नि.** विष, कंडू, शोष, वातरक्त यांचें नाशक आहे.–**ध. नि.** लघु, आंवेचें पाचन करणारें, रूक्ष; आणि पित्तरोग, कफ, ओकारी, कंडू, विसर्प, खुड्ड ( वातरक्त ) यांचें नाशक आहे.–**के. नि.** रक्तविकारनाशक आहे.– **द्र. नि.** दुर्गंधि, कुष्ठ, त्रिदोष यांचें नाशक आहे.– **म. नि.** उचकीनाशक आहे.– **भा. प्र.**

२६० **तवक्षीर.** ( तवखीर. )–मधुर, शीतळ; आणि दाह, पित्त, क्षय, कास, कफ, श्वास, रक्तदोष यांची नाशक आहे.– **रा. नि.** उन्हाळी, मूतखडा, मूत्ररोग यांची नाशक आहे–**द्र. नि.** बलकारक, वृष्य, धातूला वाढविणारी; आणि रक्तपित्त, अरुचि, ज्वर, कुष्ठ, कावीळ, पांडुरोग, तृषा यांची नाशक आहे.– **के. नि.**

२६१ **तालीसपत्र**. ( तालीसपत्र. )-कडू, उष्ण, मधुर; आणि कफ, वात, कास, उचकी, क्षय, श्वास, ओकारी यांचें नाशक आहे.- **रा. नि**. कृमिनाशक आहे.- **म. नि**. अग्निदीपक, हृद्य; आणि कफ, पित्त, मुखरोग, यांचें नाशक आहे.**ध.नि**-अरुचि, गुल्म, आंव, अग्निमांद्य, यांचें नाशक आहे.-**के. नि**. स्वरकारक आहे.-**द्र. नि**.

२६२ **वंशलोचना**. ( वंशलोचन. )-रूक्ष, तुरट, मधुर, थंड, रक्तशुद्धिकारक; आणि दाह, पित्तप्रकोप यांचें नाशक आहे.- **रा. नि**. कडू, बलकारक, धातुवर्धक; आणि खोकला, मूत्रकृच्छ्र, क्षय, श्वास, यांचें नाशक आहे.-**ध. नि**. कुष्ठ, पांडू, व्रण यांचें नाशक आहे.- **भा. प्र**. वीर्यवर्धक; आणि ज्वर, कामला, तृषा, रक्तपित्त यांचें नाशक आहे.-**म. नि.**

२६३ **मंजिष्ठा**. (मंजिष्ठ.)-रुचीनें मधुर, तुरट, उष्ण, जड; आणि व्रण, प्रमेह, कफ, ज्वर, विष, नेत्ररोग यांची नाशक आहे.- **रा. नि**. मळव्याधीची नाशक आहे.-**भा. प्र**. स्वरकारक, कांतिवर्धक; आणि योनिशूल, कफ, विसर्प, शोष, कुष्ठ, रक्तविकार, रक्तातिसार, वात, पित्त, यांची नाशक आहे- **के. नि**.

२६४ **हरिद्रा**. ( हळद. )-तिखट, कडू, उष्ण, कांतिकारक; आणि कफ, वातरक्त, कुष्ठ, मेह, कंडू, व्रण यांची नाशक आहे.-**रा. नि**. रूक्ष, कोष्ठशोधक; आणि विष, कृमि, पीनस, अरुचि यांची नाशक आहे.- **ध. नि**. कफ, पित्त, पांडु, अपची ( गंडमालेचा भेद ), त्वग्दोष, सूज यांची नाशक आहे. -**के. नि**. रक्तप्रमेहनाशक आहे. -**म. नि.**

२६५ **दारुहरिद्रा**. ( दारुहळद. )- तिखट, उष्ण, कडू; आणि व्रण, कंडू, प्रमेह, विसर्प, विष, त्वग्दोष, कर्णरोग, नेत्ररोग यांची नाशक आहे.- **रा. नि**. रूक्ष आणि मुखरोगनाशक आहे.- **ध. नि**. पांडुरोग, सूज, अपची यांची नाशक आहे.- **के. नि.**

२६६ **लाक्षा.** ( लाख. )--कडू, तुरट; आणि कफ, पित्त, विष, शोष, रक्तदोष, विषमज्वर यांची नाशक आहे.– **रा. नि.** उचकी-नाशक आहे.– **भा. प्र.** कृमि, कफ, व्रण, भूतज्वर यांची नाशक आहे.– **ध. नि.** थंड आणि त्रिदोषनाशक आहे.– **द्र. र.** कांतिकर, बलकारक, स्निग्ध; आणि रक्तपित्त, व्रण, उरःक्षत, विसर्प, कृमि, कुष्ठ यांची नाशक आहे.– **म. नि.**

२६७ **अलक्तक.** ( अलिता. )– कडू, उष्ण; आणि कफ, वात, कंठरोग, अरुचि, व्रण यांचा नाशक आहे.– **रा. नि.** वांग ( तोंडा-वरील पुळ्या ) नाश करणारा आहे.–**म. नि.**

२६८ **लोध्र.** ( लोध्र. ) – शीतळ, तुरट, चक्षुष्य; आणि कफ, रक्तदोष, विष, वात यांचा नाशक आहे.– **रा. नि.** रक्तप्रदरनाशक आहे.– **म. नि.** सारक आहे.– **के. नि.** ग्राही; आणि कफ, पित्त, अरुचि, तृषा, सूज, अतिसार, रक्तपित्त यांचा नाशक आहे.– **भा. प्र.** याचीं फुलें संग्राही आणि कफपित्तनाशक आहेत.

२६९ **श्वेतलोध्र.** ( पांढरा लोध्र. ) – हा गुणांनीं वर सांगित-ल्याप्रमाणेंच जाणावा.

२७० **धातकी.** ( धायटी. )– तिखट, उष्ण, मदकारक; आणि विष, प्रवाहिका, अतिसार, विसर्प, व्रण यांची नाशक आहे.–**रा. नि.** मलस्तंभक आहे.–**द्र. नि.** गर्भसंस्थापक, रक्तपित्तहारक आहे.– **ध. नि.** थंड, तुरट, तृषाशामक; आणि विसर्प, विष, अतिसार, जंतु यांची नाशक आहे. --**के. नि.**

२७१ **समुद्रफल.** ( समुद्रफळ. )–तिखट, उष्ण; आणि वात, भू-तबाधा, त्रिदोष, कफ, भ्रांति यांचें नाशक आहे.–**रा. नि.**

२७२ **निर्विषा.** ( निर्विषी. ) –तिखट, थंड, व्रणाला रोपण क-रणारी; आणि कफ, वातरक्त, अनेक प्रकारचीं विषें यांची नाशक आहे. –**रा. नि.** सूज आणि कफरोग यांची नाशक आहे. –**भा. प्र.**

२८३ **विष. वत्सनाभ.** ( बचनाग. ) —फार मधुर, उष्ण, पित्तशोधक; आणि वात, कफ, कंठरोग, सन्निपात यांचा नाशक आहे —**रा. नि.** योगवाही ( अनुपानानें सर्व रोग दूर करणारा ), रसायन ( शरीराची जरा दूर करणारा ), प्राणनाशक, व्यवायी ( जें औषध अपक्वच साऱ्या देहाला व्यापून मद्यासारखें पाकदशेप्रत जातें तें ), विकाशी ( जें औषध सर्वांगाचे संधीचीं बंधनें शिथिल करून रसादि धातूंपासून उत्पन्न झालेलें जें बळ त्याला शिथिल करितें तें ), मदकारक, दाहकारक आहे.– **भा. प्र.**

२७४ **आम्लनिशा.** ( आंबेहळद.) —कडू, उष्ण, आंबट, हृद्य; आणि ज्वर, रक्तदोष, कफ, कंडू, व्रण, मुखरोग यांची नाशक आहे. —**रा. नि.**–सन्निपातज्वर–कफ, खोकला यांची नाशक आहे.--**ध. नि-**

२७५ **गंधपत्रा.** ( कापूरकाचरी सारखी माळव्यांत होणारी हळदीची जात. )—तिखट, मधुर, तीक्ष्ण, उष्ण, पित्तकारक; आणि कफ, वात, खोकला, ओकारी, ज्वर यांची नाशक आहे. **रा. नि.** शूल, उचकी, श्वास यांची नाशक आहे. –**ध. नि.** मुखरोग, गुल्म यांची नाशक आहे. –**द्र. र.** ग्रहनाशक आहे. –**भा. प्र.**

२७६ **समुद्रफेन.** ( समुद्रफेस ) —थंड, तुरट, रुचिकारक; आणि नेत्ररोग, कफरोग, कंठरोग, कर्णरोग यांचा नाशक आहे.--**रा. नि.** डोळ्यांस हितकारक, लेखन ( जें रसादि धातु व वातादि दोष यांचें शोषण करून पातळ करतें तें ), थंड; आणि रक्तपित्त, विष, गुल्म, प्लीहा यांचा नाशक आहे. –**ध. नि.**

२७७ **अहिफेन.** ( अफू. ) –वृष्य, बलकारक, मोहकारक; आणि त्रिदोषनाशक आहे. **रा. नि.** ग्राही ( अग्नि प्रदीप्त करून आमादिकांचें पाचन करतें तें ), शोषक; आणि कफनाशक आहे. –**म. नि.**

२७८ **टंकण** ( टांकणखार. )— तिखट, उष्ण; आणि स्थावरादि विषें, खोकला, श्वास यांचा नाशक आहे. –**रा. नि.** अग्निदीपक, रूक्ष,

आणि वात, वांति यांचा नाशक आहे. —**के. नि.** ज्वरनाशक आहे. —**द्र. र.** वातपित्तकारक आहे.— **म. नि.**

२७९ **श्वेतटंकण.** ( पांढरा टाकणखार. ) –चिक्कण, तिखट, उष्ण; आणि कफ, वात, आंव, क्षय, श्वास, विष, खोकला, मलबद्धत्व यांचा नाशक आहे. —**रा. नि.**

२८० **साखरुंड.** ( साखरुंड, पडवास. ) – तुरट, रुचिकारक, अग्निदीपक, वस्त्ररंजक, लघु; आणि कफ, वात यांचें नाशक आहे.— **रा. नि.**

२८१ **हितावल्ली** ( हितावळी. ) रसकाळीं कडू; आणि प्लीहा, गुल्म, कृमि, मुळव्याध, खरूज, कंडू यांची नाशक आहे. – **रा. नि.**

२८२ **हस्तिमद.** ( हस्तिमद. )– स्निग्ध, कडू, केशांना हितकारक; आणि अपस्मार, विष, हृद्रोग, कुष्ठ, कंडू, व्रण, दाद, विसर्प यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

२८३ **स्वर्जिक्षार.** ( सज्जीखार. )–तिखट, उष्ण, तीक्ष्ण; आणि वात, कफ, गुल्म, पोटफुगी, कृमि, व्रण, उदररोग यांचा नाशक आहे.– **रा. नि.** अग्निमांद्य, मेदोरोग यांचा नाशक आहे.– **ध. नि.** शूलनाशक आहे.– **द्र. र.**

२८४ **लवणक्षार.** ( लोणारखार. )—अति उष्ण, तीक्ष्ण, पित्ताला वाढविणारा; आणि वातगुल्म, शूल यांचा नाशक आहे—**रा. नि.**

२८५ **वज्रक्षार.** ( नवसागर. )–खारट, अति उष्ण, तीक्ष्ण, रेचक, सारक; आणि गुल्म, उदर, मलबद्धत्व, शूल यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

२८६ **यवक्षार.** ( जवखार. )– तिखट, उष्ण, सारक, आणि कफ,वात, उदर, आंव, शूल, मूतखडा, विष यांचा नाशक आहे.– **रा. नि.** रूक्ष, अग्निदीपक, तीक्ष्ण, उष्ण, हृद्य; आणि रक्तपित्ताला कोपविणारा आहे.– **ध. नि.** मूळव्याध, प्लीहा, गुल्म, कंठरोग, मल-

बद्धता, पांडुरोग, संग्रहणी, श्वास यांचा नाशक आहे. — **के. नि.**

२८७ **सर्वक्षार.** ( साबण. )—अतिखारट, चक्षुष्य, बस्तिशोधक, वस्त्राला स्वच्छ करणारा; आणि गुदावर्त[1], कृमि यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

२८८ **मायाफल.** ( मायफळ. )– तिखट, उष्ण, योनिसंकोच-कारक, केशांना काळेपणा आणणारें; आणि वातनाशक आहे.—**रा. नि.**

## ५ मूलकादिवर्ग.

२८९ **मूलक.** ( मुळा. ) – तीक्ष्ण, उष्ण, तिखट, ग्राही, अग्निदी-पक, रुचिकारक, जड; आणि मूळव्याध, गुल्म, हृद्रोग, वात यांचा नाशक आहे.—**रा. नि.** ज्वर, नासारोग, कंठरोग, त्रिदोष यांचा नाशक आहे.—**भा. प्र.** भोजनाचे पूर्वी सेवन केला असतां पित्तका-रक, दाहकारक, स्निग्ध, मलावष्टंभक; आणि आंव, त्रिदोष, कफ, वातरोग यांचा नाशक आहे.-**ध. नि.** स्वरकारक, हृद्य, कोष्ठशुद्धिकारक; आणि दंतशूल, उदावर्त, पीनस, कफक्षय, श्वास, व्रण, नेत्ररोग यांचा नाशक आहे.—**के. नि.** तसेंच रूक्ष, दाहकारक आहे. वाळलेला मुळा—शोषहारक, आणि त्रिदोषनाशक आहे.— याचीं फुलें कफ-पित्तनाशक आहेत. याचीं फळें वातकफनाशक आहेत.

२९० **चाणाक्यमूलक.** ( थोर मुळा. )—ग्राही, तिखट, रुचिका-रक, अग्निदीपक, जड, उष्ण; आणि कफ, वात, कृमि, गुल्म यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

२९१ **गृंजन.** ( लालमुळा. ) – तिखट, उष्ण, रुचिकारक, अग्नि-दीपक, हृद्य; आणि कफ, वात, दुर्गंध, गुल्म यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

२९२ **पिंडमूलक.** ( वाटोळा मुळा. ) – तिखट, उष्ण; आणि वातगुल्मनाशक आहे.

---

[1] जो वायु गुदाचे ठायीं राहून मलाला बाहेर पडू देत नाहीं तो.

२९३ **गार्जर.** ( गाजर. ) –मधुर, रुच्य, थोडें तिखट; आणि कफ, पोटफुगी, कृमि, शूल, दाह, पित्त, तृषा यांचें नाशक आहे.— **रा.नि.** पाककाळीं तीक्ष्ण, उष्ण, दाहकारक, अग्निदीपक, हृद्य, ग्राही, रूक्ष, वीर्यकारक, रुचिदायक; आणि रक्तपित्त, नेत्ररोग, मूळव्याध, संग्रहणी, वात, कफ, कृमि यांचें नाशक आहे. –**के. नि.** शीतळ आहे. --**द्र. नि.** रक्तार्श ( रक्ती मूळव्याध ) नाशक आहे.—**म. नि.**

२९४ **शिग्रु.** ( पिंवळा शेवगा. )–तिखट, कडू, उष्ण, तीक्ष्ण, मुखजाड्यहारक, रुचिकारक, अग्निदीपक; आणि वात, कफ, व्रण-रोग यांचा नाशक आहे.–**रा.नि.** वात, कृमि, प्लीहा, विद्रधि ( गळू )–विष, आंव, गुल्म यांचा नाशक आहे.– **ध. नि.** पाककाळीं तिखट, रूक्ष, ग्राही, वीर्यवर्धक, हृद्य, चक्षुष्य, रक्तपित्ताला कोपविणारें; आणि कफ, वात, सूज, मेदोरोग, गंडमाला, अपची यांचा नाशक आहे. याचीं फुलें–ग्राही, तुरट; आणि वाताला कोपविणारीं आहेत. **याचें बीज.**–तीक्ष्ण, चक्षुष्य, उष्ण, मधुर आहे –**के. नि.** उदररोगनाशक आहे. —**द्र. नि. याच्या शेंगा**–कफ, पित्त, शूल, कुष्ठ, क्षय, श्वास यांच्या नाशक आहेत.

२९५ **शोभांजन.** ( काळा शेवगा. )–तीक्ष्ण, तिखट, मधुर, उष्ण, पिच्छल ( बुळबुळीत ), चक्षुष्य, रुचिकारक; आणि जंतु, वात, शूल यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

२९६ **श्वेतशिग्रु.** ( पांढरा शेवगा. ) रुचिकारक, अग्निदीपक, तिखट, तीक्ष्ण, उष्ण; आणि सूज, वात, अंगव्यथा यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

२९७ **रक्तशिग्रु.** ( रक्तशेवगा. )– अत्यंत वीर्यवान्, मधुर, रसा-यन; आणि सूज, पोटफुगी, वात, पित्त, कफ यांचा नाशक आहे.— **रा. नि. शेवग्याचीं पानें**—रुचिकारक, तिखट, उष्ण, अग्निदीपन, पाचक; आणि कफ, वात, कृमि यांचीं नाशक आहेत.— **ध. नि.**

२९८ **वंश**. ( वेळू. )—आंबट, तुरट, किंचित् कडू, थंड; आणि मूत्रकृच्छ्र, प्रमेह, मूळव्याध, पित्त, दाह, रक्तदोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

२९९ **रंध्रवंश.** ( पोकळ वेळू. ) — अग्निदीपक, रुचिकारक, पाचक, हृद्य; आणि अजीर्ण, गुल्म, शूल यांचा नाशक आहे.

३०० **वंशांकुर.** ( वेळूचे अंकुर )— तिखट, कडू, आंबट, तुरट, लघु, शीतळ, रुचिकारक; आणि रक्तपित्त, दाह, मूत्रकृच्छ्र यांचे नाशक आहेत.– **रा. नि.** बस्तिशुद्धिकर, मलभेदक; आणि कफ, रक्तपित्त, कुष्ठ, सूज, व्रण, बहुमूत्ररोग, कफ यांचे नाशक आहेत.

३०१ **वेत्र** ( थोर वेत. )—शीतळ, तुरट; आणि भूतबाधा व पित्त यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

३०२ **मार्कंदी**. ( माईणमूळ. )— तिखट, कडू, मधुर, अग्निदीपक, रुचिकारक, किंचित् वातुळ, पथ्य; आणि पावसाळ्यांत अहितकारक आहे.–**रा. नि.**

३०३ **शोली**. ( रानहळद सोली. )—तिखट, मदकर, रुचिकारक, कडू; आणि अग्निदीपक आहे.–**रा. नि.**

३०४ **शृंगाटक.** ( शिंगाडे. )—सारक, लघु, वृष्य, रुचिकारक, मूत्रकारक; आणि रक्तपित्त, पित्त, भ्रम, शोष, त्रिदोषज्वर यांचे नाशक आहेत.—**रा नि.**

३०५ **भृंगाव्हा** ( भंवरसाळी. ) — तिखट, ऊष्ण, कडू, अग्निदीपक, रुचिकारक आहे.—**रा. नि.**

३०६ **पेऊ**. ( रान आलें. )— तिखट, आंबट, रुचिकारक, बलकारक, अग्निदीपक आहे.–**रा. नि.**

३०७ **रसोन**. ( पांढरा लसूण. )– आंबट, जड, उष्ण, रसायन, तिखट, चिक्कण, बुळबुळित, बलकारक, वृष्य, भग्नास्थीला सांधणारा,

बुद्धिवर्धक, स्वरकारक, कांतिवर्धक, जड, मधुर, तीक्ष्ण, चक्षुष्य; आणि कफ, वात, अरुचि, कृमि, हृद्रोग, सूज यांचा नाशक आहे.– **रा. नि.** श्वासकारक आहे.–**ध.नि.** रक्तपित्तकारक आहे.–**म. नि.** पीनस, खोकला यांचा नाशक आहे.– **ग. नि.**

३०८ **महाकंद.** ( लाल लसूण. ) –मधुर, तिखट आहे. याचा देंठ तुरट, पानें कडू, आणि याचा गाभा खारट आहे. तसेंच हा हृद्रोग, जीर्णज्वर, कांखेंतील शूल, मलबद्धता, गुल्म, अरुचि, मूत्रकृच्छ्र, सूज, मूळव्याध, कुष्ठ, वात, जंतु, कफ यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

३०९ **पलांडु.** ( पांढरा कांदा. )–तिखट, बलकर, जड, वृष्य, रुचिकारक, चिक्कण; आणि कफ, पित्त, वांति यांचा नाशक आहे.— **रा. नि॰** वीर्यकारक आहे. –**म. नि.** लसुणाप्रमाणें याचे गुण असून कफकारक, जड, मधुर; आणि वातरक्त, पित्त, कृमि यांचा नाशक आहे. –**भा. प्र.** क्षीर पलांडु, ( दुधासारखा पांढरा कांदा )— वृष्य, मधुर, बुळबुळित आहे. –**ध. नि.** याचें बीज वातुळ, कृमिनाशक, शीतळ आहे.– **द्र. नि.** वृष्य, मोहकारक; आणि वातरोग, मूळव्याध, कफ यांचा नाशक आहे. —**ग. नि.**

३१० **राजपलांडु.** ( तांबडा कांदा. ) —थंड, अग्निदीपक, पुष्कळ निद्राकारक; आणि पित्त, कफ यांचा नाशक आहे. –**रा. नि.**

३११ **सूरण.** ( सूरण. ) तिखट, रुचिकारक, अग्निदीपक; आणि कृमि, कफ, वात, श्वास, खोकला, वांति, मूळव्याध, शूळ, गुल्म, रक्तदोष यांचा नाशक आहे. —**रा. नि.** आमहारक आणि पाचक आहे. —**ध. नि.** निर्मळ, रूक्ष, मलावष्टंभक तुरट; आणि कफ, मूळव्याध यांचा नाशक आहे.— **के. नि.** सर्व कंदशाकांत सूरण श्रेष्ठ आहे. खरूज, रक्तपित्त, कुष्ठ रोगांत सेवन करणें हितावह नाहीं. कंडकारक आहे.—**भा. प्र.**

३१२ **अरण्यसूरण**. ( रानसूरण. )—रुचिकारक, तिखट, उष्ण; आणि कृमि, गुल्म, शूल, अरुचि यांचा नाशक आहे.—**रा. नि.** पित्तकर, रुक्ष, हृद्य; आणि कफनाशक आहे.— **द्र. नि.**

३१३ **मुखालु**. ( गोराडू. )—मधुर, शीतळ, पित्तशामक, रुचिकारक, आणि वातकारक आहे.— **रा. नि.** दाह, शोष, तृषा, रक्तदोष नाशक आहे.— **द्र. नि.**

३१४ **पिंडालु**. ( कनक. ) — मधुर, शीतळ, वृष्य, तृप्तिकारक, जड; आणि मूत्रकृच्छ्र, दाह, शोष, प्रमेह यांचा नाशक आहे.— **रा. नि.** पचण्यास कठिण आहे.—**द्र. नि.**

३१५ **रक्तपिंडालू**. ( लाल रताळूं. ) शीतळ, मधुर, आंबट, वृष्य, जड, बलकर; आणि श्रम, पित्त, दाह यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

३१६ **कासालु**. ( कासाळूं ) —मधुर, पथ्य, अग्निदीपक; आणि उग्रकंडू, वात, कफ, अरुचि यांचें नाशक आहे. —**रा. नि.**

३१७ **फोंडालु**. ( फोंडाळू. )— तिखट, ऊष्ण, अग्निदीपक; आणि कफ, वांत यांचें नाशक आहे.— **रा. नि.**

३१८ **पानीयालु**. ( पाणअळूं. ) —तृप्तिकारक आणि त्रिदोषनाशक आहे.— **रा. नि.**

३१९ **नीलालु**. ( काळें अळूं. ) – मधुर, शीतळ; आणि श्रम, दाह यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

३२० **महिषीकंद**. ( महिषीकंद. ) —तिखट, उष्ण, रुचिकारक, महासिद्धिदायक; आणि कफ, वात, मुखजाड्य यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

३२१ **हस्तिकंद**. ( हस्तिकंद. ) – तिखट, कडू; आणि कफ, वात, त्वग्रोग, श्रम, कुष्ठ, विष, विसर्प यांचा नाशक आहे. —**रा. नि.**

३२२ **कोलकंद**.— ( कोलकांदा. ) तिखट, उष्ण; आणि विष, वांति, कृमि यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

३२३ **वाराही** ( डुकरकंद. ) – कडू, तिखट, वृष्य, बलकर, रसायन; आणि विष, पित्त, कफ, कुष्ठ, प्रमेह, कृमि यांचा नाशक आहे.–**रा. नि.** वात, कफ यांचा नाशक आहे. –**द्र. नि.** मधुर आणि वीर्यवर्धक आहे.– **म. नि.** उष्ण; आणि मूत्ररोगनाशक आहे.–**ग. नि.**

३२४ **विष्णुकंद**.— मधुर, थंड, रुचिकर, तृप्तिदायक; आणि पित्त, दाह, सूज यांचा नाशक आहे –**रा० नि०**

३२५ **धरणीकंद.** ( धरणीकंद. ) — मधुर; आणि कफ, पित्त, मुखरोग, कंडू, कुष्ठ यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

३२६ **नाकुली.** ( मुंगुसकांदा. )– ३२७ **गंधनाकुली**. ( सुगंधमुंगसकांदा ) – कडू, तिखट, उष्ण; आणि त्रिदोष व अनेक प्रकारचीं विषें यांचा नाशक आहे.– **रा. नि.** व्रणाला भरून आणणारा; आणि कृमि, विंचू व सर्पादिकांचें विष यांचा नाशक आहे.– **ध. नि.** सात प्रकारच्या लूतांचा नाशक आहे.— **के. नि.**

३२७ **मालाकंद**. ( मालाकंद. ) – अग्निदीपक, तीक्ष्ण; आणि गंडमाला, गुल्म, वात, कफ यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

३२८ **विदारीकंद**. ( भुईकोहळा. ) – मधुर, शीत, जड, स्निग्ध, बलकर, वीर्यवर्धक, कफकर; आणि रक्तपित्तनाशक आहे.– **रा. नि.** वातनाशक आहे.– **ध. नि.** स्वरकारक आहे.– **के. नि.** कांतिकर, दुग्धवर्धक आहे.– **द्र. नि.** वांति, रक्तदोष, वात यांचा नाशक आहे.– **म. नि.**

३२९ **क्षीरविदारी**. ( श्वेत भुईकोहळा. ) – मधुर, आंबट, तुरट, कडू; आणि पित्त, शूल, मूत्रप्रमेह यांचा नाशक आहे.– **रा. नि.** श्वेतभुईकोहळा दोन प्रकारचा आहे. एक बीन देठाचा आणि दुसरा देठाचा. बीन देठाचा, रोगाला हरण करणारा असून, देठाचा शरीराची जरा दूर करणारा आहे.

२३० **शाल्मलीकंद.** ( सांवरीकंद. )—मधुर, थंड; आणि मलबद्धता, पित्त, दाह, शोष, संताप यांचा नाशक आहे. —**रा. नि.**

२३१ **चंडालकंद.** ( चंडालकंद. ) –मधुर, रसायन; आणि कफ, पित्त, रक्तदोष, विष, भूतबाधा यांचा नाशक आहे. –**रा. नि.**

२३२ **तैलकंद.** ( तेल्याकंद. )–लोहाचें द्रावण करणारा, तिखट, उष्ण, पारदबंधक, देहाची शुद्धि करणारा; आणि विष, वात, अपस्मार, सूज यांचा नाशक आहे. –**रा. नि.** याचीं पानें कण्हेरीच्या पानासारखीं असून त्यांवर तिळाप्रमाणें बिंदु असतात, व हा ज्या जमिनींत असतो ती जमीन तेलकट झालेली असते.

२३३ **त्रिपर्णीकंद.** ( त्रिपर्णीकंद. )— मधुर, थंड; आणि दमा, खोकला, व्रण, पित्त, विष यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

२३४ **लक्ष्मणाकंद.** ( लक्ष्मणाकंद. )– मधुर, शीतळ, रसायन, बलकर; आणि वंध्यादोष, त्रिदोष यांचा नाशक आहे.–**रा. नि.** रूक्ष, वृष्य, थंड; आणि पित्त, वात यांचा नाशक आहे.– **के. नि.**

२३५ **हस्तजोडिका.** ( हातजोडी. ) – वशकारक, आणि पारदबंधक आहे.– **रा. नि.**

२३६ **मुसलीकंद.** ( काळी मुसळी. ) –मधुर, शीतल, वृष्य, पुष्टिदायक, बलप्रद, बुळबुळित, कफकारक; आणि पित्त, दाह, भ्रम यांची नाशक आहे. ––मुसली दोन प्रकारची आहे. पांढरी व काळी. पांढरी गुणांनीं कमी असून काळी रसायन ( शरीराची जरा दूर करणारी ) आहे. –**रा. नि.** मूळव्याध आणि वात यांची नाशक आहे.–**के. नि.**

२३७ **गुच्छकंद.** ( गुच्छकद. ) – मधुर, शीतळ, वृष्य, तृप्तिकारक; आणि दाहनाशक आहे –**रा. नि.**

२३८ **वास्तुक.** ( चाकवत. ) –मधुर, शीत, खारट, स्वच्छ,

रुचिकारक, मलमूत्रादिकांची शुद्धि करणारा; आणि त्रिदोष, ज्वर, मूळव्याध यांचा नाशक आहे. – **रा. नि.** पाचक, हृद्य, सारक, बुद्धिवर्धक, अग्निदीपक, बलकारक, वीर्यवर्धक; आणि रक्तपित्त, कृमि, प्लीहा, उदावर्त यांचा नाशक आहे.– **के. नि.**

३३९ **चुक्र.** ( चुका. ) – आंबट, लघु, उष्ण, रुचिकारक, अग्निदीपक, पथ्य, किंचित् पित्तकारक; आणि वातगुल्मनाशक आहे.– **रा. नि.**

३४० **चिल्लिका.**– ( रक्तचील, चंदनबटवा. ) – चील गुणानें चाकवताप्रमाणें असून खारट, पथ्य, रुचिकारक; आणि कफ, पित्त, प्रमेह, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे.–**रा. नि.**

३४१ **श्वेतचिल्ली.** ( पांढरी चील. ) –मधुर, खारट, थंड, त्रिदोषशामक, पथ्य; आणि ज्वरनाशक आहे. –**रा. नि.**

३४२ **शुनकचिल्ली.** ( कुत्तरचील. ) – तिखट, तीक्ष्ण; आणि कंडू, व्रण यांची नाशक आहे. – **रा. नि.**

३४३ **शिग्रुपत्रशाक.** ( शेवग्याच्या पानांची भाजी. ) – रुचिकारक, तिखट, उष्ण, अग्निदीपक, पथ्य, पाचक; आणि वात, कफ, कृमि यांची नाशक आहे.– **रा. नि.**

३४४ **पालक्य.** (पालख.)– किंचित् तिखट, मधुर, पथ्य, शीतळ, ग्राही, तृप्तिकारक; आणि रक्तपित्तनाशक आहे.– **रा. नि.**

३४५ **राजगिरा.** ( राजगिरा. ) – रुचिकारक, शीतळ; आणि पित्तशामक आहे. थोर राजगिरा अति शीतळ, आणि रुचिकारक आहे.– **रा. नि.**

३४६ **उपोदकी.** ( थोर मयाळ, ) –तुरट, उष्ण, मलबद्धक, कफकारक, तिखट, मधुर, रुचिकारक; आणि निद्रा व आलस्य यांना करणारी आहे.–**रा. नि.** शीतळ, वीर्यकारक आहे. –**द्र. नि.** प्रमेहनाशक आहे.– **ग. नि.**

३४७ **क्षुद्रोपोदकी.** ( लहान मयाळ. )-- लहान मयाळ ही गुणांनीं थोर मयाळीसारखीच आहे.– **रा. नि.**

३४८ **वनजोपोदकी.** ( रान मयाळ. )— कडू, तिखट, उष्ण आणि रुचिकारक आहे.–**रा. नि.**

३४९ **मूलपोती.** ( मळ्यांतील मयाळ.)– त्रिदोषशामक, वृष्य, बलकर, लघु, पुष्टिकारक, रुचिकर आणि अग्निदीपक आहे.— **रा. नि.**

३५० **कुणंजर.** ( कुंजीर. )—मधुर, रुचिकर, अग्निदीपक, किंचित् तुरट, संग्राही, लघु; आणि त्रिदोष, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

३५१ **कौसुंभशाक.** ( कर्डईची भाजी. )—मधुर, तिखट, उष्ण, नेत्रांना अहितावह, रुचिकारक, अग्निदीपक; आणि मलमूत्रदोष, मद यांची नाशक आहे.—**रा. नि.**

३५२ **शतपुष्पादल.** ( शेपूची भाजी. )–उष्ण, मधुर, अग्निदीपक, पथ्यकर, पित्तकारक, रुचिदायक; आणि गुल्म, शूल, वात यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

३५३ **तंडुलीयपत्र.** ( तांदुळजा. )–शीतळ, ग्राही, मधुर, रुचिदायक; आणि मूळव्याध, रक्तपित्त, विष, खोकला, दाह, शोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

३५४ **राजिकापत्र.** ( मोहरीची भाजी. )—तिखट, उष्ण, मधुर, अग्निदीपक; आणि कृमि, वात, कफ, कंठरोग यांची नाशक आहे.–**रा. नि.**

३५५ **सार्षपपत्र.** ( शिरस व पानांची भाजी. ) —अतिउष्ण, दाहकारक, तिखट, मधुर, वीर्यहारक, रुचिकारक आहे. –**रा. नि.**

३५६ **चांगेरीशाक.** ( आंबवंतीची भाजी. )– अति उष्ण, तिखट,

रुचिकर, पाचक, अग्निदीपक; आणि कफ, वात, मूळव्याध, संग्रहणी, अतिसार यांची नाशक आहे.—रा. नि.

२५७ **क्षेत्रजघोली.** ( शेतांतील घोळ. )–खारट, रुचिकर, आंबट; आणि वात, कफ यांची नाशक आहे.–रा. नि.

२५८ **आरामघोलिका.** ( मळ्यांतील घोळ. )–आंबट, रूक्ष, रुचिकारक; आणि वातनाशक आहे.–रा. नि.

२५९ **सूक्ष्मघोलिका.** ( चिलघोळ. )–पित्तकारक आणि जीर्णज्वरनाशक आहे.–रा. नि.

२६० **जीवशाक.** ( जीवशाक. )–मधुर, धातुवर्धक, बस्तिशोधक, पित्तशामक, अग्निदीपक, बलकर, पाचक, वीर्यवर्धक; आणि त्रिदोष नाशक आहे.–रा. नि.

२६१ **[illegible].** ( [illegible] शाक. )–शीतळ, पथ्यकर; आणि कफ, पित्त, ज्वर, दाह, अरुचि, भ्रांति, रक्तदोष, श्रम यांची नाशक आहे.–रा. नि.

२६२ **[illegible].** ( पांढऱ्या [illegible] भाजी. )

२६३ **[illegible].** ( पांढऱ्या वसूची भाजी. )—ह्या दोन्ही रूक्ष; आणि व्रण, कफ, अग्निमांद्य, गुल्म, प्लीहा, शूल यांच्या नाशक आहेत.—रा. नि.

२६४ **फंजिका, जीवन्ती, पद्मा, तर्कारि, चंचुका.** ( फांज, हरणदोडी, भारंग, नरवेल, चोंच. ) – ग्राही, अग्निदीपक, रुचिकर; आणि वातनाशक आहेत. —रा० नि०

२६५ **फंजादिशाक.**– (फांज वगैरे भाज्या. ) –अग्निदीपक, पाचक, रुचिकर, बलकर, कांतिकर, पथ्यकर, ग्राही, वीर्यवर्धक, सुखकर, आणि त्रिदोषनाशक आहे.— रा. नि.

२६६ **कूष्मांडी.** ( कोहळा. )—मलमूत्रकारक, तृषाशामक, कृशत्व आल्यास पुष्टिप्रद, वृष्य, मधुर, बलकर; आणि मूत्राघात, प्रमेह,

मूत्रकृच्छ्र, मूतखडा, अरुचि, पित्त यांचा नाशक आहे.—रा० नि० हृद्य, बस्तिशुद्धिकारक; आणि वात, पित्त, [illegible]विभ्रम यांचा नाशक आहे.—ध. नि. रूक्ष; आणि कफवातनाशक आहे.—कै. नि. रक्तपित्त आणि वात यांचा नाशक आहे.

३६७ **गोरक्षतुंडी.** ( थोर वाळोळा दुध्या भोंपळा. ) —मधुर, शीतळ, जड, रुचिकारक, तृप्तिकारक, बलकर, वीर्यदायक, पुष्टिकर; आणि पित्तनाशक आहे.—**रा. नि.**

३६८ **दुग्धतुंबी** ( दुध्याभोंपळा. )—मधुर, स्निग्ध, गर्भपोषक, वृष्य, वातुळ, बलकर, पुष्टिदायक; आणि पित्तनाशक आहे.—**रा. नि.** शीतळ आहे.— **ध. नि.** मलावष्टंभक आणि कफ, पित्त यांचा नाशक आहे.— **कै. नि.**

३६९ **[illegible]** ( [illegible] )—[illegible] आणि [illegible], दांतखिळी, [illegible] यांची नाशक आहे.— **रा. नि.**

३७० **[illegible]** ( [illegible] )—मधुर, शीतळ, वृष्य, तृप्तिकारक, बलकर, वीर्यकारक, [illegible] आणि [illegible] यांचा नाशक आहे.—**रा. नि.** ग्राही, जड, मलावष्टंभक, [illegible] करणारें, कफवातनाशक; आणि वीर्य. पित्त यांचे नाशक आहे. पक्व फळ—शीतळ, उष्ण; आणि कफ, वात यांचे नाशक आहे.— **कै. नि.**

३७१ **[illegible]कोशातकी.** ( ढोडका )—स्निग्ध, मधुर, किंचित् वातुळ, पथ्यकर, रुचिकारक, बलकर, वीर्यधारक; आणि कफपित्तनाशक आहे.—**रा. नि.**

३७२ **हस्तिकोशातकी.** ( घोसाळें. )—स्निग्ध, मधुर; आणि [illegible] व वात यांस करणारें; वृष्य, कामकारक; आणि व्रणाला भरून आणणारें आहे.—**रा. नि.** ज्वराचे अंगीं हितकारक आहे. —**ध. नि.** जड आणि कफकर आहे.—**कै. नि.** वातनाशक आहे.—**द्र. नि.** शीतळ, अग्निदीपक; आणि पित्त, श्वास, ज्वर यांचे नाशक आहे. —**म. नि.**

३७३ **स्वादुपटोली.** ( पडवळ. ) –मधुर, रुचिकारक, बलपुष्टिकारक, पथ्यकर, अग्निदीपक, पाचक; आणि पित्त, ज्वर यांचें नाशक आहे. पडवळाचें पान पित्तनाशक, देंठ कफनाशक, फळ त्रिदोषनाशक आणि मूळ रेचक आहे. — **रा० नि०** त्रिदोषनाशक आहे.— **ध. नि.** हृद्य, सारक, उष्ण; आणि कफ, पित्त, कंडू, दाह, तृषा, फोड, कुष्ठ, ज्वर, रक्तदोष यांचें नाशक आहे.– **के. नि.**

३७४ **दधिपुष्पी**. ( गोडी कुहिरी. )— मधुर, तिखट, शीतळ, जड, वातुळ, रुचिकर; आणि संताप, पित्त यांची नाशक आहे.— **रा. नि.** वातपित्तनाशक आहे.– **द्र. नि.** उष्ण, वीर्यकारक, अग्निवर्धक, बलकर, मलकारक; आणि वात, कफ, पित्त यांची नाशक आहे.– **भा. प्र.**

३७५ **खड्गशिंबी.** ( खरसंबळ. )– मधुर, तुरट, शीतळ, रुचिकर, अग्निदीपक; आणि कफ, पित्त, व्रणरोग यांची नाशक आहे.– **रा. नि.** बलकर, कफकर; आणि वात, कफ, दाह, यांची नाशक आहे.– **के. नि.** कफवातनाशक आहे.– **द्र. नि.**

३७६ **कारवल्ली**. ( कारली. )— कडू, उष्ण, अग्निदीपक; आणि कफ, वात, अरोचक, रक्तदोष यांची नाशक आहे.– **रा. नि.** कामलानाशक आहे.– **म. नि.** अवृष्य; आणि वात, रक्तपित्त, कृमि, पांडु, व्रण, कास, श्वास, प्रमेह, कुष्ठ, पोटफुगी, ज्वर यांची नाशक आहे.– **के. नि.**

३७७ **कर्कोटकी**. ( कर्टोली. )– तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर; आणि विष, वात, पित्त यांची नाशक आहे.— **रा. नि.** कफ, विष, द्विदोष यांची नाशक आहे. कंद, मस्तकशूलनाशक आहे.– **ध. नि.** किलासकुष्ठ, चित्रकुष्ठ यांची नाशक आहे.– **के. नि.** उचकीची नाशक आहे.– **म. नि.** श्वास, कास, ज्वर यांची नाशक आहे.– **भा. प्र.**

३७८ **स्वादुतुंडिका.** (गोड तोंडली.)– मधुर, शीतळ, रम्य; आणि पित्त, श्वास, कफ, रक्तज्वर, खोकला यांची नाशक आहे.– **रा. नि.** वातुळ, कफकारक, संग्राही, पाककाळीं तिखट, वातकारक, पोटफुगीस उत्पन्न करणारी, मलबद्धकारक; आणि क्षय, सूज, कामला, रक्तपित्त यांची नाशक आहे.– **के. नि.** रक्तपित्त, सूज, पांडु यांची नाशक आहे.– **ध. नि.** इचें फल बुद्धिनाशक, दुग्धवर्धक आहे. इचें मूळ वीर्यप्रद, शीतळ; आणि प्रमेहनाशक आहे.– **द्र. र.** [illegible]नाशक आहे.– **म. नि.** वांतिहारक आहे.– **ग. नि.**

३७९ **निष्पावी.** (थोरघेवडा.) **लघुनिष्पाका** (लघु घेवडा.)– तुरट, मधुर, सारक, कंठशुद्धिकर, बुद्धिवर्धक, अग्निदीपक, रुचिकारक, संग्राही, समवीर्य, आणि दुसरा गुणांनीं किंचित् श्रेष्ठ आहे.— **रा. नि.** कफपित्तनाशक आहे. – **द्र. नि.**

३८० **वार्ताकी.** (वांगं.)– तिखट, रुचिकारक, मधुर, बलकर, पुष्टिकर, हृद्य, जड, वातकारक; आणि पित्तनाशक आहे.–**रा. नि.** मधुर, उष्ण, तीक्ष्ण, पाककालीं तिखट, अग्निदीपक; वीर्यवर्धक, आणि कफवातनाशक आहे.– **ध. नि.** ज्वर, खोकला, कृमि यांचें नाशक आहे. पिकलेलें पित्तकारक आहे. कोंवळें पित्तकफनाशक आहे.—**के. नि.** वांगं पित्तकारक असून विस्तवावर भाजलें असतां तें हलकें, अग्निदीपक; आणि कफ, मेदोरोग, वात, आंव यांचें नाशक आहे. तसेंच मीठ व तेल यांत पचन केलें असतां जड आणि स्निग्ध आहे.–**भा. प्र.**

३८१ **डंगरी.** (तांबडा भोंपळा.) —शीतळ, रुचिकारक, तृप्तिकारक, मदकर; आणि दाह, रक्तपित्त, शोष, जडत्व, मूत्रावरोध, यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

३८२ **षड्भुजा.** (खरबूज.)–तृप्तिकारक, वृष्य, पुष्टिदायक, मूत्रशुद्धिकारक, वीर्यवृद्धिकर, कफकारक; आणि श्रम, दाह, विष, पित्त, उन्माद यांचें नाशक आहे.–**रा. नि.** कोष्ठशुद्धिकारक, बल-

कर, जड, चिक्कण, मधुर, शीतळ; आणि पित्त, वात यांचें नाशक आहे.— **म. नि.**

३८३ **कर्कटी**. ( कांकडी. )—मधुर, शीतळ; कफपित्तहारक आहे. पिकलेली कांकडी—रक्तदोषकारक, बहुमूत्रकारक, रुचिकर; आणि मूत्रावरोध, मूतखडा, पित्त, वांति, दाह, कफ यांची नाशक आहे.—**रा. नि.** पिकलेली कांकडी—पित्तकर, अग्निवर्धक; आणि तृषा, श्रम, दाह यांची नाशक आहे.—**के. नि.**

३८४ **त्रपुसी**. ( तवसें. )—मधुर, रुचिकर, शीतळ, जड, मूत्रकारक; आणि श्रम, पित्त, दाह, वांति यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मूत्र व बस्ति यांचें शोधन करणारें, आणि कफ, रक्तपित्त, मूत्रकृच्छ्र, [illegible] यांचें नाशक आहे.—**ध. नि.** वातप्रकोपकारक आहे.—**द्र. नि.**

३८५ **एर्वारु**. ( मळ्यांतील वाळूक. )—शीतळ, मधुर, रुचिकारक, वाताला कोपविणारें; आणि पित्त, मूत्ररोग, मूर्च्छा, संताप यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मलभेदक, विष्टंभकारक, डोळ्यांस हितावह, मूत्रकर; आणि रक्तपित्तनाशक आहे. पिकलेलें वाळूक—कफकारक, हृद्य आणि अग्निदीपक आहे.—**के. नि.**

३८६ **वालुकी**. ( शेतांतील लहान वाळूक. ) मधुर, शीतळ, हृद्य, खोकला व पिनस यांस उत्पन्न करणारें, रुचिकारक; आणि पोटफुगी, श्रम, पित्त यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

३८७ **चिर्भिटा**. ( शेंदाड, चिभूड. )—कोंवळें—कडू, किंचित् आंबट, मदकर, अग्निदीपक, शुष्क, रूक्ष, रुचिकर; आणि कफ, वात, अरुचि, जडत्व यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मलभेदक, आणि कृमि, कंडु, ज्वर यांचें नाशक आहे.—**ग. नि.** रूक्ष, जड, शीतळ, ग्राही, मलावष्टंभकर, वाताला कोपविणारें, नेत्रांस अहितकर; आणि कफ, पित्त यांचें नाशक आहे. पिकलेलें उष्ण, आणि पित्तकर आहे.—**के. नि.**

३८८ **मृगाक्षी**. ( शेंदणी. )—तिखट, कडू, पाककाळीं आंबट, पित्तकर, अग्निदीपक, रुचिकर; आणि वात, पीनस यांची नाशक आहे.–**रा. नि.** शीतळ आहे.—**के. नि.** अग्निदीपक आहे.– **म नि.**

३८९ **चीनाकर्कटी**. ( टरकाकडी. )–रुचिकर, शीतळ, मधुर, तृप्तिकर, हृद्य; आणि पित्त, दाह, शोष यांची नाशक आहे.–**रा. नि.** वातकफकर आहे.–**के. नि.**

३९० **शशांडुली** ( शशांडुली. ) कडू, तिखट, आंबट, पाककाळीं आंबट, अग्निदीपक रुचिकर, जड, मधुर; आणि दाहकारक आहे.– **रा. नि.**

३९१ **कटुतुंबी**. ( कडवंची. ) तिखट, कडू, वातरक्तकारक, रुचिकर, अग्निदीपक; आणि पथ्य आहे. – **रा. नि.**

३९२ **क्षुद्रकारलीकंद** ( कडवंचीकंद. ) – मलशुद्धिकर, गर्भाचा स्राव करणारा, आणि मूळव्याध, योनिदोष, विष यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

## ६. शाल्मल्यादिवर्ग.

३९३ **शाल्मली**. ( काटेसावर )— बुळबुळित, वृष्य, बलकर, मधुर, शीतळ, तुरट, लघु, स्निग्ध आणि वीर्य व कफ यांस वाढविणारी आहे. सावरीचा रस– सावरीच्या गुणाप्रमाणेंच असून ग्राही, ( अग्नि प्रदीप्त करून आमादिकाला पचन करणारें औषध ), तुरट आणि कफनाशक आहे. फुलाचे व फळाचेही असेच गुण आहेत.– **राजनि.** रसायनश्रेष्ठ, धातुवर्धक आणि रक्तपित्तनाशक आहे. इचें फळ ग्राही आणि पित्तनाशक आहे.– **म. नि.** इचें फूल कफपित्त-नाशक आणि वातुळ आहे.– **के. नि.** योनिदोषनाशक आहे.– **ग. नि.**

३९४ **मोचरस.** ( सावरीचा डिंक )– तुरट, कफवातनाशक; बल, धारणाशक्ति, वर्ण, वीर्य, पुष्टि व सिद्धि यांस देणारा, आणि आयुष्यवृद्धिकर असा आहे.– **रा. नि.** स्निग्ध आणि प्रवाहिका;

अतिसार, आंव, कफ, पित्त यांचा नाशक आहे.– **के. नि.** रक्तपित्त आणि दाह यांचा नाशक आहे.– **म. नि.**

३९५ **रक्तरोहितक.** ( रक्तरोहिडा ) **श्वेतरोहितक.** ( श्वेतरोहिडा )– तिखट, चिक्कण, तुरट, शीतल आणि कृमि, प्लीहा, व्रण, रक्तरोग व नेत्ररोग यांचा नाशक आहे.– **रा. नि.** यकृत्नाशक आहे.– **ध. नि.** सारक, उष्ण; आणि वात, कफ, गुल्म, विष, मेदोरोग; आणि मलबद्धत्व, कर्णरोग यांचा नाशक आहे.–**के. नि.**

३९६ **एकवीर.** ( एकवीर, कांटे असाणा. )–उष्ण, तिखट; आणि कळा, गृध्रसी, कंबर व पाठ या ठिकाणचा शूल, पक्षघात यांचा नाशक आहे.

३९७ **पारिभद्र.** ( पांगारा ) – तिखट, उष्ण, रोचक, अग्निदीपक, पथ्य; आणि कफवातनाशक आहे. – **रा. नि.** सूज, पांडु, कृमि, मद यांचा नाशक आहे. –**ध. नि.** याचीं फुलें– पित्तरोग आणि कर्णरोग यांचीं नाशक आहेत. – **भा. प्र.** व्रण, सूज, कफ, पित्त यांचीं नाशक आहेत.—**ग. नि.**

३९८ **खदिर.** ( खैर. ) –रसकाळीं कडू, शीतळ, पाचक; आणि पित्त, कफ, कुष्ठरोग, कास व सूज यांचा नाशक आहे.

३९९ **श्वेतखदिर.** ( पांढरा खैर ) –कडू, तुरट, तिखट, उष्ण; आणि कंडू, कुष्ठ, कफ, वात, व्रण यांचा नाशक आहे.–**रा. नि.** शीतपित्त, कफ, रक्तदोष; यांचा नाशक आहे. — **ध. नि.** शीतळ आणि कफ, पित्त, श्वेतकुष्ठ, कृमि, सूज, प्रमेह, मेदोरोग, कास, अरुचि, पांडुरोग यांचा नाशक आहे.— **के. नि.** प्रमेह, सूज, आंव, रक्तपित्त यांचा नाशक आहे.– **म. नि.**

४०० **रक्तखदिर.** ( तांबडा खैर )– तिखट, उष्ण, तुरट, जड, कडू; आणि आमवात, वातरक्त, व्रण, भूतज्वर यांचा नाशक आहे.– **रा. नि.** थंड; कफ व रेत यांचें शोषण करणारा; आणि

कुष्ठ, कंडू, कृमि यांचा नाशक आहे.—**ध. नि.** दाह आणि ज्वर यांचा नाशक आहे. खैराचा नार—मधुर, बलकर, वीर्यवृद्धिकर आणि मुखरोगनाशक आहे.—**द्र. र.**

४०१ **विट्खदिर.** ( शेण्या खैर. )—तिखट, उष्ण, कडू; आणि रक्तदोष, व्रण, कंडू, विष, विसर्प, ज्वर, कुष्ठ, उन्माद व भूत यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

४०२ **आरि.** ( आराटी, वेल्या खैर. )—तुरट, तिखट, कडू; आणि रक्तदोष, पित्त यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

४०३ **खदिरसार.** ( काथ. )—तिखट, कडू, उष्ण, रुचिकर, अग्निदीपक; आणि कफ, वात, व्रण, कंठरोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.** त्रिदोषनाशक आहे.—**द्र. र.**

४०४ **शमी.** ( थार शमी. )—रूक्ष, तुरट; आणि रक्तपित्त व अतिसार यांची नाशक आहे. इचें फळ—जड, गोड, कडू, उष्ण; आणि केशनाशक आहे.—**रा. नि.** शीतल आहे.—**द्र. र.** लघु, रेचक; आणि कफ, कुष्ट, मूळव्याध, श्वास, कास, कृमि, भ्रम यांची नाशक आहे.—**कै. नि.**

४०५ **बब्बुल.** ( बाभूळ. )—तुरट, उष्ण; आणि कफ, कास, क्षय, आंव, रक्तातिसार, पित्त, दाह यांची नाशक आहे.—**रा. नि.** शीतल, मलभेदक; आणि कुष्ठ व कृत्रिमविष यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४०६ **जालबब्बुलक.** (लहान बाभूळ, पुळई.)—रूक्ष, पित्तकर, तुरट, उष्ण, दाहकर; आणि वातरोग, कफ यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४०७ **अरिमेद.** ( हिंवर. )—तुरट, उष्ण, कडू; आणि भूत-बाधा, सूज, अतिसार, कासरोग, विसर्प, विष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** कृमि, व्रण, दांतांतील रक्त यांचा नाशक आहे.—**म. नि.** प्रमेह, मदोरोग यांचा नाशक आहे.—**ग. नि.** थंड आणि मुखरोग,

रक्तविकार यांचा नाशक आहे.—ध. नि. कृमि, कंडू, बस्तिरोग, दंतरोग यांचा नाशक आहे.—के. नि. दाहनाशक आहे.— द्र. र. ग्रहभीतिनाशक आहे.—भा. प्र.

**४०८ परवौड.** ( पाचोंदा वृक्ष. )— तिखट, हातांत बांधावयास प्रशस्त आणि जीर्णज्वरनाशक आहे.—रा. नि. शीतपित्तनाशक आहे.—द्र. र.

**४०९ इंगुदी.** ( हिंगणी. )— मद्याप्रमाणें गंध येणारी, तिखट, उष्ण, फेंसाळ, लघु, रसायन; आणि कृमि, वात, कफ, व्रण यांची नाशक आहे.—रा. नि. लूताविषनाशक आहे.—म. नि. पाककाळीं तिखट आणि कृमि, श्वेतकुष्ठ, ग्रहबाधा, विष, शूळ यांची नाशक आहे.—के. नि. इचें फळ उष्ण आणि कफवातनाशक आहे.—भा. प्र.

**४१० करीर.** ( नेपती. )—पोट फुगविणारी, तुरट, तिखट, उष्ण, कफकारक; आणि श्वास, वात, अरुचि, शूल, वांति, खरूज, व्रण यांची नाशक आहे.—रा. नि. कफनाशक आहे.—द्र. र. गुदांतील मोडाची नाशक आहे.—ध. नि. तिखट, तीक्ष्ण, आणि कफ, मूळव्याध, वात, विष, सूज, आम, मेदोरोग यांची नाशक आहे. इचें फळ— उष्ण, विकाशी ( सर्वांगाचें संधिबंधन इत्यादिकांस शिथिल करणारी ), रूक्ष, संग्राही; आणि कफपित्तनाशक आहे.—के. नि.

**४११ स्नुही.** ( साबर निवडुंग. )—उष्ण आणि पित्त, दाह, कुष्ठ, वात, प्रमेह यांचा नाशक आहे. निवडुंगाचें दुध—वात, विष, पोटफुगी, गुल्म, उदर यांचें नाशक आहे.—रा. नि. वांति व रेचन करणारें आहे.—द्र. र. तिखट, कडू, तीक्ष्ण, अग्निदीपक, जड, रुचिकर; आणि वात, शूळ, आंव, कफ, उन्माद, अर्श, सूज, शोक, पांडुरोग, व्रण, मेदोरोग, दूषीविष, अष्ठीला, मूतखडा यांचा नाशक आहे.—म. नि.

**४१२ त्रिधार.** ( तिधारी निवडुंग. )—निवडुंगाप्रमाणेंच गुण असून पारदाची सिद्धि देणारा आहे.

४१३ **कंथारी.** ( फणी निवडुंग. )-तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर; आणि कफ, वात सूज, रक्तदोष, ग्रंथिरोग यांचा नाशक आहे. **रा. नि.**

४१४ **श्वेतएरंड** ( पांढरा एरंड. )—तिखट, कडू, उष्ण, रसायन; आणि वातरोग, कासरोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.** मधुर, वृष्य, जड, रेचक आणि कुष्ठ, श्वास, कास, मूतखडा, गुल्म, प्लीहा, उदर, वळ, मलबद्धता, कंबरदुखी, बस्तिरोग, प्रमेह, शिरोरोग, अर्धरोग ( पापण्यांचा रोग ) यांचा नाशक आहे. —**रा. नि.** याचीं पानें--वात, कफ, कृमि, गुल्मवात यांचीं नाशक आहेत.—**भा. प्र.**

४१५ **रक्तएरंड** ( तांबडा एरंड. )— रेचक आणि सूज, वायु, रक्तदोष, पांडुरोग, भ्रांति, श्वास, ज्वर यांचा नाशक आहे.—**रा. नि.** वातरक्तनाशक आहे.—**के. नि.** शूल, सूज यांचा नाशक आहे. याचें फळ—मेदोरोग, वात, पाठीचा शूळ यांचें नाशक आहे.—**द्र. र.** आमवात नाशक आहे. याचें फळ— अति उष्णता देणारें आणि गुल्म, शूल, वात, यकृत्, प्लीहा, उदर, मूळव्याध यांचें नाशक आहे. याची मज्जा—तिखट, अग्निदीपक, मलाचा भेद करणारी; आणि वात, कफ, उदर यांची नाशक आहे.— **भा. प्र.**

४१६ **स्थूलैरंड.** ( थोर एरंड. )—रस, वीर्य व पाक यांचे ठायीं इतर एरंडांहून गुणांनीं श्रेष्ठ आहे.

४१७ **घोटी.** ( घोटी बोर. ) —तिखट, उष्ण, मधुर; आणि वातरोग, व्रण, कंडू, कुष्ठ, रक्तदोष, सूज यांची नाशक आहे—**रा. नि.**

४१८ **लताकरंज.**—( सागरगोटी. )-याचीं पानें—तिखट, उष्ण आणि कफ, वात याचीं नाशक आहे. याचें बीज—अग्निदीपक, पथ्य; आणि शूल, गुल्म यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

४१९ **कारी.** ( कारी. )—तुरट, मधुर, पित्तनाशक, अग्निदीपक, ग्राही, रुचिकर, कंठाचें शोधन करणारी, जड आहे. —**रा. नि.**

४२० **मदन**. ( गेळ. )---तिखट, कडू, उष्ण, वांतिकारक; आणि कफ, वात, व्रण, सूज यांचें नाशक आहे.– **रा. नि.** लेखन, लघु, रूक्ष, आणि पडसें, ज्वर, कुष्ठ, मूळव्याध, विद्रधि यांचें नाशक आहे.– **के. नि.** मलबद्धता, गुल्म यांचें नाशक आहे.–**द्र. र.**

४२१ **महापिंडीतक**. ( थोर गेळ, काळें गेळ. )–तिखट, कडू, वांतिकारक; कफ, हृद्रोग आणि पक्क आम यांचें शोधन करणारें आहे.

४२२ **वेल्लतर**. ( वेलतूर. )—तिखट, उष्ण, अग्निदीपक, पथ्य; आणि मूत्रकृच्छ्र, संधिशूल, वात यांचा नाशक आहे.–**रा. नि.** ग्राही; आणि तृषा, कफ, मूत्राघात, मूतखडा, योनींतील मूत्रस्राव यांचा नाशक आहे.–**के. नि.** श्रमनाशक आहे.–**ग. नि.**

४२३ **तरटी**. ( तरटी. )—कडू, मधुर, जड, बलकर आणि कफनाशक आहे.—**रा. नि.**

४२४ **श्रीवल्ली**. ( शिकेकाई. )–तिखट, आंबट; आणि वात, सूज, कफ यांची नाशक आहे. इचें फळ–अति आंबट, रुचिकर आणि तेलाच्या लेपाचें नाशक आहे.–**रा. नि.**

४२५ **निकुंजिका**. ( शिकेकाईचा भेद. )—इचे गुण शिकेकाई-सारखेच आहेत.

४२६ **अपर्वदंड.** ( रामबाण. )—याचें मूळ–किंचित् उष्ण, रुचिकर, रसकाळीं आंबट, तुरट, पित्तकर आणि कफवातनाशक आहे.--**रा नि.**

४२७ **यावनालशर.** ( रामबाणभेद. )--याचें मूळ–किंचित् मधुर, रुचिकर, शीतल, पशूंना अबलप्रद; आणि पित्त, तृषा यांचें नाशक आहे.–**रा. नि.**

४२८ **शर**. ( तिरकांडें, शरतृण. )–**स्थूलशर** ( थोर तिरकांडें. )– दोन्ही शर– मधुर, कडू, बलकर, वीर्यप्रद, किंचित् वातकारक; आणि कफ, मद, भ्रांति यांचें नाशक आहेत.–**रा. नि.**

४२९ मुंज ( मुंजतृण. )– मधुर, शीतळ, पवित्र, ग्रहाचे शांतीस व दीक्षाकर्मांत घेण्यास योग्य; आणि भूतबाधा, कफ, पित्त यांचें नाशक आहे. --**रा. नि.** उष्ण आणि विसर्प, मूत्ररोग, बस्तिरोग, नेत्ररोग यांचें नाशक आहे.—**ध. नि.** दाहनाशक आहे.–**द्र. र.**

४३० **काश.** ( थोर कसई. )—थंड, मदकर, रुचिकर, तुष्टिप्रद, बलकर, वीर्यवर्धक; आणि पित्त, दाह, श्रम, शोष, क्षय यांचा नाशक आहे —**रा. नि.** मूत्रकृच्छ्र, मूतखडा, दाह, रक्तपित्त, क्षय यांची नाशक आहे.– **म. नि.** तृषा, मूत्रावरोध, वात, पित्त यांची नाशक आहे —**ग. नि.**

४३१ **शिरी.** ( लघु कसई. )– मधुर, शीतळ; आणि पित्त, दाह, क्षय यांची नाशक आहे. –**रा. नि.**

४३२ **सितदर्भ.** ( श्वेत दर्भ. )–याचें मूळ– थंड, रुचिकर, मधुर; आणि पित्त, रक्तज्वर, तृषा, श्वास, कावीळ यांचें नाशक आहे.—**रा. नि.** रक्तपित्त, मूत्रकृच्छ्र यांचें नाशक आहे.–**ध. नि.** बस्तिरोग, कफ, पित्त यांचें नाशक आहे.–**म. नि.** मूतखड्याचें नाशक आहे--**द्र. र.** रक्तप्रदर नाशक आहे.–**भा. प्र.** वीर्यशुद्धिकर व रक्तशुद्धिकर; आणि वांति, मूर्च्छा, दाह यांचें नाशक आहे —**ग. नि.**

४३३ **हरिद्दर्भ.** ( थोर दर्भ. )—दोन्ही दर्भ गुणांनीं सारखे आहेत; तथापि श्वेतदर्भ गुणांनीं अधिक आहेत. श्वेतदर्भाचे अभावीं थोर दर्भ घ्यावा.

४३४ **बल्वजा.** ( मोळ. )—मधुर, शीतळ, वातकारक, रुचिकर, कंठशुद्धिकर; आणि पित्त, दाह, तृषा यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

४३५ **कत्तृण.** ( लघु रोहिस गवत. )—तिखट, कडू; आणि कफ, शस्त्रव्रण, कंटकव्रण, बालग्रह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** हृद्रोग, कंठरोग, रक्तपित्त, कफज्वर, कासरोग, शूल यांचें नाशक आहे.—**म. नि.** कफ, पित्त, कृमि, कंडू, विष, ज्वर यांचें नाशक आहे.--**ग. नि.**

४३६ **दीर्घरोहिषक.** ( मोठें रोहिस गवत. )—कडू, तिखट, उष्ण, व्रणरोपक; आणि कफ, वात, भूतग्रह, विष यांचें नाशक आहे— **रा. नि.**

४३७ **नल.** ( देवनळ. —शीतळ, तुरट, मधुर, रुचिकर, अग्नि-दीपक, वीर्यप्रद आणि रक्तपित्तनाशक आहे.—**रा. नि.** उष्ण; आणि वृद्धस्त्रियांच्या योनींसंबंधीं मूत्ररोग, पित्त, दाह, विसर्प, यांचा नाशक आहे.—**के. नि.** मूत्रकृच्छ्रनाशक आहे.—**द्र. र.** रक्तदोष, दाह, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—**ध. नि.** रक्तप्रदर, हृद्रोग, योनि-रोग, बस्तिरोग यांचा नाशक आहे.—**भा. प्र.** बस्तिशूल, मूतखडा, पित्तरोग यांचा नाशक आहे.—**ग. नि.**

४३८ **महानल.** ( थोर देवनळ )—मधुर, वीर्यवर्धक, किंचित् तुरट अधिक वीर्यवान् आणि पारदकर्मांत प्रशस्त आहे.—**रा. नि.**

४३९ **नीलदूर्वा.** ( निळी हरळी )—शीतळ, मधुर, कडू, रुचिकर आणि रक्तपित्त, अतिसार, कफ, वात, ज्वर यांची नाशक आहे.—**रा. नि.** वांति, हृद्रोग, रक्तपित्त, कफ, पित्त यांची नाशक आहे.—**द्र. र.** कफकर, वातुळ आहे—**ध. नि.**

४४० **श्वेतदूर्वा.** ( पांढरी हरळी )— शीतळ, मधुर, रुचिकर; आणि वांति, पित्त,आमातिसार, कासरोग, दाह, तृषा यांची नाशक आहे.—**रा नि.** तुरट आणि विसर्पनाशक आहे—**भा. प्र.**

४४१ **बल्लीदूर्वा.** ( वेलहरळी )—शीतळ, मधुर, रुचिकर; आणि कफ, वांति, तृषा, पित्त यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४४२ **गंडदूर्वा.** ( गांठ हरळी. )—मधुर, थंड आणि वातपित्त, ज्वर, द्वंद्वजरोग, भ्रम, तृषा, श्रम यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४४३ **दूर्वासाधारणगुणाः**—तुरट, मधुर, शीतळ, तृप्तिकर; आणि पित्त, तृषा, अरुचि, वांति, दाह, मूर्च्छा, ग्रहभूतबाधा, कफ, श्रम यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४४४ **कुंदरु.** ( कुंदा गवत. )—मदकर, शीतळ, गुरांस खाण्यास योग्य, बलकर, पुष्टिप्रद; आणि पित्तातिसार याचें नाशक आहे.–**रा. नि.**

४४५ **भूतृण.** ( सुगंध रोहिस गवत )— तिखट, कडू; आणि वातप्रकोप, भूतग्रहबाधा, विषदोष यांचें नाशक आहे.–**रा. नि.** उदर्द ( विसर्प ), कृमि, कासरोग, कफ, श्लेष्मा, मूळव्याध यांचें नाशक आहे.– **ग. नि.** तीक्ष्ण, उष्ण, विदाही, अग्निदीपक, लघु, रुचिकर, रूक्ष, मुखशुद्धिकर, अवृष्य, पित्ताला दूषित करणारें आणि रक्ताला दूषित करणारें आहे.– **भा. प्र.**

४४६ **सुगंध भूतृण.** ( पुदनी गवत, सुगंधी गवत. )– सुगंधी, किंचित् कडू, रसायन, चिक्कण, मधुर, थंड; आणि कफ पित्त, श्रम यांचें नाशक आहे.– **रा. नि.**

४४७ **ऊखल.** ( घोडेसर गवत. )– बलकर, रुचिकर आणि पशूंना सर्वदा हितकारक आहे.– **रा. नि.**

४४८ **इक्षुदर्भा.** ( अश्वालु, मुठें गवत. )– मधुर, चिक्कण, उष्ण, तुरट, रुचिकर, लघु, तृप्तिदायक आणि कफपित्तहारक आहे.–**रा. नि.**

४४९ **गोमूत्रिका.** ( थोर शिंपीगवत, तांबेटी गवत. )– मधुर, वीर्यवर्धक आणि गाईंना दूध देणारें आहे.– **रा. नि.**

४५० **शिल्पिका.** ( लहान शिंपी गवत. )— मधुर, शीतळ आहे. याचें बीज–बलकर आहे.–**रा. नि.**

४५१ **निःश्रेणिका.** ( निशेणी गवत, निरोषी. )–नीरस, उष्ण आणि पशूंना अबलप्रद आहे.– **रा. नि.**

४५२ **गर्मोटिका.** ( गोडा लोणा गवत, गग्डी )—मधुर, शीतळ, सारक, रुचिकर, पशूंना दुग्धदायक; आणि दाह, रक्तदोष यांचें नाशक आहे.– **रा. नि.**

४५३ **मज्जर.** ( पवनागवत )—मधुर आणि गाईंना दुग्धवर्धक आहे. **रा. नि.**

४५४ **पत्राढ्य.** ( शेंडें गवत. ) —बलकर, पुष्टिकर, रुचिकर आणि पशूंना सर्वदा हितकर आहे.—**रा. नि.**

४५५ **वंशपत्री.** ( वंशपत्री गवत. )—मधुर, थंड, रुचिकर, पशूंना दुग्धवर्धक; आणि पित्त, रक्तदोष यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

४५६ **मंथानक.** ( मारवेल, मुरं गवत. )—चिक्कण, गाईंना प्रिय, दुग्धवर्धक, मधुर आणि बहुवीर्यकर आहे.—**रा. नि.**

४५७ **पल्लिवाह.** ( पोकळी गवत, तांबडे पातीचें )— बळकट नसणारें आणि पशूंना अबलप्रद आहे.—**रा. नि.**

४५८ **लवण तृण.** ( लोणा गवत. )—खारट, आंबट, तुरट, दुग्ध-वर्धक आणि घोड्यांना पुष्टिकारक आहे.—**रा. नि.**

४५९ **पर्ण्यंध.** ( पर्वे गवत )—समवीर्य, कडू, खारट, सारक, आणि शस्त्रापासून झालेल्या व्रणाला तत्काल भरून आणणारें आहे. मोठें, मध्यम व लहान अशा यांत तीन जाति आहेत.—**रा. नि.**

४६० **दीर्घकांड.** ( तिधारी लव्हा-- लव्हाळें )— **लघुगुंड** ( लघु लव्हाळें ), **वृत्तगुंड** ( वाटोळें लव्हाळें )— मधुर, शीतळ; आणि कफ, पित्त, अतिसार, दाह, रक्तदोष यांचें नाशक आहे. यांत मोठें लव्हाळें गुणांनीं जास्त आहे.—**रा. नि.**

४६१ **गुडकंद.** ( कचरा )— तुरट, किंचित् मधुर, अत्युष्ण, शीतळ; आणि दाह, श्रम, रक्तपित्त यांचा नाशक आहे.—**रा. नि.** थंड, रूक्ष, मधुर, ग्राही, वीर्यप्रद, कफकर, वातुळ आहे.—**के. नि.** नेत्ररोगनाशक आहे.— **भा. प्र.**

४६२ **चणिका.** ( वर्णया गवत, चणई )- वीर्यवर्धक, बलकर, अतिमधुर, आणि बीज व तृण यांनीं पशूंना हितकर आहे.—**रा. नि.**

४६३ **गुंडासिनी.** ( पाणकणीक. ) —रुचीला तिखट; कडू, उष्ण; आणि पित्त, दाह, श्रम, सूज, व्रण यांची नाशक आहे.—**रा. नि.**

४६४ **शूली.** ( सुळें गवत ) —बुळबुळीत, उष्ण, जड, मदकर,

बलकर, रुचिकर, दुग्धवर्धक; आणि पित्त, दाह यांचें नाशक आहे.— **रा. नि.**

४६५ **परिपेल्ल.** ( क्षुद्रमोथ, केवटीमोथ, जलमुस्ता. )— तिखट, उष्ण; आणि कफ, वात, व्रण, दाह, आंव, शूल, रक्तदोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** कफ, रक्तपित्त, विसर्प यांचा नाशक आहे— **के. नि.** सुगंधि, बुद्धिप्रद, कांतिदायक; आणि अतिशय घाम, मळ, कंडु, कफ, वात यांचा नाशक आहे.--**ध. नि.** दाहनाशक आहे.— **द्र. र.** मूळव्याधीचा नाशक आहे.—**म. नि.** कफपित्तनाशक आहे. **ग. नि.**

४६६ **हिज्जल.** ( परळ. )—तिखट, उष्ण, पवित्र; आणि भूतबाधा, वात, ग्रहबाधा यांचा नाशक आहे.—**रा. नि.** तिखट, कडू, तुरट; आणि मेद, कृमि, कफ, शोफोदर यांचा नाशक आहे.—**के. नि.**

४६७ **शैवाल.** ( शेवाळ. )— शीतळ, चिक्कण आणि व्रणाचा दाह कमी करणारें आहे.— **रा. नि.** तुरट, कडू, मधुर; आणि दाह, तृषा, पित्त, रक्तज्वर यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

## ७ प्रभद्रादिवर्ग.

४६८ **प्रभद्र** ( कडूनिंब. )—थंड, कडू; आणि कफ, व्रण, श्लेष्म, कृमि, सूज, विष, पित्त, हृद्रोग, दाह यांचा नाशक आहे.— **रा. नि.** कुष्ठ, कृमि, वांति यांचा नाशक आहे.—**ध. नि.** अपक्व सुजेला पिकविणारा, पक्व व्रणाचें शोधन करणारा, पाककाळीं तिखट, वातुळ, ग्राही, हृदयाला हितावह; आणि प्रमेह, ज्वर, खोकला, अरुचि, तृषा, उचकी, रक्तदोष यांचा नाशक आहे. याचें फळ—रसकाळीं व पाककाळीं मलभेदक, उष्ण; आणि कुष्ठ, गुल्म, मूळव्याध, कृमि, प्रमेह यांचें नाशक आहे.—**के. नि.** नेत्रांस हितावह आहे.— **भा. प्र.**

४६९ **महानिंब.** (बकाणनिंब.)—थंड, तुरट, तिखट, कडू; आणि रक्तदोष, दाह, कफ, विषमज्वर यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

शीतपित्त, कफ, मोडशी, कुष्ठ, यांचा नाशक आहे.—ध. नि. रूक्ष, ग्राही; आणि रक्तपित्त, विष, कृमि यांचा नाशक आहे.—के. नि. रक्तदोष, उचकी, वांति, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—म. नि. कफ, पित्त, प्रमेह, गुल्म, मूळव्याध, श्वास आणि उंदराचें विष यांचा नाशक आहे.—भा. प्र.

४७० **कैडर्य**. ( महारुख, कवडचा निंब. )—तिखट, कडू, तुरट, शीतल, लघु; आणि संताप, शोष, कुष्ठ, रक्तदोष, कृमि, भूतबाधा, विष यांचा नाशक आहे.—रा. नि.

४७१ **भूनिंब** ( पाले किराईत. )—वातुळ, कडू, व्रणरोपक, पथ्य; आणि कफ, पित्तज्वर, कुष्ठ, कंडू, सूज यांचा नाशक आहे.—रा. नि.

४७२ **नैपाल**. ( किराईत. )—शीत, उष्ण, लघु, कडू, सर्वरोग-नाशक; आणि कफ, पित्त, रक्तदोष, सूज, तृषा, ज्वर यांचें नाशक आहे.—रा. नि. कासनाशक आहे.— ध. नि. रूक्ष, रसकालीं कडु, सारक; आणि प्रमेह, श्वास, कास, अरुचि, दाह, शोष, कृमि यांचें नाशक आहे.—के. नि. त्रिदोषनाशक आहे. द्र. र.

४७३ **कट्फल**. ( कुंभी, तांबडा कुंभा. )—तिखट, उष्ण, रुचिकर; आणि कास, श्वास, ज्वर, उग्र दाह, मुखरोग यांचा नाशक आहे.—रा. नि. मूळव्याध, क्षय यांचा नाशक आहे.—के. नि. दाह, पित्तज्वर, कृमि, योनिरोग, रक्तातिसार यांचा नाशक आहे.—ग. नि. कफ, वात, गुल्म, प्रमेह, अग्निमांद्य, पांडुरोग, आंव, संग्रहणी, उचकी यांचा नाशक आहे.—ध. नि. ज्वर, कंठरोग, कफ, कंडू यांचा नाशक आहे.—म. नि.

४७४ **अग्निमंथ**. ( नरवेल. )—तिखट, उष्ण, कडू; आणि वात, कफ, सूज, अग्निमांद्य, मूळव्याध, मलबद्धता, पोटफुगी यांचा नाशक आहे.— रा. नि. आंव, पांडु यांचा नाशक आहे.—ध. नि. अग्निवर्धक, उष्णवीर्य आहे.—के. नि.

४७५ **क्षुद्राग्निमंथ.** ( ऐरण, टाकळी. )–इचे गुण नरवेलाप्रमाणेंच आहेत.–**रा. नि.** तिखट, कडू, उष्ण; आणि वात, पांडु, सूज, कफ, अग्निमांद्य, मलबद्धता, आंव यांची नाशक आहे.— **ध. नि.** अग्निवर्धक, उष्णवीर्य, कफनाशक आहे.– **के. नि.** कफनाशक आहे.–**द्र. र.** कफ, मेदोरोग यांची नाशक आहे.–**ग. नि.**

४७६ **श्योनाक.** ( दिंडा. ), **भूतसार.** ( पिंवळा टेटू . )–कडू, शीतळ; आणि त्रिदोष, पित्त, कफ, अतिसार, सन्निपात यांचा नाशक आहे.–**रा. नि.** टेटूचें फळ–तिखट, उष्ण, लघु, अग्निदीपक, पाचक, हृद्य; आणि पित्त, वांति यांचें नाशक आहे. याचें लोणचें रुचिकर आहे.– **द्र. र.** याचें फळ–रूक्ष, हृद्य, तुरट, लघु, अग्निदीपक, वातुळ, जड आणि कफ, वात, गुल्म, मूळव्याध, कृमि यांचें नाशक आहे.— **भा. प्र.** पुटपाकप्रयोगानें जीर्णातिसार, कफ, वात यांचें नाशक आहे.— **ग. नि.**

४७७ **मेषशृंगी.** ( मेढशिंगी. ) तिखट, कडू; आणि कफ, मूळव्याध, शूल, सूज, नेत्ररोग, श्वास, हृद्रोग, विष, कासरोग, कुष्ठ यांची नाशक आहे. मेढशिंगीचें फल—कडू, तिखट, उष्ण, अग्निवर्धक, हृद्य; आणि कफ, वात यांचें नाशक आहे. याचें लोणचें रुचिकर आहे.–**रा. नि.** स्वादिष्ट, थंड; आणि वांति, तृषा यांची नाशक आहे.–**के. नि.** रूक्ष; आणि पित्त, व्रण यांची नाशक आहे. इचें फळ अग्निदीपक; आणि कफ, प्रमेह, कृमि, विष, कासरोग यांचें नाशक आहे.—**भा. प्र.** वर्णकर आणि तिमिर, कफ, श्लेष्म, पित्त, काम यांचें नाशक आहे. **ग. नि.**

४७८ **काश्मरी.** ( शिवण. )—तिखट, कडू, जड, उष्ण; आणि कफ, सूज, त्रिदोष, विष, दाह, ज्वर, तृषा, रक्तदोष यांची नाशक आहे.—**रा. नि.** इचें फळ—थंड, चिक्कण, जड, हृद्य, धातुवर्धक, वीर्यवर्धक, केशवर्धक, बुद्धिदायक; आणि मूत्रविबंध, दाह, वात, तृषा,

रक्तपित्त, क्षतक्षय यांचें नाशक आहे.—**के. नि.** इचें फूल— वीर्य-वर्धक, बलकर, आणि रक्तपित्तज्वर, कफ, पित्त यांचें नाशक आहे.—**ध. नि.** मधुर, उष्णवीर्य आणि आंव, शूळ यांचें नाशक आहे. इचें फूल—मधुर, थंड, ग्राही, वातुळ, पाककाळीं तुरट, मधुर; आणि रक्त-पित्त, कफ, पित्त, मूळव्याध यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

४७९ **अश्मंतक.** ( आपटा. )—मधुर, तुरट, शीतळ; आणि पित्त, प्रमेह, दाह, विषमज्वर, विष, वांति, भूतबाधा यांचा नाशक आहे—**रा. नि.** याचें फूल—रूक्ष; आणि रक्तपित्त, प्रदर, क्षय, कासरोग यांचें नाशक आहे.—**भा. प्र.** कफपित्तनाशक आहे.—**ध. नि.** याचें फळ—आंबट, ग्राही, पोट फुगविणारें; आणि वात, कफ, गंडमाला, रक्तदोष, गलगंड यांचें नाशक आहे.—**के. नि.** शस्त्रव्रण-नाशक आहे.—**द्र. र.** वातातिसारनाशक आहे.—**ग. नि.**

४८० **कर्णिकार.** ( लघु बाहवा. )— रसकाळीं कडू, तिखट, उष्ण; आणि कफ, शूळ, उदर, कृमि, प्रमेह, व्रण, गुल्म यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

४८१ **आरग्वध.** ( थोर बाहवा. ) —अति मधुर, शीतळ; आणि शूळ, ज्वर, कंडू, कुष्ठ, मेह, कफ, मलावष्टंभ यांचा नाशक आहे.—**रा. नि.** रसकाळीं कडू, जड, उष्ण; आणि मूत्रकृच्छ्र, गुल्म, त्रिदोष, उदर, कृमि यांचा नाशक आहे.—**ध. नि.** याचें फूल— थंड, मधुर, तुरट, ग्राही, वातुळ, पाककाळीं तिखट; आणि कुष्ठ, कफ, पित्त यांचें नाशक आहे. फळांतील गीर— पाककाळीं स्वादिष्ट, अग्निवर्धक, चिक्कण, थंड, कडू, मधुर, मृदु, रेचन करणारा; आणि व्रण, उदावर्तरोग, हृद्रोग, वात, पित्त यांचा नाशक आहे.— **के. नि.** त्रिदोषनाशक आणि रक्त-पित्तहारक आहे. —**म. नि.**

४८२ **वृश्चिकाली.** ( लघु मेढशिंगी. )— तिखट, कडू, उष्ण, हृदय व तोंड यांची शुद्धि करणारी, बलकर; आणि रक्तपित्त, मलब-द्धता, अरुचि यांची नाशक आहे. —**रा. नि.**

४८३ **कुटज.** ( कुडा. )–तिखट, कडू, उष्ण, तुरट आणि अतिसार-नाशक आहे.–**रा. नि.** आंवेचा नाशक आहे.–**भा. प्र.** ग्राही आणि रक्त-मूळव्याधीचा नाशक आहे. -- **ग. नि.** शीतळ; आणि कुष्ठ, अतिसार, मूळव्याध यांचा नाशक आहे.—**ध. नि.** रूक्ष, अग्निदीपक आणि कफ, तृषा, कृमि यांचा नाशक आहे. याचें फूल–वातुळ आहे.-- **के. नि.**

४८४ **कृष्णकुटज.** (काळा कुडा.)–रक्तपित्त, त्वग्रोग, मूळव्याध यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

/ ४८५ **इंद्रयव.** ( इंद्रजव. )—तिखट, कडू, शीतळ; आणि कफ, वात, रक्तपित्त, दाह, अतिसार, शूल, नानाप्रकारचे ज्वर यांचे नाशक आहेत.– **रा. नि.** मूळव्याधीचे मोड, रक्त आणि भ्रांति यांचे नाशक आहेत.— **भा. प्र.** रक्तमूळव्याध, रक्तातिसार, कृमि, शूल, अग्नि-मांद्य, त्रिदोष यांचे नाशक आहेत.–**ध. नि.** विसर्प, कुष्ठ, वातरक्त यांचे नाशक आहेत.—**के. नि.**

४८६ **शिरीष.** ( शिरसाचें झाड. )—तिखट, शीतळ; आणि खरूज, वात, विष, त्वग्रोग, कंडू, कुष्ठ, मूळव्याध यांचें नाशक आहे.-- **रा. नि.** लघु, कांतिकर; आणि त्रिदोष, श्वास, कास यांचें नाशक आहे.– **ध. नि.** विसर्प, सूज यांचें नाशक आहे—**के. नि.** कफपित्त-नाशक आहे.—**ग. नि.**

पु
४८७ **करंज.** ( करंज. )— तिखट, उष्ण, डोळ्यांस हितावह आणि वातनाशक आहे. याचें तेल— अति चिक्कण, वातनाशक आणि स्थिर जळणारें आहे.—**रा. नि.** वात, कफ, प्लीहा, उदावर्त, गुल्म यांचा नाशक आहे.— **ध. नि.** याचें फळ–पित्तकर आणि कफ, वात, गुल्म, मूळव्याध, योनिरोग यांचें नाशक आहे.-- **के. नि.** पाककाळीं व रसकाळीं तिखट, कडू, तुरट, उष्णवीर्य; आणि

व्रण, कृमि, विष, कुष्ठ, कफ, रक्तपित्त, योनिरोग, कृमि यांचा नाशक आहे. याचीं पानें—कृमि, कफ, वात, मूळव्याध, सूज, व्रण यांची नाशक आहेत. याचे अंकुर—पाककाळीं व रसकाळीं तिखट, अग्निदीपक, पाचक आहेत.—के. नि.

४८८ **घृतकरंज.** ( चोपडा करंज. )—तिखट, उष्ण; आणि व्रण, वात, विष, विसर्प, त्वग्रोग यांचा नाशक आहे.— रा. नि.

४८९ **महाकरंज.** ( थोरकरंज. )— कडू, उष्ण, तिखट; आणि विष, कंडू, खरूज, कुष्ठ, त्वग्रोग, व्रण यांचा नाशक आहे.—रा. नि. प्रमेह, कुष्ठ, वांति, कृमि यांचा नाशक आहे.— के. नि.

४९० **पूतिकरंज** ( गोंडेकरंज.)—तिखट, कडू, उष्ण; आणि विष, वात, कंडू, खरूज, कुष्ठ, बहिरी, त्वग्रोग यांचा नाशक आहे.—रा. नि.

४९१ **रीठाकरंज.** ( रिठा. ) कडु, उष्ण, तिखट, चिक्कण; आणि वात, कफ, कुष्ठ, कंडू, विष, फोड यांचा नाशक आहे.— रा. नि. पाककाळीं तिखट, लेखन ( जें औषध रसादि सप्त धातु व वातादि दोष यांचें शोषण करून त्यांना पातळ करितें तें ), लघु, गर्भपातकर आणि त्रिदोष, ग्रहबाधा यांचा नाशक आहे.—के. नि.

४९२ **अंकोल.** ( अंकोल. )— तिखट, चिक्कण, पाऱ्याची शुद्धि करणारा, रेचक; आणि विष, लूतादिकांचें विष, कफ, वात यांचा नाशक आहे.—रा. नि. शूल, सूज, व्रण, कृमि, विसर्प, कफ, पित्त, आंव यांचा नाशक आहे. याचें फळ—थंड, कफकर, रसकाळीं व पाककाळीं मधुर, चिक्कण, वीर्यवर्धक, धातुवर्धक; आणि रक्तपित्त, वात, पित्त, दाह, क्षतक्षय यांचें नाशक आहे.— के. नि. चिक्कण, कडू, उष्ण, वांतिकारक, सारक; आणि कुत्रें, उंदीर, गृहांतील जंतु यांची विषबाधा, भूतबाधा, कंबरेचा शूल यांचा नाशक आहे.— ध. नि. मांजराचे विषाचा नाशक आहे.—द्र. र. पित्तकर; आणि अतिसार, सर्पाचें विष यांचा नाशक आहे.—ग. नि.

४१३ **नीलवृक्ष**. ( नीलवृक्ष. ) —तिखट, तुरट, उष्ण, लघु; आणि वातरोग, अनेक प्रकारची सूज यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

४१४ **सर्ज**. ( थोर राळेचा वृक्ष.)— तिखट, कडू, उष्ण, थंड, चिक्कण; आणि अतिसार, रक्तपित्त, कुष्ठ, कंडू, वात, फोड यांचा नाशक आहे.—**रा. नि.** कांतिकर, रूक्ष आणि कफनाशक आहे.—**ध. नि.** नेत्ररोग, कृमिरोग, हृद्रोग, पित्त, व्रण यांचा नाशक आहे.—**द्र. र.** घामाचा नाशक आहे.—**म. नि.** पांडुरोग, कर्णरोग, प्रमेह यांचा नाशक आहे.—**भा. प्र.**

४१५ **अश्वकर्ण**. ( लघु राळेचा वृक्ष. )—तिखट, कडू, चिक्कण; आणि रक्तपित्त, ज्वर, फोड, कंडू, शिरोरोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.** प्रमेह, कुष्ठ, व्रण, कफ यांचा नाशक आहे.—**ग. नि.**

४१६ **ताल**. ( खरताल, ताडवृक्ष. )—सारक, मधुर, मदकर; आणि शीतपित्त, दाह, श्रम, कफ, पित्त, शोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** याचें फल—सारक, बलकर, मलावष्टंभक, धातुवर्धक, तृप्तिकारक, वृष्य; आणि कफ, मांस, पित्त, दाह, क्षय, वात, रक्तपित्त यांचें नाशक आहे. याचें बीज—वीर्यकारक, शीतल, कफकर; आणि वात, पित्त यांचें नाशक आहे. याचा स्नेह मधुर; सारक असा आहे.—**म. नि.** याचें फल—जड, मधुर, आणि पित्तनाशक आहे. याचें बीज—पाककाळीं मधुर आहे. याचें मूळ.—कफकर, बलकर, वीर्यवर्धक, धातुवर्धक; आणि रक्तपित्त, वात, पित्त, व्रण, कृमि यांचें नाशक आहे. **ध. नि.** यांचें बीज मूत्रकारक आहे—**के. नि.** याचा रस—मदकारक आहे; याच्या फळांतील आंठी—पित्तकर आणि वातनाशक आहेत.—**म. नि.**

४१७ **श्रीताल**. ( श्रीताड. )—अत्यंत मधुर, किंचित् तुरट, पित्तहारक, कफकारक आणि किंचित् वातकारक आहे.—**रा. नि.**

४१८ **हिंताल**. ( थोर ताड, कांटे ताड. )—मधुर, आंबट,

कफकर, थंड; आणि पित्त, दाह, श्रम, तृषा, वात यांचा नाशक आहे.–रा. नि.

४९९ माड. ( भेर्लीमाड. )—थंड, रुचिकर, तुरट, पित्तकर, दाहकारक, वातकारक, कफकर; आणि तृषा, श्रम, यांचा नाशक आहे.—रा. नि.

५०० तूल. ( पारसा पिंपळ, भेंडीचें झाड. )—मधुर, आंबट, सारक, वीर्यवर्धक, तुरट; आणि वात, पित्त, दाह, कफ यांचा नाशक आहे.—रा. नि. याचें फळ—मधुर, जड, चिक्कण, कृमिकारक, वीर्यकारक; आणि बळ, कांति व अग्नि यांस वाढविणारें आहे.–ध. नि. कफकर आहे.—के. नि. वंगाचा नाश करणारा आहे.— द्र. र.

५०१ तमाल. ( तमालवृक्ष. )---मधुर, बलकर, वीर्यवर्धक, थंड, जड; आणि कफ, पित्त, तृषा, दाह, श्रम, भ्रांति यांचा नाशक आहे.---रा. नि. फोड, सूज यांचा नाशक आहे.—के. नि.

५०२ कदंब. ( कळंब. )–तिखट, कडू, तुरट, शीतळ, वीर्यवृद्धिकर; आणि वात, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—रा. नि. सारक, मलावष्टंभक, रूक्ष, दुग्धवर्धक; आणि कफनाशक आहे— म. नि. ग्राही, कांतिकारक, जड; आणि योनिरोग, व्रण, रक्तगुल्म, कुष्ठ, दाह, रक्तदोष, विष यांचा नाशक आहे. याचें फळ—आंबट, रुचिकर, उष्णवीर्य, कफकर, जड, कफपित्तकारक; आणि वातनाशक आहे.— के. नि.

५०३ धाराकदंब. ( धाराकळंब. ), धूलिकदंब ( धुलिकदंब. ), भूमिकदंब. (भूमिकदंब.)–तिखट, कांतिकारक, थंड, तुरट, कडू, वीर्यवृद्धिकारक; आणि विष, सूज, पित्त यांचें नाशक आहेत.– रा. नि.

५०४ जलवेतस. ( जलवेतस, वांजूळ. )–कडू, थंड, ग्राही, तुरट; आणि राक्षसांची पीडा, व्रण, रक्तपित्त, कफ यांचा नाशक आहे.– रा. नि. वाताला कोपविणारा आहे.– म. नि.

५०५ **कुंभी.** ( लघुकुंभी, पांढरा कुंभी. )–तिखट, तुरट, उष्ण, ग्राही; आणि वात, कफ यांचा नाशक आहे.– **रा. नि.**

५०६ **वेतस.** ( वेत. )– तिखट, मधुर, शीतळ; आणि भूतबाधा, कुष्ठ, रक्तपित्त यांचा नाशक आहे.– **रा. नि.** कडू, तुरट, व्रणशोधक; आणि राक्षसबाधा, कफ यांचा नाशक आहे.–**ध. नि.**

५०७ **धव.** (धावडा.)—तुरट, तिखट, पित्तकर, रुचिकर, अग्निदीपक; आणि कफ, वात यांचा नाशक आहे.–**रा. नि.** शीतळ, कडू, तुरट; आणि मधुमेह, पांडुरोग, कफ, पित्त, त्रिदोष, दाह, मूळव्याध, सूज यांचा नाशक आहे. याची शाखा– खारट, व तुळ आहे. याचीं पानें–शीतळ, पाककाळीं तिखट, किंचित् वातुळ; आणि कफ, रक्तपित्त यांचीं नाशक आहेत. याचें फळ– मधुर, तुरट, रूक्ष, आंबट आहे.–**के. नि.** मूतखडा, मूत्रकृच्छ्र, रक्तदोष, व्रण, विसर्प, योनिरोग, अतिसार, तृषा यांचा नाशक आहे.– **भा. प्र.**

५०८ **धन्वन.** (धामण.) –तिखट, उष्ण, तुरट, दाहकारक, शोषकारक, ग्राही; आणि कफ, कंठरोग यांची नाशक आहे.–**रा. नि.** कफ, पीनसरोग, खोकला, रक्तदोष यांची नाशक आहे.—**द्र. र.** मधुर, रूक्ष; आणि पित्त, वात यांची नाशक आहे.– **के. नि.** इचें फळ–थंड, मधुर, तुरट; आणि कफ, वात, कफपित्त, मूळव्याध यांचें नाशक आहे. – **म. नि.** धातुवर्धक, बलकर, सांधणारी, व्रणरोपक आहे.– **भा. प्र.**

५०९ **भूर्जपत्र.** ( भोजपत्र. )—तिखट, तुरट, उष्ण, पथ्य; आणि भूतबाधा, त्रिदोष, जादूटोणा यांचें नाशक आहे.– **रा. नि.** पित्त, रक्तदोष, कफ, मेदोरोग, कर्णरोग, विष, व्रण यांचें नाशक आहे.– **के. नि.**

५१० **अर्जुन.** ( अर्जुनसादडा. )—तुरट, उष्ण; आणि कफ, व्रण, पित्त, श्रम, तृषा, वातरोग यांचा नाशक आहे.– **रा. नि.** क्षताला व

मोडलेल्या हाडाला पथ्यकारक, रक्तस्तंभक, अस्थिभंग व अस्थिनाश यांस हितकर; आणि आढ्यवात, वात यांचा नाशक आहे.– द्र. र. पांडुरोगनाशक आहे.– ग. नि. शीतळ; आणि पित्त, कफ, व्रण, प्रमेह, स्वरभंग, रक्तदोष, क्षतक्षय यांचा नाशक आहे.– के. नि. रक्तदोष, विष यांचा नाशक आहे.–म. नि.

५११ **हरिद्रु.** ( हळदीचा वृक्ष. )–कांतिवर्धक, बलकर, अनेक प्रकारचे त्वग्दोष यांचा नाशक आहे.–रा. नि. पाककाळीं तिखट, उष्णवीर्य, किंचित् कफनाशक आणि व्रणरोपण करणारा आहे.–के. नि.

५१२ **दुग्धरुहा.** ( रामेठा. )– तिखट, तुरट, उष्ण. पित्तकर, अग्निदीपक; आणि कफ, वात यांचा नाशक आहे.– रा. नि.

५१३ **शाखोट.** ( सागसाहोंडा, हेद्रू. )– कडू, उष्ण, पित्तकर आणि वातनाशक आहे.–रा. नि. याचा निर्यास ( चीक ) –रक्तार्श, वातरक्त, कफपित्तातिसार, शोष, पित्त, वात यांचा नाशक आहे.– म. नि. रक्तातिसारनाशक आहे.— द्र. र.

५१४ **शाक.** ( साग. )— सारक; आणि पित्त, दाह, श्रम यांचा नाशक आहे.– रा. नि. याची साल– मधुर, रुचिकर, तुरट आणि कफनाशक आहे.–रा. नि. थंड, गर्भसंधानकारक; आणि रक्तपित्त, कुष्ठ, कफ, वात यांचा नाशक आहे.—के. नि. कफनाशक आहे.– द्र. र. वात, पित्त, विसर्प, वातरक्त यांचा नाशक आहे.—ग. नि.

५१५ **शिंशपा.** ( काळा शिसवा. ) – कडू, उष्ण, अग्निदीपक; आणि कफ, वात, अजीर्ण, सूज, अतिसार यांचा नाशक आहे.— रा. नि.

५१६ **श्वेतशिंशपा.** ( पांढरा शिसवा. )– कडू, थंड; आणि पित्त, दाह यांचा नाशक आहे.—रा. नि.

५१७ **कपिल शिंशपा.** ( पिंवळा शिसवा. )—कडू, शीतवीर्य; आणि श्रम, वातपित्तज्वर, ओकारी, उचकी यांचा नाशक आहे.– रा. नि.

५१८ **शिंशपात्रय.** ( तिन्ही शिसवे. )—कांतिकर, थंड, बलकर, रुचिकर; आणि सूज, विसर्प, पित्त, दाह यांचे नाशक आहेत.—**रा. नि.** विषनाशक आहेत.—**द्र. र.** दाह, व्रण, कफ यांचे नाशक आहेत.—**म. नि.** शोषनाशक आहेत.—**भा. प्र.** उचकीचे नाशक आहेत.—**ध. नि.** तिखट, कडू, गर्भपातकारक, तुरट, उष्णवीर्य; आणि बस्तिरोग, प्रमेह, कफ, दाह, व्रण, वांति, कुष्ठ, कृमि, चित्र-कुष्ठ, पीनस यांचे नाशक आहेत.—**के. नि.**

५१९ **असन.** ( थोर बिबळा. )—तिखट, उष्ण, कडू, सारक; आणि वात, दद्रु, कंडू, कंठरोग, रक्तमंडल ( कुष्ठरोग ) यांचा नाशक आहे.—**रा. नि.** दीपक, पाचक, केशांना हितकर, रुचिकर, रसा-यन; आणि कफ, पित्त, रक्तदोष, रक्तपित्त, कृमि, विसर्प, मेदोरोग, प्रमेह यांचा नाशक आहे.—**के. नि.**

५२० **नीलबीज.** (काळा बिबळा.)—**रक्तबीज.** ( लाल बिबळा )—तिखट, शीतळ, तुरट, सारक; आणि कुष्ठ, कंडु, दद्रु यांचे नाशक आहेत. यांत काळा बिबळा श्रेष्ठ आहे.—**रा. नि.**

५२१ **वरुण.** ( वायवरणा. )—तिखट, उष्ण आणि रक्तदोष-नाशक आहे.—**रा. नि.** चिक्कण, अग्निदीपक; आणि शीर्षवात, वि-द्रधि, वात यांचा नाशक आहे.—**द्र. र.** गुल्मनाशक आहे.—**म. नि.** कफ, बाधिर्य, कर्णशूल, योनिदोष यांचा नाशक आहे.—**ग. नि.** मधुर, कडू, तुरट, रूक्ष, मलभेदक, पित्तकर, अग्निदीपक; आणि कफ, वात, वातरक्त, मूत्राघात, मूतखडा, हृद्रोग यांचा नाशक आहे.—**के. नि.**

५२२ **पुत्रजीव.** ( पुत्रजीव. )—थंड, वीर्यवर्धक, कफकर, गर्भोत्पा-दक, डोळ्यांस हितावह, पित्तशामक; आणि दाह, तृषा यांचा नाशक आहे.—**रा. नि.** कफवातनाशक आहे.—**म. नि.** जड, तिखट, उष्ण आणि मलमूत्रनाशक आहे.—**भा. प्र.**

५२३ **महापिंडीतरु.** ( पेंढूं. )—तुरट, उष्ण, आणि त्रिदोषशामक आहे.—रा. नि. त्वग्रोग, रक्तदोष यांचा नाशक आहे.—म. नि. मधुर, शीतळ; आणि सूज, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—म. नि.

५२४ **कारस्कर.** ( कुचला. ) तिखट, उष्ण, कडू; आणि कुष्ठ, वातरोग, रक्तदोष, कंडु, कफ, आंव, मूळव्याध, व्रण यांचा नाशक आहे.— रा. नि.

५२५ **कटभी.** ( काळी किणही. ), **श्वेता कटभी.** ( पांढरी किणही )— तिखट, उष्ण; आणि शूल, गुल्म, विष, पोटफुगी, वात, अजीर्ण, कफ यांची नाशक आहे. पांढरी गुणांनीं श्रेष्ठ आहे.—रा. नि. वीर्यवृद्धिकारक आहे.—द्र. र. त्रिदोष, व्रण, ग्रंथिरोग, मस्तकरोग यांची नाशक आहे.—के. नि.

५२६ **भूतांकुश.** ( भूतकेशी. )—उग्रगंधी, तुरट, उष्ण, तिखट; आणि भूतबाधा, ग्रहबाधा, कफ, वात यांचा नाशक आहे.—रा. नि. अग्निदीपक आहे.—के. नि. कुष्ठ, कृमि, त्वग्रोग, वात, चित्रकुष्ठ, कफ यांचा नाशक आहे.— द्र. र.

५२७ **देवसर्षप.** ( देवशिरस. )—तिखट, उष्ण, रुचिकर; आणि कफ, जंतु, मुखरोग यांचा नाशक आहे.—रा. नि. शिरोरेचक; आणि कफ, पित्त, वात, कृमि यांचा नाशक आहे.—के. नि.

५२८ **लकुच.** (क्षुद्रफणस, ओंटीचें झाड.)— रसकाळीं कडू, तुरट, उष्ण, लघु, ग्राही, मलसंग्रहकारक आणि कंठरोगनाशक आहे.— रा. नि. जड, मलावष्टंभक, मधुर, आंबट, रक्तपित्तकारक, कफकर; आणि वात, वीर्य, अग्नि, हृद्रोग, कृमि यांचा नाशक आहे.—म. नि. के. नि. याचें पक्क फळ—मधुर, आंबट, रुचिकर, वृष्य आणि वातपित्तनाशक आहे. याचें अपक्क फळ—जड, रक्तदोषकारक, त्रिदोषकारक आणि नेत्रांस अहितकारक आहे—भा. प्र.

५२९ **विकंकत.** ( गुलघांटी, वेहकळ. )—आंबट, मधुर, पाक-

काळीं अतिमधुर, लघु, अग्निदीपक, पाचक; आणि कामीण, रक्तदोष, यांची नाशक आहे.—रा. नि. शीतळ, कडू; आणि कफनाशक आहे.—ध. नि. सूजनाशक आहे.— द्र. र. दाह आणि मल यांची नाशक आहे.— ग. नि.

## ८ करवीरादिवर्ग.

५३० श्वेतकरवीर. ( पांढरी कण्हेर. )—तिखट, तीक्ष्ण; आणि कुष्ठ, कंडू, व्रणरोग, विष, फोड यांची ना क असून घोड्यास मारणारी आहे.— रा. नि.

५३१ रक्तकरवीर. ( तांबडी कण्हेर. )— तिखट, तीक्ष्ण, रक्तशुद्धिकारक; आणि त्वग्रोग, व्रण, कंडू, विष, कुष्ठ यांची नाशक आहे.—रा. नि. पांढरी, तांबडी, पिंवळी व काळी अशी चार प्रकारची कण्हेर असून गुणांनीं सारखी आहे.—रा. नि. उष्णवीर्य, डोळ्यांना हितावह, भक्षणानें विषासमान; आणि ज्वरनाशक आहे.—ध. नि., म. नि.

५३२ श्वेतधत्तूर. ( पांढरा धोतरा. )— व्रणहारक, तिखट, उष्ण, भ्रमकारक, कांतिकारक; आणि त्वग्रोग, खरूज, कंडु, ज्वर यांचा नाशक आहे.—रा. नि. अग्निवर्धक, वांतिकारक आणि मदकारक आहे.—द्र. र. वातकारक; आणि विष, कुष्ठ, उवा, लिखा, कफ, यांचा नाशक आहे.—भा. प्र.

५३३ कृष्णधत्तूर. ( काळा धोतरा. )— पांढऱ्याहून गुणांनीं अधिक आहे.—रा. नि.

५३४ कोविदार. ( कोरल. )—तुरट, ग्राही, व्रणांना रोपण करणारा, अग्निदीपक; आणि कफ, वात, मूत्रकृच्छ्र यांचा नाशक आहे.—रा. नि. गंडमाळा, गुदभ्रंशरोग, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—ध. नि. कृमि आणि कुष्ठ यांचा नाशक आहे.—के. नि. याचीं फुलें—थंड, जड; आणि रक्तपित्त, प्रदर, क्षतकास, श्वास, गुदरोग यांचीं नाशक आहेत.—द्र. र.

५३५ **अर्क.** ( लाल रुई. )—तिखट, उष्ण, अग्निदीपक; आणि वात, सूज, व्रण, कंडु, कुष्ठ, कृमि यांची नाशक आहे.—**रा. नि.** सारक आणि प्लीहोदरनाशक आहे.—**ध. नि.** विष, गुल्म, मूळव्याध, यकृत्, सूज, उदर यांची नाशक आहे.—**म. नि.** याचीं फुलें--वृष्य, अग्निदीपक, पाचक; आणि अरुचि, कफ, श्वास, कास, उंदराचें विष यांचीं नाशक आहेत. विरेचक, आणि रक्तपित्तनाशक आहे.—**भा. प्र.**

५३६ **श्वेतार्क.** ( पांढरी रुई. ) —तिखट, कडू, उष्ण, मलशुद्धिकर; आणि मूत्रकृच्छ्र, रक्तदोष, सूज, व्रण, यांची नाशक आहे.— **रा. नि.**

५३७ **राजार्क.** ( लाल मांदार. )—तिखट, कडू, उष्ण; आणि कफ, मेदोरोग, विष, वात, कुष्ठ, व्रण, सूज, कंडू, विसर्प यांचा नाशक आहे.—**रा. नि.** प्लीहा, गुल्म, उदर, आध्मान ( पोटफुगी ) यांचा नाशक आहे.—**बृ. र.**

५३८ **श्वेतमंदार.** ( पांढरा मांदार. )--अति उष्ण, कडू, मलशुद्धिकर; आणि मूत्रकृच्छ्र, व्रण, दारुण कृमि यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

५३९ **सुरपुन्नाग.** ( सुरंगी. ) इचे गुण उंडणीच्या गुणांप्रमाणें आहेत – **रा. नि**

५४० **रक्तपलाश.** (तांबडा पळस.)—तुरट, उष्ण; आणि कृमिरोगनाशक आहे.---यांचें बीज—कडू, ओली खरूज, कोरडी खरूज, त्वग्रोग याचें नाशक आहे. याचीं फुलें-- उष्ण; आणि कंडू, कुष्ठ यांचीं नाशक आहेत. तांबडा, पिंवळा, पांढरा आणि निळा असा फुलांवरून चार प्रकारचा पळस आहे. यांचें गुणही सारखेच आहेत. पांढरा विज्ञान देणारा आहे.--**रा. नि.** यांचें फूल—सारक. भग्नव्रणाला सांधणारें, वृष्य, ग्राही, शीतळ, आणि वातुळ आहे.—**के. नि.** मूत्रकृच्छ्रनाशक आहे. **बृ. र.** वातरक्तनाशक आहे.—**भा. प्र.** क्षारश्रेष्ठ, ग्राही, अग्निदीपक, आणि प्लीहा, गुल्म, वात, कफ, मूळव्याध, संग्रहणी यांचा नाशक आहे--**ध. नि.** यांचें फळ तृषा, दाह, कफ— रक्तपित्त, कुष्ठ, प्रमेह,

उदर यांचें नाशक आहे.—के. नि. भग्नसंधानकारक; आणि कृमि, शूल यांचा नाशक आहे. —म. नि.

५४१ **पुन्नाग.** ( उंडण. )—मधुर, शीतळ, सुगंधी, देवतांना तुष्टिप्रद; आणि पित्तनाशक आहे. —रा. नि. इचें फूल वृष्य; आणि वात, शूल, कफ यांचें नाशक आहे.—द्र. र. रक्तपित्तनाशक आहे.—म. नि.

५४२ **तिलक.** ( तिलकवृक्ष, तिळवा. )—मधुर, चिक्कण, बलपुष्टिकारक, हृद्य, लघु, मेदोवर्धक; आणि वात, पित्त, कफ यांचा नाशक आहे. याची साल—तुरट, उष्ण, पुंस्त्वहारक; आणि दंतरोग, कृमि, सूज, व्रण, रक्तदोष यांची नाशक आहे.—रा. नि. कफ, कुष्ठ, मुखरोग यांची नाशक आहे.—भा. प्र.

५४३ **अगस्त्य.** ( हदगा, अगस्ता. )—पांढरा, पिंवळा, निळा, तांबडा असा फुलांच्या रंगावरून हदगा चार प्रकारचा आहे. मधुर, थंड; आणि त्रिदोष, श्रम, कासरोग, भूतबाधा यांचा नाशक आहे. तसेंच—थंड, मदकर; आणि त्रिदोष, श्रम, कफ, कासरोग, वैरूप्य, भूतबाधा, बल यांचा नाशक आहे.—रा. नि. याचें फूल—ज्वरनाशक आहे.—ग. नि. वाताला कोपविणारा, रुचिकर; आणि कफ, पित्त, चातुर्थिकज्वर, पडसें यांचा नाशक आहे.—के. नि. याचें फूल—अति शीतल किंवा उष्ण नसून पाककाळीं तिखट, वातुळ; आणि कफ, पित्त, रातांधळें यांचें नाशक आहे.

५४४ **रक्तपाटली.** ( लाल पाडळ. )—रसकाळीं कडू, तिखट, उष्ण; आणि कफ, वात, सूज, पोटफुगी, वांति, श्वास, सन्निपात यांची नाशक आहे.— रा. नि. कावीळीची नाशक आहे. इचें फूल—कफ, रक्तदोष यांचें नाशक आहे.— म. नि. वातरोग, पित्त, उचकी, कफ, अरुचि, सूज यांची नाशक आहे.—ध. नि. त्रिदोष, रक्तदोष, उचकी, तृषा याची नाशक आहे. इचें फूल— हृदयाला हितावह; आणि कफ, रक्तदोष, दाह, पित्त यांचें नाशक आहे. इचें फळ— मूत्रकृच्छ्र-

नाशक आहे.– के. नि. रक्तपित्त अर्श आणि वात यांचें नाशक आहे.–भा. प्र.

५४५ श्वेतपाटली. (पांढरी पाडळ.)– कडू; जड, उष्ण; आणि वात, वांति, उचकी, कफ, श्रम, शोष यांची नाशक आहे.—रा. नि. दोन्ही पाडळी–हृद्य, सुगंधी; आणि कफ, वात यांच्या नाशक आहेत. तसेंच या वाताला किंचित् कोपविणाऱ्या आहेत.– ध नि. किंचित् वातकारक आहेत.–– द्र. र.

५४६ अशोक. ( अशोक. )––थंड, हृद्य; आणि पित्त, दाह, श्रम, गुल्म, शूल उदर, पोटफुगी, कृमि यांचा नाशक आहे.– रा.नि. तृषा, अपची ( गंडमालेचा भेद ), शोष, विष, रक्तदोष यांचा नाशक आहे.— भा. प्र.

५४७ चंपक. ( सोनचांफा. )–– तिखट, कडू , थंड, गुणावह, आणि दाह, कुष्ट, कंडू, व्रण यांचा नाशक आहे.–रा. नि. वात, पित्त नाशक आहे.––ध. नि. पित्त, कफ, रक्तदोष यांचा नाशक आहे.– म. नि. कफ, वात, पित्त यांचा नाशक आहे.— भा. प्र.

५४८ नागचंपक. ( नागचंपक, नागचांफा. )—तिखट, उष्ण, कांतिकारक, चक्षुष्य, व्रणरोपक, अग्निस्तंभक; आणि वात, कफ, यांचा नाशक आहे.–रा. नि. याच्या फुलाची कळी–सुगंधी, देव व राजा यास योग्य, सोन्यासारखी पिंवळी, भ्रमरांची घातक; आणि वात, पित्त यांची नाशक आहे.

५४९ बकुल. ( बकूळ. )—शीतळ, हृद्य, मधुर, तुरट, मादक, हर्षदायक; आणि विषदोषनाशक आहे. बकुळीचीं फुलें–रुचिकर, क्षीर-श्रेष्ठ, सुगंधी, शीतळ, मधुर, चिक्कण, तुरट, मलावष्टंभक आहेत.— रा. नि. याचीं पक्क फळें सुगंधी आहेत. याचें फळ—दंतांला घट्ट करणारें, स्वच्छ, जड, वातुळ; आणि कफपित्तनाशक आहे.— म. नि., म. नि.

५५० **केतकी**. ( श्वेत केवडा. ), **सुवर्णकेतकी**. ( सोन केवडा. )- कांतिकर, सुवर्णवर्णाचा, मदनोन्मादवर्धक, सुखकर; आणि केशदौर्गंध्य-नाशक आहे. याचा सोट—थंड, तिखट, रसायन, बलकर, देहाला बळकटी आणणारा; आणि पित्त, कफ यांचा नाशक आहे.— **रा. नि.** याच्या कणसांतील केसर—कफ, विष, शिंबें, कंडु यांचें नाशक आहे. याचें फळ—मधुर, आणि प्रमेह, कफ, वात, यांचें नाशक आहे.—**द्र. र.**

५५१ **सिंदुरी**. ( शेंदरी. ) —तिखट, कडू, तुरट, चंडीला ( देवीला ) प्रिय; आणि कफ, वात, शिरोरोग, भूतबाधा यांची नाशक आहे.—**रा. नि.** थंड; आणि रक्तपित्त, तृषा, वांति यांची नाशक आहे.— **म. नि.**

५५२ **जाती**. ( जाई. )—शीतळ, कडू; आणि कफ, मुखपाक यांची नाशक आहे. इची कळी—नेत्ररोग, व्रण, विस्फोट ( फोड ), कुष्ठ यांचीं नाशक आहे.— **रा. नि.** रक्तदोष, कंठरोग, नेत्ररोग, दंतरोग यांची नाशक आहे.—**म. नि.** कफवातनाशक आहे.—**द्र. र.** कफपित्तनाशक आहे.—**ध. नि.**

५५३ **मुद्गर**. ( मोगरा. ) – मधुर, शीतळ, सुगंधी, सुखदायक, मनो-ल्हादक, भ्रमरांना आनंददायक; आणि पित्तनाशक आहे.—**रा. नि.**

५५४. **शतपत्री**. ( शेवती दवणशेवती. ) थंड, कडू, तुरट, सुगंधी रुचिकर; आणि कुष्ठ, मुखपाक, पित्त, दाह यांची नाशक आहे—**रा. नि.**

५५५ **मल्लिका**. ( वलमोगरा, मोगरी. ) – तिखट, कडू, डोळ्यांना हितावह; आणि मुखरोग, कुष्ठ, फोड, कंडू, विष, व्रण यांचीं नाशक आहे.—**रा. नि.** वृष्य आणि कफनाशक आहे.—**द्र. र.** वातनाशक आहे.— **ग. नि.** पित्त, नेत्ररोग, वात, रक्तपित्त यांची नाशक आहे.—**म. नि.**

५५६ **वृत्तमल्लिका**. ( बटमोगरा. )—तिखट, उष्ण, सुगंधी; आणि नेत्ररोग, व्रण, मुखरोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

५५७ **वार्षिकी.** ( साटई मोगरी. )–थंड, हृद्य, सुगंधी; आणि पित्त, कफ, वात, विष, फोड, कृमि, आंव, यांची नाशक आहे.–**रा. नि.**

५५८ **कस्तूरीमल्लिका.** ( कस्तूरमोगरा. )—याचे गुण रानमोगरीप्रमाणें आहेत.—**रा. नि.**

५५९ **वासंती.** ( मधुमाधवी. )—थंड, हृद्य, सुगंधी, केशांचे बुचड्यास सुखकारक, मदनोन्माददायक; आणि श्रमनाशक आहे.—**रा. नि.** घर्मनाशक आहे.– **ध. नि.** मस्तकपीडा, व्रण, कफ, रक्तदोष यांची नाशक आहे.—**द्र. र.**

५६० **नवमल्लिका.** ( नेवाळी. )— अति शीतळ, सुगंधी; आणि सर्व रोगनाशक आहे.–**रा. नि.** उष्णवीर्य रसकाळीं कडू ; आणि वात, पित्त, नेत्ररोग, मुखरोग, यांची नाशक आहे.—**म. नि.**

५६१ **आतिमुक्त.** ( रायनेवाळी. )— तुरट, शीतळ, श्रम, पित्त, दाह, ज्वर, उन्माद, उचकी, वांति, यांची नाशक आहे.– **रा. नि.**

५६२ **यूथिका.** ( पांढरी जुई. ), **हेमयूथिका.** ( पिंवळी जुई. )–मधुर, थंड, आणि मूत्रांतील खर, पित्त, दाह, तृषा अनेक प्रकारचे त्वग्रोग यांची नाशक आहेत. पांढरी, पिंवळी, निळी व मिश्रवर्णाची अशी चार वर्णाची जुई आहे. या चारी प्रकारच्या जुई–कडू, थंड; आणि पित्त, कफ, ज्वर, व्रणरोग यांच्या नाशक आहेत. या चारी प्रकारच्या जुई रसवीर्यादिकांत सारख्या असून पिंवळी जुई सुशोभित आणि अति सुगंधी आहे.–**रा. नि.** वातरक्त, मुखरोग यांची नाशक आहे.– **द्र. र.** कंठरोग नेत्ररोग यांची नाशक आहे.– **म. नि.** कफकर, वातुळ; आणि दंतरोग, विष, रक्तदोष, व्रण यांची नाशक आहे. **भा. प्र.**

५६३ **कुब्जक.** ( कब्ज. )—सुगंधी, शीतळ, आणि रक्तपित्त, कफ यांचा नाशक आहे. याचें फूल–शीतळ, कांतिकर; आणि दाह,

रक्तपित्त यांचें नाशक आहे.–रा. नि. तुरट, मधुर, रसायन, वृष्य, ग्राही आणि त्रिदोषनाशक आहे.–ध. नि.

५६४ **मुचुकुंद.** ( मुचकुंद. ) —तिखट, कडू, कंठाला हितकर; आणि कफ, कास, त्वग्रोग, सूज, व्रण, खरूज यांचा नाशक आहे.–रा. नि. मस्तकपीडा, रक्तपित्त, विष यांचा नाशक आहे.–भा. प्र.

५६५ **करुणी.** ( करवीरणी. )–तिखट, कडू, उष्ण; आणि कफ, वातरोग, पोटफुगी, विष, मलबद्धत्व, मानेच्या वर होणारे रोग, ऊर्ध्व-श्वास यांची नाशक आहे.– रा. नि.

५६६ **माधवी.** ( माधवी. )—तिखट, कडू ,तुरट, उग्रगंधी; आणि पित्त, कास, व्रण, दाह, शोष यांची नाशक आहे.—रा. नि.

५६७ **गणिकारी.** ( गणेरी. ) –अतिसुगंधी; कामक्रीडोत्तेजक; आणि त्रिदोष, दाह, शोष यांची नाशक आहे.–रा. नि. कुष्ठरोग, कर्णरोग यांची नाशक आहे.–म. नि. मलमूत्राची शुद्धि करणारी, वृष्य; आणि सूज, कफ, रक्तदोष यांची नाशक आहे.—द्र. र.

५६८ **कुंद.** ( कुंद. )–अतिमधुर, शीतळ ,तुरट, केशांना हितावह, सारक, अग्निदीपक, पाचक; आणि कफ, पित्त, यांचा नाशक आहे.–रा. नि. हृद्य, अल्पगंधी, मनोहर; आणि मस्तकपीडा, विष, पित्तरोग यांचा नाशक आहे.–म. नि.

५६९ **बक.** ( थोर बकुळ, बगोलें. ) –अति शीतळ, कडू, मधुर, अग्निदीपक; आणि पित्त, दाह, कफ, श्वास, श्रम यांचा नाशक आहे.–रा. नि. तिखट, उष्ण आणि कफनाशक आहे.–ध. नि. लेपानें सर्व व्रण-हारक; आणि पित्त, मूत्रकृच्छ्र, मूतखडा यांचा नाशक आहे.–म. नि. योनिशूल, विष, तृषा, कुष्ठ, रक्तदोष यांचा नाशक आहे. –भा. प्र.

५७० **कोविका.** ( केवा, केरव. )—मधुर, शीतळ; आणि दाह, पित्त, श्रम, वातरोग, कफरोग, वांति यांची नाशक आहे.

५७१ **बंधूक.** ( दुपारी. )—सूर्याला तुष्टिदायक; आणि ज्वर, ग्रहबाधा, पिशाचबाधा यांची नाशक आहे. कफकर; आणि वातपित्तनाशक आहे.—**द्र. र.**

५७२ **त्रिसंधि.** ( त्रिसंधि. )—रुचिकर; आणि त्वग्रोग, कफ, कासरोग यांची नाशक आहे.—**रा. नि.** कफपित्तकारक आहे.—**म. नि.**

५७३ **जपा.** ( जासवंद. )—तिखट, उष्ण, वांतिकारक, कृमिवर्धक, सूर्याच्या उपासनेची सिद्धि करून देणारी आणि इंद्रलुप्तरोगनाशक आहे.—**रा. नि.** ग्राही आणि केशांना हितकर आहे.—**म. नि.**

५७४ **भृंगमारी.** ( भृंगमारी. )—कडू; आणि वात, कफ, ज्वर, सूज, कंडू, कुष्ठ, व्रणरोग, अस्थिरोग यांची नाशक आहे.—**रा. नि.**

५७५ **तरणी.** ( कांटेशेवती. )—थंड, चिक्कण, मधुर; आणि पित्त, दाह, ज्वर, मुखरोग, तृषा, वांति, यांची नाशक आहे.—**रा. नि.** ग्राही अग्निवर्धक; आणि कफ; पित्त यांची नाशक आहे.—**ध. नि.**

५७६ **राजतरणी.** ( थोर कांटेशेवती. ) तुरट, कफकर, चक्षुष्य, हृद्य, सुगंधी आणि देवांना प्रिय आहे.—**रा. नि.**

५७७ **रक्ताम्लान.** ( रक्त कोरांटा, अबोली. ) तिखट, उष्ण, कांतिकर; आणि वात, सूज, ज्वर, शूल, पोटफुगी, कास, श्वास यांची नाशक आहे.—**रा. नि.**

५७८ **पीताम्लान.** (पिंवळा कोरांटा. )—तुरट, उष्ण, कडू, अग्निदीपक; आणि कफ, वात, सूज, कंडू, रक्तदोष, त्वग्रोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

५७९ **नीलाम्लान** ( निळा कोरांटा, बाणपुष्पी. )—तिखट, कडू; आणि कफ, वात, शूल, कंडू, कुष्ठ, व्रण, सूज, त्वग्रोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

५८० **कंटकुरंटक.** ( पिंवळा रान कोरांटा. )—तिखट, कडू; आणि दंतशूल, कफ, वात, सूज, कास, त्वग्रोग यांचा नाशक आहे.—**रा. नि.** मधुर, चिक्कण, कडू, उष्ण, केशांना काळेपणा आणणारा; आणि कुष्ठ,

कंडू, विष यांचा नाशक आहे.—के. नि. थंड, कडू, केशवर्धक, बलकर, वृष्य; आणि, तृषा, दाह, त्रिदोष यांचा नाशक आहे.—ध. नि. वात, रक्त, कफ यांचा नाशक आहे.—द्र. र.

५८१ **उष्ट्रकांडी**. ( उतटी. )—कडू, उष्ण, रुचिकर; आणि हृद्रोगनाशक आहे. याचें बीज – मधुर, शीतळ, वृष्य, तृप्तिकारक आहे. – रा. नि.

५८२ **पिंडीतगर**. ( पिंडीतगर, अनंत.)–शीतळ, कडू, पथ्य; आणि दृष्टिदोष, भूतोन्माद, विष यांचा नाशक आहे.– रा. नि. चिक्कण; आणि त्रिदोष, मस्तकरोग, अपस्मार यांचा नाशक आहे – ध. नि.

५८३ **दमनक.** ( दवणा. ) – शीतल, कडू, तुरट, तिखट; आणि त्रिदोष, द्वंद्वजरोग, कुष्ठ, फोड यांचा नाशक आहे.–रा. नि. हृद्य आणि भूतबाधानाशक आहे.—ध. नि. प्रमेह, पीटिका, कंडू, ग्रहपीडा यांचा नाशक आहे.–के. नि. मूळव्याध, श्वेतकुष्ठ यांचा नाशक आहे –म. नि.

५८४ **वन्यदमनक**. ( रानदवणा. ) –वीर्यस्तंभक, बलकर; आणि आंवेचा नाशक आहे—रा. नि.

५८५ **तुलसी**. ( तुळस. )–तिखट, कडू, उष्ण, रुचिकर; आणि वात, कफवात, जंतु, भूतबाधा, कृमि यांची नाशक आहे.– रा. नि. पांढरी व काळी अशा दोन प्रकारच्या तुळसी असून गुणांनीं समान आहेत. कास, लूतादिकांचें विष यांची नाशक आहे.–ग. नि. पित्त-कर, दाहकारक, हृद्य, अग्निदीपक; आणि कुष्ठ, कफ, रक्तदोष, मूत्रकृच्छ्र, श्वास यांची नाशक आहे.–म. नि. उचकी, ज्वर, विष, दुर्गंधी, शूल यांची नाशक आहे.

५८६ **मरुबक.** ( मरवा. )—तिखट, कडू, उष्ण; आणि कृमि, कुष्ठ, मलबद्धता, पोटफुगी, शूल, अग्निमांद्य, त्वग्रोग यांचा नाशक आहे.–रा. नि. कफ, रक्तपित्त, कुष्ठ, कंडू, ज्वर यांचा नाशक आहे.–के. नि. हलका आणि शूलनाशक आहे.– द्र. र. विंचवाचें

विष, कफ, वात यांचा नाशक आहे.—म. नि. अग्निवर्धक आहे.— भा. प्र.

५८७ **क्षुद्रपर्णार्जक.** ( बारीक पानांचा अजवला. ), **श्वेतार्जक.** ( पांढरा अजवला ), **कृष्णार्जक.** (काळा अजवला.) तिन्ही प्रकारचे अजवले—तिखट, उष्ण, रुचिकर, सुखानें प्रसव करणारे; आणि कफ, वात, नेत्ररोग, कृत्रिमविष, रक्तदोष आहेत. — रा. नि. यांचे नाशक आहेत.—रा. नि. कफवातज्वरनाशक आहेत.—द्र. र. मूळव्याध, दद्रु, कृमि यांचे नाशक आहेत.—म. नि. अरुचि, वांति, यांचे नाशक आहेत.— ग. नि. पाककाळीं तिखट, दाहकारक, तीक्ष्ण, हृद्य, रुचिदायक, अग्निदीपक, पित्तकर; आणि श्वास, कास, हृद्रोग, पाठीचा शूल यांचे नाशक आहेत.— के. नि.

५८८ **वनबर्बरिका.** ( सुगंधी अजवला. )—उष्ण, सुगंधी, तिखट, नाकाला संतोष देणारा; आणि पिशाचबाधा, वांति, भूतबाधा यांचा नाशक आहे.— रा. नि. पित्तकर; आणि पाठीचा शूल, श्वास, दुर्गंधि, कासरोग, कफ, वात, विष यांचा नाशक आहे.—ध. नि.

५८९ **गंगापत्री.** ( गंगावती. )—तिखट, उष्ण; आणि वात, व्रण यांची नाशक आहे.—रा. नि.

५९० **पाची.** ( पाच. )— तिखट, उष्ण, कडू, तुरट; आणि वातरोग, ग्रहबाधा, भूतबाधा, व्रण, त्वग्रोग यांची नाशक आहे.— रा. नि. दाह, तृषा, विष यांची नाशक आहे.—द्र. र.

५९१ **बालक.** ( पांढरा वाळा. )—शीतळ, कडू, केशांना हित-कर; आणि पित्त, वांति, तृषा, ज्वर, कुष्ठ, अतिसार, श्वेतकुष्ठ, व्रण यांचा नाशक आहे.— रा. नि. कंडु, दाह, कुष्ठ, पित्त, कफ, विसर्प, कफ, रक्तदोष यांचा नाशक आहे.—ध. नि. अग्नि-दीपक, पाचक; आणि रक्तपित्त, कफ, व्रण, उचकी, दाह, हृद्रोग यांचा नाशक आहे.— के. नि. विष नाशक आहे.— म. नि.

५९२ **बर्बर**. ( रानतुळस. ) तिखट, उष्ण, सुगंधी; आणि वातरोग, विसर्प, विष, त्वग्रोग यांची नाशक आहे.– **रा. नि.**

५९३ **सुरपर्ण**. ( सुरपीण. ), तिखट, उष्ण, अग्निदीपक, कांतिकर; आणि कृमि, श्वास, कफवात, वात यांची नाशक आहे.–**रा. नि.**

५९४ **आरामशीतला**. ( रामखाली, सुगंधपत्रा. ) कडू, शीतळ; आणि पित्त, दाह, व्रण, शोष, फोड यांची नाशक आहे.–**रा. नि.** कफ, रक्तपित्त यांची नाशक आहे.—**के. नि.**

५९५ **कमल**. ( कमळ. ) –शीतळ, मधुर, सुगंधी; आणि रक्तपित्त, श्रम, भ्रांति, संताप यांचें नाशक आहे.—**रा. नि.** कांतिकर; आणि कफ, पित्त, तृष्णा, दाह, रक्तदोष, फोड, विष, विसर्प यांचें नाशक आहे.—**म. नि.**

५९६ **पुंडरीक**. ( पांढरें कमल. )– थंड; कडू, मधुर; आणि पित्त, दाह, श्रम, शोष, तृषा, रक्तदोष, भ्रम यांचें नाशक आहे.–**रा. नि.**

५९७ **कोकनद**. ( तांबडें कमळ. ) कडू, मधुर, तिखट, थंड, वृष्य, तृप्तिदायक; आणि कफ, पित्त, वात, रक्तदोष यांचें नाशक आहे.— **रा. नि.**

५९८ **नीलाब्ज**. ( निळें कमळ. ) —शीतळ, मधुर, सुगंधी, देहाला बळकटी आणणारें, रुचिकर, रसायनांत श्रेष्ठ, केशांना हितावह आणि पित्तनाशक आहे.— **रा. नि.**

५९९ **त्रिविधकमल**.( तीन प्रकारचीं कमलें. )– दाह, रक्तपित्त, तृषा, हृद्रोग, वांति, मूर्च्छा यांचीं नाशक आहेत.—**रा. नि.**

६०० **पद्मिनी**. ( कमळणी. )— कडू, तुरट, मधुर, थंड; आणि पित्त, कृमि, शोष, वांति, भ्रांति, संताप, कफपित्त यांची नाशक आहे.— **ध. नि.** जड, रूक्ष, मलावष्टंभक; आणि विष, रक्तदोष यांची नाशक आहे.—**द्र. र.** वातुळ; आणि रक्तपित्त, कफ यांची नाशक आहे.—**भा. प्र.**

६०१ **पद्माक्ष**. ( कमळाक्ष. )—तिखट, मधुर, पाचक, रुचिकर; आणि पित्त, वांति, दाह, रक्तदोष यांचे नाशक आहे.– **रा. नि.** गर्भस्थापक, किंचित् वातुळ; आणि रक्तपित्तनाशक आहे.–**ध. नि.** दाहनाशक आहे.—**द्र. र.** कफवातकारक आहे.—**म. नि.**

६०२ **मृणाल**. ( कमळाची देंठी, भिसें. ) थंड, कडू, तुरट; आणि पित्त, दाह, मूत्रकृच्छ्र, वांति यांचें नाशक आहे.— **रा. नि.** वृष्य व ग्राही आहे.—**द्र. र.**

६०३ **पद्मकंद**. ( कमलकंद. ) —. तिखट, मलावष्टंभक, रूक्ष, रुचिकर, तुरट; आणि कफ, कासरोग, पित्त, तृषा, दाह यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

६०४ **किंजल्क**. ( कमळकेसर. ) —मधुर, रूक्ष, तिखट, थंड, रुचिकर; आणि मुखांतील चट्टे, पित्त, तृषा, दाह यांचें नाशक आहे.– **रा. नि.** ग्राही; आणि रक्तमूळव्याध, कफ, पित्त यांचें नाशक आहे.– **म. नि.** कांतिदायक; आणि विष, सूज यांचें नाशक आहे.–**भा. प्र.**

६०५ **संवर्तिका**. ( कमळाच्या कोंवळ्या पाकळ्या )—थंड, कडू, तुरट; आणि दाह, तृषा, मूत्रकृच्छ्र, मूळव्याध, रक्तपित्त यांच्या नाशक आहेत.– **भा. प्र.**

६०६ **कर्णिका**. ( ज्यांत कमळाचें बीं असतें तो गर्भकोश.) — कडू, तुरट, मधुर, थंड, मुखशुद्धिकर, लघु; आणि तृषा, रक्तदोष, कफ, पित्त यांचा नाशक आहे. –**भा. प्र.**

६०७ **उत्पल**. (लहान कमळ, चंद्रविकाशी.) –थंड, मधुर; आणि पित्त, रक्तदोष, दाह, श्रम, वांति, भ्रांति, कृमि, ज्वर यांचें नाशक आहे. —**रा. नि.**

६०८ **कुमुद**. ( पांढरें कमळ, चंद्रविकाशी, कापूसकमळ. ) — शीतळ, मधुर, पाककाळीं कडू; आणि कफ, रक्तदोष, दाह, श्रम, पित्त, यांचें नाशक आहे. –**रा. नि.**

६०९ **नीलोत्पल.** ( निळें कमळ, चंद्रविकाशी. )— अतिमधुर, शीतळ, सुगंधी, सुखकर, पाककाळीं अति कडू ; आणि रक्तपित्तनाशक आहे.– **रा. नि.**

६१० **उत्पलिनी.** ( चंद्रविकाशी कमलिनी. )— थंड, कडू; आणि पित्त, रक्तदोष, वांति, कफ, कास, तृषा, श्रम यांची नाशक आहे.—**रा. नि.**

६११ **कुमुद्वतीबीज.** ( कुमुदबीज. ) –मधुर, रूक्ष, थंड. व जड आहे.—**रा. नि.**

६१२ **कल्हार.** ( कल्हार, लहान जातीचें पांढरें कमळ. )— ग्राही, मलावष्टंभक, रूक्ष, अति थंड व जड आहे.—**रा. नि.**

६१३ **कमलिनीपत्र.** ( कमळणीचीं पानें. )— मधुर, थंड, तुरट, तिखट, वातुळ, ग्राही, कडू, लघु; आणि कफपित्तनाशक आहेत.

६१४ **पुष्पद्रव.** ( १ पुष्पांतील मध, २ पुष्पांचा सुगंधी अर्क.)– सुगंधी, तुरट, शीतळ, सारक, मादक, तृप्तिकर; आणि दाह, श्रम, वांति, भ्रांति, तृषा, पित्त, कफ, अरुचि, मुखरोग यांचा नाशक आहे.-- **रा. नि.**

६१५ **जात्यादिमोद.** ( जाई आदिकरून पुष्पांचा परिमल. )– जाई ही मृदु, मनोल्हादक, मधुर, अशी असून इचा सुगंध ४ घटकांपर्यंत राहतो; बटमोगऱ्याचा सुगंध ८ घटकांपर्यंत राहतो; बटमोगरा हा मद उत्पन्न करणारा आहे; जाईला सुगंध जास्त असतो; नेवाळीचा सुगंध १ दिवस राहतो; सोनचाफा मद उत्पन्न करणारा असून याचा सुगंध तीन दिवसपर्यंत असतो; आणि केवड्याला तीव्र सुगंध असून त्याचा सुगंध ८ दिवस राहतो.

## ९ आम्रादिवर्ग.

६१६ **आम्र.** ( आंबा. )कोंवळा आंबा—पित्तकर, वातुळ, कफकर, रक्तदोषकर, त्रिदोषकर, रुचिदायक, तुरट, आंबट; आणि कंठरोग-

नाशक आहे. पिकलेला आंबा—जड, मधुर, पुष्टिदायक, धातुवृद्धिकारक, तृप्तिकर, कांतिकारक; आणि त्रिदोष, तृषा, श्रम यांचा नाशक आहे.— **रा. नि.** योनिरोग, अतिसार, प्रमेह यांचा नाशक आहे.– **के. नि.** कफ, वात, व्रण यांचा नाशक आहे.–**द्र. र.** ग्राही आणि मूळव्याधनाशक आहे.–**म. नि.** आंब्याचा रस –हृदयास हितकर, सुगंधी, चिक्कण आणि रुचिकर आहे. साल, मूळ, कोंवळीं पानें— ग्राही, तुरट; आणि कफ, पित्त यांचीं नाशक आहेत. पिकलेला आंबा— हृदयास हितकर, रुचिकर, कांतिकर; आणि रक्तमांसबलदायक आहे.—**ध. नि.**

६१७ **कोशाम्र**. ( कोशिंब, लाल रानआंबा. )—पित्तकर, कफकर, दाहकर, सुजेला उत्पन्न करणारा; आणि वातनाशक आहे. पिकलेला—मधुर, आंबट, रुचिकर, अग्निदीपक, बलकर, आणि पुष्टिदायक आहे.—**रा. नि.** कुष्ठ, मूळव्याध, पित्त, व्रण, कफ यांचा नाशक आहे.—**द्र. र.** याच्या आठींतील मगज–अग्निदीपक, बलकर; आणि पित्त वात यांचा नाशक आहे.—**रा. नि.** ग्राही आणि वातनाशक आहे.—**भा. प्र.**

६१८ **राजाम्र**. ( राज आंबा, कलमी आंबा. ), **महाराजाम्र.** ( महाराजआंबा ), **बद्धारसाम्र**.( अति थोर रसाळ आंबा. ) अपक्व.– तिखट, आंबट, पित्तकर, दाहकारक आहे. पिकलेला— गोड; मधुर, पुष्टिकर, वीर्यप्रद, बलकर आहे. तिन्ही प्रकारचे राजआंबे सारखे असून एकापेक्षां एक रसानें व गुणानें अधिक आहे. राजआंबा याचें कोंवळें फळ—रक्तदोषकारक, वातकारक, कफकर, श्वासकारक आणि पित्तकर आहे. पिकलेलें फळ— मधुर, शीतळ, जड, वृष्य; आणि तृषा, दाह, त्रिदोष, श्रम, श्वास, अरुचि यांचें नाशक आहे. आंब्याची साल– तुरट आहे. याचें मूळ–किंचित् सुगंधि, रुचिकर, ग्राही; आणि थंड आहे. यांचीं फुलें–रुचिकारक आहेत.–**रा. नि.**

६१९ **जंबू.** ( जांभूळ. )—तुरट, मधुर, मलावष्टंभक, रुचिकर, पाचक; आणि कृमिरोग, श्रम, पित्त, दाह, शोष, कंठरोग, कफ, श्वास, अतिसार, कास, यांचा नाशक आहे.—**रा. नि.** वातुळ आणि ग्राही आहे.—**ध. नि.**

६२० **महाजंबू.** ( इरसाल जांभूळ. )—मधूर, तुरट, उष्ण, मुख-जाड्यकर, स्वर चांगला करणारें, मलावष्टंभक ; आणि मुखस्राव, श्रम, अतिसार, शोष, श्वास, कास, कफ यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

६२१ **काकजंबू.** ( नदीजांभूळ. )—तुरट, आंबट, पाककाळीं मधुर, जड, वीर्यकारक, पुष्टिकर, बळदायक; आणि दाह, श्रम, अतिसार यांचें नाशक आहे.—**रा. नि.** रक्तदोष, व्रण, कफ, पित्त यांचें नाशक आहे.—**द्र. र.**

६२२ **भूमिजंबू.** (भूयजांभूळ.)—तुरट, मधुर, हृदयास हितावह, ग्राही, वीर्यवर्धक, पुष्टिदायक; आणि कफ, पित्त, हृद्रोग, कंठरोग यांचें नाशक आहे.—**रा. नि.** याच्या बियांतील मगज मधुमेहनाशक आहे.

६२३ **पनस.** ( फणस. )—मधुर, बुळबुळित, जड, हृदयास हितावह, बलकर, वीर्यवर्धक, रुचिकर, जिरण्यास कठीण, ग्राही; आणि श्रम, दाह, शोष यांचा नाशक आहे. यांचें बीज—किंचित् तुरट, मधुर, वातुळ, जड, याच्या फळाचा विकार नाहींसा करणारें, रुचिकर; आणि त्वग्रोग नाशक आहे. कोंवळा फणस—नीरस (रसहीन, स्वादहीन ) आणि हृदयास हितावह आहे. मध्यम पिकलेला फणस—अग्निदीपक, आणि लवणयुक्त केला असतां रुचिदायक आहे.—**रा. नि.** शीतळ, मलावष्टंभक, जड, बलकर, कफवर्धक, मेदकारक; आणि आंव, वात, दाह यांचा नाशक आहे. हा गुल्मरोगी व ज्याचा अग्नि मंद झाला आहे त्यांस वर्ज्य आहे.—**भा. प्र.** तुरट, वातुळ, वृष्य, पाककाळीं मधुर, शीतळ, तृप्तिकर, कफकर; आणि रक्तपित्त, वातरोग, पित्त, रक्त-

क्षय यांचा नाशक आहे.– **के. नि.** पित्तनाशक आहे.—**द्र. र.** वीर्यवर्धक आणि क्षतक्षयनाशक आहे.– **म. नि.** याचें बीज–वृष्य, जड, मधुर, मलबद्धकारक, मूत्रबद्धक; आणि वातरोग, पित्त, कफ यांचें नाशक आहे.–**भा. प्र.**

६२४ **कदली.** ( केळ. ) कोंवळें फळ–मधुर, आंबट, तुरट, थंड, रुचिकारक आणि पित्तनाशक आहे. याप्रमाणेंच केळीचा मधला सोंट व फुलें यांचेही गुण आहेत. पानें–शूलनाशक आहेत. कंद–कृमिनाशक आहे. पक्क फळ—तुरट, मधुर, थंड, बलकर, वृष्य, कफकर, जड, मंदाग्निरोग्यास अहितकर, ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे त्यास उत्तम सुखकारक, तत्काल वीर्यवर्धक, कांतिवर्धक, तृप्तिदायक, जिरण्यास कठीण; आणि रक्तपित्त, तृषा, ग्लानि यांचें नाशक आहे.– **रा. नि.** मलावष्टंभक, मांसल; आणि दाह, क्षुधा, वातरक्त याचें नाशक आहे.– **के. नि.** मेह आणि नेत्ररोग यांचे नाशक आहे. –**भा. प्र.** केळीचें झाड–चिक्कण, मधुर आणि रक्तपित्त, योनिरोग यांचें नाशक आहे.– **के. नि.** केळीचा गाभा शीतळ, ग्राही, हृदयास हितावह; आणि तृषा, मूत्रकृच्छ्र, अतिसार, दाह, मोह, रक्तपित्त, सोमरोग ( योनिरोग ) यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

६२५ **काष्ठकदली.** ( लोखंडी केळ. )—रुचिकर, थंड, जड, मंदाग्निकारक, जिरण्यास कठीण, मधुर; आणि रक्तपित्त नाशक आहे.– **रा. नि.**

६२६ **गिरिकदली.** ( रानकेळ. )—थंड, बलकर, जिरण्यास कठीण, रुचिकर, वीर्यवर्धक, जड; आणि तृषा, पित्त, दाह, शोष यांची नाशक आहे.– **रा. नि.**

६२७ **सुवर्णकदली.** ( सोनकेळ. )—मधुर, थंड, अल्पभक्षणानें पथ्यकर, जड, वृष्य, आणि दाह, तृषा, कफ यांची नाशक आहे– **रा. नि.**

६२८ **नारिकेल.** ( नारळ. )—जड, चिक्कण; आणि शीत-पित्तनाशक आहे. अर्धपक्क झालेला नारळ–जिरण्यास कठीण; आणि तृषा, शोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** पित्तकर, मधुर, शीतळ, बलप्रद, मांसवर्धक आहे.–**ध. नि.** धातुवर्धक, वीर्यवर्धक, बस्तिशोधक, तृप्तिकर, जिरण्यास कठीण, हृदयास हितकर, मलावष्टंभक, कफकर; आणि दाह, क्षतक्षय, वात, पित्त यांचा नाशक आहे.—**के. नि.** पित्त, ज्वर यांचा नाशक आहे.–**भा. प्र.** नारळांतील पाणी–हलकें, बलकर, शीतळ, रसकाळीं व पाककाळीं मधुर; आणि पित्त, पीनस, तृषा, रक्तदोष, दाह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** भ्रांतिनाशक आहे.–**ध. नि.** चिक्कण, अग्निदीपक, हृद्य, वीर्यवर्धक आणि बस्ति-शोधक आहे. झाडाच्या शेंड्याचा गाभा—पित्तनाशक आहे. याचें पक्व फळ—कफकर, वीर्यवर्धक, जड; आणि वात, रक्तपित्त यांचें नाशक आहे.—**के. नि.** पित्तकर, रुचिकर, बलकर, मधुर, अग्निदीपक, वृष्य आणि वीर्यवर्धक आहे.—**रा नि.** मलावष्टंभक आणि दाहकर आहे.— **भा. प्र.**

६२९ **मधुनालिकेर.** ( मोहाचा नारळ. )—मधुर, बलकर, पुष्टिकर, थंड, कांतिवर्धक, रुचिकर, जिरण्यास कठीण, जंतुकारक, चिक्कण, कामोत्तेजक, अग्निमांद्यकारक, आंवेला वाढविणारा, जरानाशक आणि पित्तहारक आहे.—**रा. नि.** नारळांतील खोबरें—चिक्कण, जड, जिरण्यास कठीण, दाहकारक, मलावष्टंभक, रुचिकर, बलकर आणि वीर्यवर्धक आहे.—**रा. नि.**

६३० **खर्जूरी.** ( थोर शिंदी. )—तुरट आहे. पक्व खर्जूरी—मदकर, तुरट, कफकर, कृमिकारक, वृष्य, धातुवर्धक आणि पित्तवाशक आहे.– **रा. नि.** जड, तृप्तिकर, शीतळ, हृद्य, मधुर; आणि क्षतक्षय, रक्तपित्त यांची नाशक आहे.– **ध. नि.**

६३१ **मधुखर्जूरिका.** ( गोड शिंदी, खजूरी. ) वृष्य, मधुर, थंड,

जंतुकारक बहुवीर्यआरक; आणि दाह, पित्त यांची नाशक आहे.— **रा. नि.** कोठ्यांत वात उत्पन्न करणारी, मलावष्टंभक; आणि कफवात, ज्वर, ऊर्ध्वश्वास, कफ, रक्तदोष यांची नाशक आहे.—**के. नि.** वात, पित्त, मूर्च्छा, वातरक्त, कफ, श्वास यांची नाशक आहे. वृक्षाच्या वरच्या भागांतील आंतला नार—वृष्य, थंड; आणि रक्तपित्तनाशक आहे.— **म. नि.**

६३२ **भूखजूरी.** ( लघु शिंदी. )— थंड, मधुर; आणि दाह, पित्त यांची नाशक आहे.—**रा. नि.**

६३३ **पिंडखर्जूरी.** ( खजूर, पेंडखजूर. )—मदकर, थंड, जड, वृष्य, मधुर; आणि पित्त, दाह, श्वास, श्रम, तृष्णा, दाह, शोष यांची नाशक आहे.—**रा. नि.** थंड, तृप्तिदायक, बकलर, पुष्टिदायक, वीर्यवर्धक, अग्निमांद्यकारक, चिक्कण, हृद्य, मदकारक, पित्तकारक, दीपक; आणि रक्तपित्त, विष, कफ, वात यांची नाशक आहे.—**भा. प्र.**

६३४ **चार.** ( चारोळी .) इचें पक्व फळ—वृष्य, मदकर, आंबट व जड आहे. इचें बीज— मधुर, वृष्य; आणि पित्त, दाह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** थंड, चिक्कण, धातुवर्धक; आणि कफ, पित्त यांचें नाशक आहे.—**के. नि.** रक्तपित्त, वात, क्षतक्षय, रक्तदोष यांचें नाशक आहे.—**द्र. र.** मलावष्टंभक, कफकारक, बलकर, सारक आणि तृषानाशक आहे.—**म. नि., भा. प्र.** इचें मूळ— तुरट; आणि रक्तदोष, कफ, पित्त यांचें नाशक आहे. इचा नार—मधुर, वृष्य; आणि पित्त, वात यांचा नाशक आहे.—**ध. नि.**

६३५ **भल्लातक.** ( बिबा. )—तिखट, कडू, तुरट, उष्ण; आणि कृमि, कफ, वात, उदर, मलमूत्रबद्धरोग, प्रमेह, मूळव्याध यांचा नाशक आहे. याचें फळ – किंचित् उष्ण, तुरट, मधुर; आणि श्वास, मळमूत्रबद्धरोग, मलबद्धता, श्रम, शूल, कफ, उदर, पोटफुगी, कृमि यांचें नाशक आहे. याच्या फळांतील मगज— तृप्तिकर, अग्निदीपक;

आणि शोष, दाह, पित्त, वात, अरुचि यांचा नाशक आहे.–**रा. नि.** धातुवर्धक, जड; आणि गुल्म, वात, कृमि, कफ, व्रण, ज्वर, श्वास, कुष्ठ, संग्रहणी, अग्निमांद्य यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

६३६ **क्षीरी.** ( खिरणी. )—मधुर, जड, तृप्तिकर, वृष्य, स्थूलत्व देणारी, हृद्य, चिक्कण; आणि पित्त, प्रमेह यांची नाशक आहे.—**रा नि.** शीतळ, रुचिकर आणि वातनाशक आहे.–**ध. नि.** मलावष्टंभक, ग्राही; आणि तृषा, मूर्च्छा, भ्रम, त्रिदोष, क्षय, रक्तदोष यांची नाशक आहे.–**म. नि.**

६३७ **दाडिम.** ( डाळिंब. )–मधुर, आंबट, तुरट, ग्राही, अग्निदीपक, शीतळ, लघु, उष्ण, रुचिकर; आणि खोकला, वात, कफ, पित्त, श्रम, ज्वर यांचें नाशक आहे. डाळिंब आंबट व गोड असें दोन प्रकारचें आहे.—**रा. नि.** हृद्य, स्मृतिदायक; आणि कंठरोग, मुखरोग, शोष यांचें नाशक आहे.—**के. नि.**

६३८ **तिंदुक.** ( टेंभुरणी. )—तुरट, ग्राही; आणि वातकारक आहे. पिकलेलें फळ—मधुर, चिक्कण, जिरण्यास कठीण आणि कफकारक आहे.—**रा. नि.** वात आणि व्रण यांची नाशक आहे.—**के. नि.** कफपित्तनाशक आहे.—**ध. नि.** इचा नार—पित्तनाशक आहे.—**म. नि.** पिकलेलें फळ—ग्राही, शीतल आणि वातुळ आहे.—**भा. प्र.** ग्राही, शीतल, रूक्ष, मलबद्धक, अरुचिकारक, वातकारक; आणि कफ, पित्त यांचे नाशक आहे.—**के. नि.** कफकारक, स्वच्छ, जड आणि मूळव्याध, प्रमेह यांचें नाशक आहे.–**म. नि.**

६३९ **काकतिंदुक.** ( काकटेंभुरणी, कांटे टेंभुरणी. ) – तुरट आंबट, जड आणि वातकारक आहे. पिकलेलें फळ—किंचित् मधुर, कफकारक; आणि पित्त, वांति यांचें नाशक आहे.–**रा. नि.** शीतळ आहे.–**के. नि.** संग्राही आहे.–**म. नि.** मदकारक; आणि कफ, रक्तपित्त यांची नाशक आहे.–**भा. प्र.**

६४० **अक्षोट.** ( अक्रोड. )—मधुर, बलकर, चिक्कण, उष्ण, शीतळ, कफकर; आणि वात, पित्त, रक्तदोष यांचें नाशक आहे.— **रा. नि.** सारक आहे.—**द्र. र.** हृद्रोगनाशक आहे.— **ग. नि.** रसकाळीं व पाककाळीं मधुर, चिक्कण, जड, धातुवर्धक, वीर्यवर्धक, बलकर, मलावष्टंभक, रुचिकर, हृद्य; आणि रक्तदोष, क्षय, वात, दाह, यांचें नाशक आहे. —**के. नि.**

६४१ **लघुपीलु.** ( लहान पीलु. )—तिखट, तुरट, मधुर, आंबट, सारक, गोड, अग्निदीपक; आणि गुल्म, मूळव्याध यांचा नाशक आहे.— **रा. नि.** वातरक्त आणि कफ यांचा नाशक आहे.—**म. नि.** अग्निदीपक, रक्तपित्तकारक; आणि बस्तिरोगनाशक आहे.—**ग. नि.** याचा नार—कफवातनाशक आहे— **ध. नि.** कफ, वात, मूतखडा, प्लीहा, विषदोष, उदर, आनाह ( मलबद्धरोग ) यांचा नाशक आहे.—**के. नि.**

६४२ **बृहत्पीलु.** ( थोर पीलु. )—मधुर, वृष्य, पित्तशामक, रुचिकर, अग्निदीपक; आणि विषदोष, आंव यांचा नाशक आहे.— **रा. नि.**

६४३ **पारेवत.** ( उत्तरी, पालेवत, द्वीपांतर खजूरी. )—मधुर, वृष्य, हृद्य, चिक्कण, वीर्यकारक; आणि कृमि, वात, ज्वर, तृष्णा, दाह, मूर्च्छा, भ्रम यांची नाशक आहे—**रा. नि.** कफकारक आहे.—**द्र. र.** शीतळ, जड आणि उष्ण आहे.—**म. नि.** अग्निशामक आहे.—**ग. नि.**

६४४ **महापारेवत.** ( माणवक, थोर द्वीपांतर खजूरी. )—मदकर, बलकर, पुष्टिवर्धक, वृष्य; आणि मूर्च्छा, ज्वर यांची नाशक आहे.— **रा. नि.** तीक्ष्णाग्नि आणि वात यांची नाशक आहे.—**के. नि.**

६४५ **मधूक.** ( मोहाचा वृक्ष. )—मधुर, शीतळ, वातुळ, वीर्यवर्धक, पुष्टिवर्धक, धातुवर्धक, हृदयास अहितकर; आणि पित्त, दाह, भ्रम, कृमिरोग यांचा नाशक आहे. मोहांचीं फुलें—जड; आणि फळें—वातपित्तशामक आहेत.—**रा. नि.** विषनाशक आहे.—**द्र. र.** व्रणाला रोपण

करणारा आहे.—**म. नि.** तुरट; आणि व्रण, वात, कफ यांचा नाशक आहे. याचीं फुलें—मधुर, शीतळ आहेत. याचीं फळें—जड, उष्ण, मलावष्टंभक, धातुवर्धक, बलकर, कफकर; आणि वातरोग, रक्तपित्त, तृषा, दाह, श्वास, कफ, क्षतक्षय यांचीं नाशक आहेत. पक्व फळें—बलकर आहेत.—**के. नि.**

६४६ **जलमधूक.** ( जलमोह .) याचीं फुलें—शीतळ, वृष्य, हृद्य; आणि पित्त, दाह यांचीं नाशक आहेत. याचीं फळें—वातपित्तनाशक आहेत.—**रा. नि.**

६४७ **भव्य.**( न्हीव. ) कोंवळें— आंबट, तिखट, उष्ण आणि वातकफनाशक आहे. पिकलेलें—मधुर, आंबट, रुचिकर; आणि भ्रम, शूल यांचें नाशक आहे.—**रा. नि.** स्वच्छ, हृद्य, मुखशोधक, वातुळ, शीतळ, ग्राही, मलबद्धकारक; आणि रक्तदोष, वांति, कफ, पित्त यांचें नाशक आहे.—**के. नि.**

६४८ **आरुक.** ( आलुबखार. )—मधुर, शीतळ; आणि रक्तदोष, मूळव्याध, प्रमेह, गुल्म यांचा नाशक आहे.—**रा. नि.** तुरट, मलभेदक, जड, उष्ण आणि कफपित्तनाशक आहे.—**के. नि.** याचें पक्व फळ—धातुवर्धक, रुचिकर, मुखशोधक; आणि वातज्वर, कफ यांचें नाशक आहे.—**म. नि.**

६४९ **द्राक्षा.** ( द्राक्षें. )—अति मधुर, आंबट, शीतळ, रुचिकर, वृष्य, तृप्तिकारक; आणि पित्तरोग, दाह, मूत्ररोग यांचीं नाशक आहेत.—**रा. नि.** हृद्य, स्वरकारक, चिक्कण; आणि तृषा, श्वास, क्षय, रक्तपित्त, ज्वर यांचीं नाशक आहेत.—**ध. नि.**

६५० **गोस्तनी.** ( काळीं द्राक्षें. )—मधुर, शीतळ, हृद्य, मदकारक; आणि दाह, मूर्च्छा, ज्वर, श्वास, तृषा, उचकी यांचीं नाशक आहेत.—**रा. नि.** चिक्कण, सारक, वृष्य; आणि वातरक्त, श्रम, श्वास, कास यांचीं नाशक आहेत.—**ध. नि.**

६५१ **काकली द्राक्षा.** ( किसमिस. )—थंड, प्रिय; आणि श्वास, उचकी यांची नाशक आहे. द्राक्षांचे विशेष गुण कोंवळें फळ—तिखट, निर्मळ आणि रक्तपित्तकारक आहे. मध्यम पिकलेलें फळ—आंबट आणि सुकल्यावर रुचिकर व अग्निवर्धक आहे. पक्क होऊन वाळलेलें—तृप्तिकारक , पुष्टिदायक आणि श्रमनाशक आहे. तसेंच थंड, मधुर, चिक्कण, रुचिकर, डोळ्यांस हितकर, तृप्तिकारक, क्षीणवीर्यास कामोत्तेजक; आणि रक्तपित्त, श्वास, कास, श्रम, वांति, सूज, तृष्णा, ज्वर, दाह, मलबद्धता, भ्रम, यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

६५२ **कर्मर.** ( कमरक. )—आंबट, उष्ण, पित्तकारक आणि वातनाशक आहे. पिकलेलें—मधुर, आंबट, बलकर, पुष्टिप्रद आणि रुचिकर आहे.—**रा. नि.** कफवातनाशक आहे.—**म. नि.**

६५३ **परूषक.** ( फालसा. ) अपक्क—तिखट, आंबट, पित्तकर आणि कफवातनाशक आहे. पक्क फळ—उष्ण, रुचिप्रद, मधुर, तृप्तिकारक; आणि पित्त, सूज, यांचें नाशक आहे.—**रा. नि.** ज्वर, क्षय, वातरोग यांचें नाशक आहे.—**भा. प्र.** वीर्यवर्धक, शीतळ, हृद्य, मलावष्टंभक, धातुवर्धक; आणि वातरोग, रक्तपित्त, तृषा, दाह यांचें नाशक आहे.—**के. नि.**

६५४ **अश्वत्थ.** ( पिंपळ. )—मधुर, शीतळ, तुरट; आणि कफ, पित्त, रक्तदोष, दाह, योनिरोग यांचा नाशक आहे. यांचें पक्क फळ—हृद्य, शीतळ; आणि रक्तपित्त, विष, दाह, वांति, शोष, अरुचि यांचें नाशक आहे.—**रा. नि.** जिरण्यास कठीण आहे.—**ध. नि.** रूक्ष, जड, कांतिकर; आणि व्रण, कफ, रक्तपित्त यांचा नाशक आहे.—**के. नि.** रक्तदोष, स्तनावर होणारी गांठ यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

६५५ **वट.** ( वड. )—तुरट, मधुर, थंड; आणि कफपित्त, ज्वर, दाह, तृषा, मोह, व्रण, सूज यांचा नाशक आहे.—**रा. नि.** योनिरक्त, संग्रहणी, फोड, दाह यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

६५६ **नदीवट.** ( नदीवड, खुजा वड. )—तुरट, मधुर, थंड; आणि पित्त, दाह, तृषा, श्रम, श्वास, वांति यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

६५७ **अश्वत्थी.** ( लघु पिंपळ. )–मधुर, गरोदर स्त्रीस हितकर, तुरट; आणि रक्तपित्त, विष, दाह यांचा नाशक आहे –**रा. नि.**

६५८ **प्लक्ष.** ( पिंपरी. ),**ह्रस्वप्लक्ष.** ( लघुपिंपरी, नांदरूख. )— तिखट, तुरट, थंड; आणि रक्तदोष, मूर्च्छा, भ्रम, बडबड यांची नाशक आहे.– **रा. नि.** रक्तातिमारनाशक आहे.–**द्र. र.** मेदोरोग, विसर्प यांची नाशक आहे.—**के. नि.** व्रण, योनिरोग, दाह, पित्त, कफ, रक्तदोष, सूज, रक्तपित्त यांची नाशक आहे.–**भा. प्र.** नांदरूख गुणांनीं जास्त आहे.–**रा. नि.** मधुर, तुरट, ग्राही, रसकाळीं व पाककाळीं तिखट, लघु, उष्ण; आणि पित्त, कफ, रक्तदोष, विष यांची नाशक आहे.—**भा. प्र.**

६५९ **उदुंबर.** ( उंबर. )–तुरट, मधुर, थंड, कृमिकारक; आणि रक्तपित्त, मूर्च्छा, दाह, तृषा यांचा नाशक आहे. पक्व फळ– मधुर; आणि पित्त, श्रम, शोष यांचं नाशक आहे. अपक्व फळ–तुरट, अति अग्निदीपक, रुचिकर, मांसवृद्धिकर आणि रक्तदोषनाशक आहे.– **रा. नि.** रूक्ष, जड; आणि व्रणास शोधन व रोपण ( भरून आणणें ) करणारा आहे.—**के. नि.** मोडलेले हाडांस सांधणारा; आणि योनिरोग, अतिसार यांचा नाशक आहे.–**द्र. र.** गर्भोत्पत्तिकारक आणि वीर्यवृद्धिकर आहे.–**ग. नि.** वात, पित्त यांचा नाशक आहे.– **के. नि.**

६६० **नद्युदुंबरिका.** ( नदीउंबर. )—हा पूर्वींच्याहून गुणांनीं किंचित् कमी आहे.

'६६१ **कृष्णोदुंबरिका.** (काळा उंबर, भुईउंबर.)—शीतळ, मदकर, तिखट; आणि त्वचेचे रोग, रक्तपित्त यांचा नाशक आहे. याची साल– अतिसारनाशक आहे. याच्या फळाची साल–शीतळ, तुरट, गर्भाचें

पोषण करणारी, दुग्धप्रद; आणि व्रणनाशक आहे.—**रा. नि.** तुरट, कडू, मलस्तंभक; आणि कफ, पित्त, व्रण, श्वेत कुष्ठ, कावीळ, पांडु यांचीं नाशक आहे. याचें फळ — तृप्तिकारक, ग्राही, मलावष्टंभक आणि दाहनाशक आहे.—**के. नि.** धातुवर्धक; आणि त्रिदोष, कफ, रक्तदोष, त्वग्रोग, सूज यांचें नाशक आहे.—**द्र. र.**

६६२ **बदरी.** ( बोर. )—आंबट, मधुर, तुरट, उष्ण, रुचिकर, पाचक; आणि रक्तदोष, श्रम, शोष, अतिसार यांचें नाशक आहे. याच्या पानांचा लेप—ज्वर व दाह यांचा नाशक आहे. बोरीची साल—फोडाची नाशक आहे. बीज—नेत्ररोग, कफ, वात, पित्त याचें नाशक आहे.—**ध. नि.** फळांतील गीर—वीर्यवर्धक; आणि श्वास, कास, तृषा, दाह, वांति, वात, पित्त यांचा नाशक आहे.—**के. नि.**

६६३ **राजबदर.** ( रामबोर. )—मधुर, वृष्य, शीतळ, वीर्यप्रद; आणि दाह, पित्त, वात, श्रम, शोष यांचें नाशक आहे—**रा. नि.**

६६४ **भूबदरी.** ( भुयबोर, चणबोर. )— आंबट, मधुर, अग्निदीपक; पाचक, रुचिकर, किंचित् रक्तपित्ताला करणारें आणि कफवातनाशक आहे.— **रा. नि.**

६६५ **लघुबदरी.** ( क्षुद्रबोर, बोराटी. ) पिकलेलें—मधुर, आंबट, रुचिकर, चिक्कण, जंतुकारक; आणि किंचित् पित्त, दाह, शोष, कफ, वात यांचें नाशक आहे.—**रा. नि.** अग्निदीपक; आणि तृषा, आंत्र, कफ, वात, पित्त यांचें नाशक आहे.—**के. नि.**

६६६ **बीजपूर.** (महाळुंग. )—आंबट, तिखट, उष्ण, कंठशुद्धिकर, हृद्य, अग्निदीपक, रुचिकर; आणि श्वास, कास, वात यांचें नाशक आहे.—**रा. नि.** तृषानाशक आहे.—**ध. नि.** जिव्हा व हृदय यांस शोधन करणारें; आणि श्वास, कास, कफ, वांति, शूल यांचें नाशक आहे.—**के. नि.** याचें केसर—अग्निदीपक, लघु, ग्राही; आणि गुल्म, मूळव्याध, हृद्रोग, श्वास, मलबद्धत्व, अजीर्ण, कास, संग्रहणी यांचें नाशक

आहे.–**रा. नि.** अग्निदीपक आणि रक्तपित्तकारक आहे.–**ध. नि.** रक्तमांसवर्धक, बलकर, हृद्य, कांतिकर, रुचिकर, वीर्यवर्धक; आणि शूल, उचकी, उदर, मदात्ययरोग, अग्निमांद्य, कफ, वात, श्वास, कास, अपची, पित्तवात, पार्श्वशूल ( पाठीचा शूल ), हृदयांतील शूल, बस्तिशूल यांचें नाशक आहे.—**के. नि.** याचें बीज— कडू; आणि गुल्म, मूळव्याध, सूज यांचें नाशक आहे.–**रा. नि.** उष्ण, जिरण्यास कठीण, गर्भदायक; मूर्च्छा, मद व भ्रम यांस करणारें आहे.–**के. नि.** बलकर; आणि वात, कफ, पित्तवात यांचें नाशक आहे.–**द्र. र.** याचीं पानें-शीतळ, ग्राही; आणि रक्तपित्तनाशक आहेत. –**म. नि.** याचें कोंवळें व मध्यम पक्व फळ-त्रिदोषकारक आहे.–**रा. नि** पक्व फळ-कांतिकर, हृद्य, पुष्टिकर, बलकर; आणि शूल, अजीर्ण, मलबद्धता, कफ, वात, श्वास, कास, अग्निमांद्य, सूज, अरुचि यांचें नाशक आहे.–**रा. नि.** फळाची साल—कडू, जिरण्यास कठीण, चिक्कण, उष्ण; आणि कृमि, कफ, वात यांची नाशक आहे.–**रा. नि.** तिखट आहे.–**के. नि.** जड, शीतळ, मधुर आहे.–**ध. नि.** मांसांतील रोग, वातरोग यांची नाशक आहे.–**द्र. र.** फळांतील मधली त्वचा—पित्तकर, रुचिकर, अग्निवर्धक; आणि वात, शूल, कंठरोग, उदर, वांति, कफ यांची नाशक आहे.–**रा. नि.**, **ध. नि.** मधुर, जड, शीतळ, धातुवर्धक; आणि कफकारक आहे.— **के. नि.** याचें मूळ — कफकारक, जिरण्यास कठीण, तिखट, पाचक; आणि कृमि, गुल्म यांचें नाशक आहे.–**रा. नि.** महाळुंगाचीं फुलें—शीतळ, ग्राही; आणि रक्तपित्त, वात यांचीं नाशक आहेत. मूळ—मोडशी, शूल, मूळव्याध, मलबद्धता यांचें नाशक आहे.—**के. नि.**

६६७ **वनबीजपूर.** ( रानमहाळुंग. )—तिखट, उष्ण, आंबट, रुचिकारक; आणि वात, आंव, कृमि, कफ, श्वास यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

६६८ **मधुकर्कटी.** ( पपई. )—मधुर, थंड, जड, जिरण्यास कठीण, रुचिकर, वृष्य; आणि त्रिदोष, दाह, यांची नाशक आहे.—**रा. नि.** क्षय, श्वास, कास, उचकी यांची नाशक आहे.—**के. नि.**

६६९ **आमलकी.** ( आंवळी ).—तुरट, आंबट, मधुर, शीतळ, लघु, रसायन ( शरीराची जरा दूर करणारी ); आणि दाह, पित्त, वांति, प्रमेह, सूज यांची नाशक आहे. इचें फळ—तुरट, मधुर, किंचित् आंबट, रुचिकर, तिखट, अतिशीतळ; आणि कफ, रक्तपित्त, श्रम, मलमूत्रनिरोध, पोटफुगी, मलबद्धत्व यांचें नाशक आहे.—**रा. नि.** केशांना हितकर, सारक, वृष्य; आणि वांति, प्रमेह यांची नाशक आहे.—**द्र. र.** आंबट आहे ह्मणून वातार्चे नाशक आहे; मधुर व शीतळ आहे ह्मणून पित्तार्चे नाशक; रूक्ष व तुरट आहे ह्मणून कफार्चे नाशक आहे; याप्रमाणें हें त्रिदोषनाशक आहे.—**म. नि.** मोडलेल्या हाडास सांधणारी; आणि तृषा, पित्त यांची नाशक आहे.—**के. नि.** आंवळीचा नार– तुरट, वृष्य, मधुर; आणि प्रदर, वांति, वात, पित्त, ज्वर, श्वास, कास यांचा नाशक आहे. जसे फळाचे गुण असतात त्याप्रमाणेंच त्या त्या झाडाच्या नाराचेही गुण असतात. अतिसार, शैत्य, अभिन्यास ( सन्निपात ), बाळंतरोग, वात या रोगांत आंवळा देऊं नये.

६७० **काष्ठधात्री.** ( लघु आंवळी. ) इचें फळ—मधुर, तुरट, तिखट, शीतळ आणि रक्तपित्तनाशक आहे. हें पूर्वीच्याहून गुणांनीं जास्त आहे. —**रा. नि.**

६७१ **चिंचा.** ( चिंच. ) अपक्व—अति आंबट आहे. पक्व–मधुर, आंबट; आणि पित्त, दाह, कफ यांस वाढविणारी आहे. पक्व चिंचेचा रस—मधुर, आंबट, रुचिकर, सुजेला पिकविणारा आणि लेपानें व्रणरोगनाशक आहे. चिंचेचीं पानें—सूज आणि रक्तदोष यांचीं नाशक आहेत. चिंचेच्या वाळलेल्या सालीचा खार—शूळ आणि

अग्निमांद्य यांचा नाशक आहे.—रा. नि. अपक्व चिंच—उष्ण, जड आणि वातनाशक आहे.—के. नि. कफ, पित्त, रक्तपित्त यांस करणारी आहे.—भा. प्र. इचें वाळलेलें फळ—हृद्य; आणि कफ, तृषा, ग्लानि यांचें नाशक आहे.—के. नि. श्रम, कृमि, दाह यांचें नाशक आहे.—द्र. र. श्रम, भ्रांति यांचें नाशक आहे.—म. नि. पक्व चिंच —वातनाशक आहे.—ध. नि. उष्ण, जड, सारक, बस्तिशोधक, हृद्य, रुचिकर; आणि अग्निदीपक आहे.—के. नि. जंतुनाशक आहे.—द्र. र. रूक्ष आहे.—भा. प्र. चिंचेचें चार—अति आंबट, कफकर, दाहकारक; आणि वातनाशक आहे. समभाग साखर घालून केलेलें—दाह, पित्त, कफ यांचें नाशक आहे.—रा. नि.

६७२ **आम्रातक.** ( अंबाडा. ) अपक्व—तुरट, आंबट; आणि हृदय व कंठ यांस हर्ष देणारा आहे. पक्व—मधुर, आंबट, चिक्कण; आणि पित्त, कफ यांचा नाशक आहे.—रा. नि. वृष्य, किंचित् वातकारक, जड, रुचिकर; आणि आमवात, कफ, रक्तपित्त यांचा नाशक आहे.—ध. नि. पक्व--रसकाळीं उष्ण, तृप्तिकारक, मलावष्टंभक, धातुवर्धक, जड; आणि रक्तदोष, क्षय, दाह, क्षतें यांचा नाशक आहे.—के. नि.

६७३ **नारंग.** (नारिंग.)— मधुर, आंबट, जड, उष्ण, रुचिकर, बलकर; आणि वात, आंव, कृमि, शूल, श्रम यांचें नाशक आहे.—रा. नि. स्वच्छ, जिरण्यास कठीण, हृद्य आणि वातनाशक आहे.—ध. नि. सारक, कफकारक आणि रक्तपित्तनाशक आहे.—के. नि.

६७४ **निंबूक.** ( निंबू. )— रसकाळीं आंबट, तिखट, उष्ण, डोळयांस हितकर, अग्निवृद्धिकारक; आणि गुल्म, आमवात, कास, कफ, वांति, कंठरोग यांचें नाशक आहे.—रा. नि. मलबद्धत्व, बद्धगुदोदर यांस हितकर आणि विषूचिनाशक आहे—भा. प्र. रुचिकर, पित्तकारक आणि वातनाशक आहे.—के. नि. विष, उदर, क्षय, मूत्रशर्करा, वात, पित्त, तृषा, शोष, कटिग्रह ( कंबरदुखी ), त्रिदोष आणि वात यांचें नाशक आहे.—भा. प्र.

६७५ **जंबीर.** ( ईडनिंबू. ) अपक्व-रसकाळीं आंबट, मधुर, पित्त-कर, बलकर, पाचक, रुचिकर, अग्निवर्धक आणि वातनाशक आहे. पक्व-मधुर, तृप्तिकर, रुचिकर, पुष्टिदायक, वीर्यवर्धक, कांतिकर; आणि रक्तपित्त, कफ यांचें नाशक आहे.—**रा. नि.** वात, कफ, मलबद्धत्व, तृषा, उत्क्लेश ( मळमळ ), वांति, श्वास यांचें नाशक आहे.—**ध. नि.** रेचकारक; आणि कफवात, शूल, आंव, कृमि यांचें नाशक आहे.—**के. नि.** हृद्रोगनाशक आहे.—**म. नि.**

६७६ **मधुजंबीर.** ( साखरनिंबू. )—मधुर, थंड, तृप्तिकर, वृष्य, पुष्टिकर; आणि कफपित्त, शोष, श्रम यांचें नाशक आहे.—**रा. नि.** विष, सर्पविष, कफ, उत्क्लेश ( मळमळ ), तृषा, रक्तदोष, अरुचि, वांति यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

६७७ **कपित्थ.** ( कवठ. )—मधुर, आंबट, तुरट, कडू, शीतळ, वृष्य, ग्राही; आणि पित्त, वात, व्रण यांचें नाशक आहे. अपक्व—आंबट, उष्ण, ग्राही, वातूळ आणि कफनाशक आहे. पक्व—मधुर, आंबट, जड आणि त्रिदोषनाशक आहे. तसेंच अपक्व—उचकीला करणारें, जडत्वकारक, वातुळ, ग्राही, त्रिदोषकारक; आणि कंठरोग, विष यांचें नाशक आहे.—**ध. नि.** पक्व—जड, ग्राही; आणि श्वास, वांति, उचकी, क्लम, श्रम यांचें नाशक आहे.—**रा नि.** रक्तक्षयकारक आहे.—**द्र. र.** जिरण्यास कठीण, कंठशोधक; आणि तृषानाशक आहे.—**भा. प्र.**

६७८ **तुंबरु.** ( तिरफळ. )—मधुर, कडू, तिखट, उष्ण, अग्निदीपक; आणि कफवात, शूल, गुल्म, उदर, पोटफुगी, कृमि यांचें नाशक आहे.— **रा. नि.** व्रण, प्रमेह यांचें नाशक आहे.—**म. नि.** अपतंत्रवायुनाशक आहे.—**ध. नि.** कफ, कुष्ठ, ज्वर, मूळव्याध, मलबद्धत्व, व्रण, सूज, कर्णकीट, मस्तकशूल, श्वास, प्लीहा यांचें नाशक आहे.—**द्र. र.** ओष्ठरोग, मूत्रकृच्छ्र यांचें नाशक आहे.—**भा. प्र.** संस्कृतांत यास तुंबरु, प्राकृतांत चिरफळ ( तिरफळ ) आणि कोंकणांत तिरफळी असें ह्मणतात.

६७९ **रुद्राक्ष**. ( रुद्राक्ष. )—आंबट, उष्ण, रुचिकर; आणि वात, कफ, मस्तकशूळ, भूतबाधा यांचा नाशक आहे.—**रा. नि.** सन्निपात-नाशक आहे.— **द्र. र.**

६८० **बिल्व**. ( बेल. ) बेलाचें मूळ—मधुर; आणि त्रिदोष, वात, यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मूत्रकृच्छ्र, शूल यांचें नाशक आहे.—**के. नि.** लघु आणि वांतिनाशक आहे.—**ध. नि.** बेलाचीं पानें—ग्राही; आणि वातकफ, वात, यांचीं नाशक आहेत. बेलाचा वृक्ष— मधुर, हृद्य, तुरट, जड, रुचिकर, अग्निदीपक; आणि पित्त, कफ, ज्वर अति-सार यांचा नाशक आहे. याचें कोंवळें फळ— चिक्कण, जड, ग्राही आणि अग्निदीपक आहे.—**रा. नि.** पित्तकर; आणि शूळ, वात, कफ, आंव यांचें नाशक आहे.—**के. नि.** पक्क फळ—मधुर, जड, तिखट, कडू, तुरट, उष्ण, ग्राही आणि त्रिदोषनाशक आहे.—**रा. नि.** दाहकारक आणि मलावष्टंभक आहे.—**ध. नि.**

६८१ **सल्लकी**. ( साळई. )—कडू, मधुर, तुरट, ग्राही; आणि कुष्ठ, रक्तदोष, कफ, वात, मूळव्याध, व्रण यांची नाशक आहे.—**रा. नि.** पक्कातिसारनाशक आहे.—**म. नि.**

६८२ **कतक**. ( निर्मळी. )—तिखट, कडू, उष्ण, चक्षुष्य, रुचिकर; आणि कृमि, शूल यांची नाशक आहे. इचें फळ— पाणी स्वच्छ कर-णारें आहे.—**रा. नि.** वातुळ; आणि प्रमेह, कफ, पित्त यांचें नाशक आहे.—**के. नि.** पित्तकर, आणि मूत्रशर्करा, मूतखडा, मूत्रकृच्छ्र यांचें नाशक आहे.—**ध. नि.** निर्मळ, थंड, विकाशी ( पसरणारें, ) लघु, मधुर, कफकर, वातुळ, तृष्णाकर, दाहकर; आणि विष, गुल्म यांचें नाशक आहे.—**के. नि.** कोंवळें फळ—वातुळ; आणि रक्तपित्त, तृषा, मोह, विष यांचें नाशक आहे.

६८३ **कर्कट**. ( काकड. )—रुचिकर, तुरट, अग्निदीपक, ग्राही, चक्षुष्य, लघु, शीतळ आणि कफपित्तहारक आहे.—**रा. नि.**

६८४ **श्लेष्मातक.** (भोंकर, शेलवट. )-थंड, तुरट तिखट, मधुर, पाचक, कफकर; आणि कृमि, शूल, आंव, रक्तदोष, व्रण, मलावरोध, फोड यांची नाशक आहे.—**द्र. र.** तुरट, उष्ण; आणि विष, फोड, विसर्प, कुष्ठ, यांची नाशक आहे.—**द्र. र.** इचीं फळें-वृष्य; आणि वात, पित्त, क्षय यांचीं नाशक आहेत.

६८५ **लघुश्लेष्मातक.** ( गोंधणी. )-मधुर, वातकारक, सुवर्णमारक, शीतळ आणि कृमिनाशक आहे. **रा. नि.** पक्व फळें—मलावष्टंभक, कफकर, जड, रूक्ष, धातुवर्धक, केशांना हितावह, कडू, मधुर, तुरट, तिखट; आणि वात, पित्त, रक्तदोष, विष, फोड, व्रण, कफ, रक्तपित्त, विसर्प यांचीं नाशक आहेत.—**के. नि.** केशहारक आहेत.—**द्र. र.**

६८६ **मुष्कक.** ( मोरवा. )—तिखट, आंबट, रुचिकर; आणि पाचक आहे.-**रा. नि.** ग्राही; आणि प्लीहा, गुल्म, उदर, वात, कफ यांचा नाशक आहे. पांढरा व काळा असे दोन प्रकारचे मोरवे असून हे गुणांनीं सारखे आहेत.-**ध. नि.** याचा नार—अति वृष्य; आणि शोष, पित्त, वात यांचा नाशक आहे.-**म. नि.** दुग्धशोधक, वीर्याला हरण करणारा; आणि नेत्ररोग, वात यांचा नाशक आहे.—**द्र. र.** तिखट; आणि विष, कृमि, बस्तिरोग यांचा नाशक आहे. याचीं फुलें-कफपित्तनाशक आहेत.—**के. नि.**

६८७ **करमर्द.** ( करवंद. ) कोंवळें-कडू, आंबट, अग्निदीपक, दाहकारक आहे. पिकलेलें-त्रिदोषशामक; आणि अरुचि, विष यांचें नाशक आहे.—**म. नि.** तृषा, पित्त यांचें नाशक आहे.—**ध. नि.** रुचिकर, जड, उष्ण आहे.-**म. नि.** कफकारक आणि रक्तपित्तकारक आहे.-**ध. नि.** पिकलेलें-मधुर आणि रक्तपित्तनाशक आहे.-**ध. नि.** सारक; आणि तृषा, वात, कफ यांचें नाशक आहे.—**के. नि.** पित्तवातनाशक आहे.-**म. नि.**

६८८. **तेजः फल.** ( तेजफल. )—तिखट, तीक्ष्ण, सुगंधी, अग्निदीपक, बालरक्षाकारक; आणि वात, कफ, अरुचि यांचें नाशक आहे.— **रा. नि.**

६८९ **विकंटक.** (हाशी.)—तुरट, तिखट, रूक्ष, रुचिकर, अग्निदीपक, वस्त्राला रंगविणारा आणि कफनाशक आहे.—**रा. नि.**

६९० **हरीतकी.** ( हिरडा. )— पांच रसांनीं युक्त, रेचकारक, योगवाहक, रसायनी; आणि कोष्ठगतरोग, त्वग्रोग, नेत्ररोग यांचा नाशक आहे.— **रा. नि.** हृद्रोग, कास, गलग्रह, त्रिदोष, हनुस्तंभ, सूज, उदर, वांति, कुष्ठ यांचा नाशक आहे.— **म. नि.** मूत्रकृच्छ्र, मूतखडा, मूत्राघात यांचा नाशक आहे.— **भा. प्र.** पाककाळीं मधुर, सारक, उष्ण, रूक्ष, लघु, धातुवर्धक, अग्निदीपक, पाचक, स्मृतिदायक, बलकर, बुद्धिदायक, आणि गुल्म, स्वरभंग, जीर्णज्वर, विषमज्वर, पांडुरोग, कावीळ, प्रमेह, मोह, मस्तकरोग, संग्रहणी, शोष, सूज, अतिसार, श्वास, कास, कृमि, प्लीहा, मलमूत्रबद्धत्व, मलावष्टंभ, उदर, ऊरुस्तंभ ( मांड्यांचा स्तंभ होणें ), अरुचि, उचकी, व्रण, शूल, त्रिदोष यांचा नाशक आहे.— **के. नि. हिरड्याचे भेद.**— पोटफुगी हिरडा हा अमृतापासून उत्पन्न झाला असून यांत सात जाति आहेत. त्या येणेंप्रमाणें:—विजया, रोहिणी, पूतना, अमृता, अभया, जीवंती आणि चेतनी. विजया ही तुंबडीसारखी असते. रोहिणी गोल असते. पातळ त्वचेची पूतना असते. अमृता ही जाड मांसाची असते. अभया ही पांच धारेची असते. जीवंती सुवर्णाच्या वर्णाप्रमाणें असते आणि चेतकीला तीन धारा असतात. विजया ही विंध्याद्रीपर्वतावर होते. चेतकी व पूतना या हिमालयावर होतात. सिंधदेशांत रोहिणी होते. विजया ही सर्वत्र होते. चंपापुरीचे नजीक अमृता व अभया होतात; आणि काठेवाडांत जीवंती होते. सर्व प्रयोगांत विजया प्रशस्त आहे. रोहिणी क्षतोपयोगी आहे. पूतना ही लेहादिकांत घालावी. विरेचनांत अमृता श्रेष्ठ आहे.

जीवंती ही जीर्णरोगांत योजावी. चेतकी सर्व रोगहारक आहे. अभया ही नेत्ररोगहारक आहे. याप्रमाणें गुण पाहून हरीतकीची औषधांत योजना करावी. चेतकी ही हातांत धरली असतांही रेच होतात असा तिच्यांत प्रभाव आहे. या सांतही जातींत विजया श्रेष्ठ आहे; कारण, ही सुलभ मिळत असून सर्व प्रयोगांत घालण्यास श्रेष्ठ आहे. जी हरीतकी पाण्यांत टाकली असतां बुडते ती श्रेष्ठ जाणावी. तसेंच तिच्यांत स्थलभेदानेंही अनेक गुण उत्पन्न होतात. सर्व व्याधींचें हरण करिते ह्मणून हीस हरीतकी असें नांव प्राप्त झालें आहे. हरीतकी ही तृषारोग, हनुस्तंभ, गलग्रह, शोष, नवज्वर, जीर्णज्वर या रोगांत आणि गरोदर स्त्रियेस देण्यास वर्ज्य करावी.- **रा. नि.**

६९१ **बिभीतक.** ( बेहडा. )—तिखट, कडू, तुरट, उष्ण, चक्षुष्य, पाककाळीं मधुर, लघु; आणि कफ, पलितरोग ( केश पिकणें) यांचा नाशक आहे.—**रा. नि.** थंड; आणि हृद्रोगनाशक आहे—**द्र. र.** उष्णवीर्य, मलभेदक; आणि कफपित्तनाशक आहे. – **म. नि.** सारक, रूक्ष आणि कृमिनाशक आहे – **ध. नि.** केशांना हितकर रुचिकर, आणि कांतिकारक आहे.– **के. नि.** याची मज्जा—मदकारक आणि कफवातनाशक आहे.— **के. नि.** तृषा, वांति, कफ, वात यांची नाशक आहे.—**भा. प्र.** उचकीची नाशक आहे. – **ग. नि.**

६९२ **पूग.** ( सुपारी. ) इचा नार—थंड, मोहकारक, जड, पाककाळीं उष्ण, खारट, आंबट, पित्तकर आणि वातनाशक आहे. खेरी सुपारी—मधुर, रुचिकर, तुरट, आंबट, तिखट, पथ्य, सारक; आणि कफवात, मुखरोग यांची नाशक आहे. नैल्वत —मधुर, रुचिकर, कंठशुद्धिकर, लघु, अग्निदीपक, पाचक, रसाळ आणि त्रिदोषशामक आहे. गुहागरी—जिक्कण, तुरट, तिखट, पाचक द्रावक, लघु; आणि मलबद्धत्व, उदर, पोटफुगी यांची नाशक आहे. घोटी सुपारी--तिखट, तुरट, उष्ण, कठीण, रुचिकारक, अग्निदीपक; आणि मलावष्टंभ, पित्त

यांची नाशक आहे. चौल सुपारी — सुगंधी, अग्निदीपक, पाचक, बलकर, पुष्टिकर, रसाळ आणि कफनाशक आहे. बल्गुल सुपारी— रुचिकर, पाचक, अग्निदीपक; आणि त्रिदोष, आंव, मलावष्टंभ, मुखरोग यांची नाशक आहे. चंद्रापुरी सुपारी—मलशोधक, तिखट, मधुर, तुरट, रुचिकर, अग्निदीपक, पाचक आणि कफनाशक आहे. आंध्र ( तैलंगण ) देशांतील सुपारी—तुरट, मधुर, किंचित् आंबट; आणि वात, मुखजाड्य, कफ यांची नाशक आहे. सुपारीचे विशेष गुण–मोहकारक, तुरट, मधुर, रेचकारक, रुचिकर; आणि त्रिदोष, मुखसंबंधीं ओलावा, मळ यांची नाशक आहे. अपक्क सुपारी—तुरट, कंठशोधक सारक; आणि मुखसंबंधीं मल, रक्त, आंव, कफ, पित्त, उदर, पोटफुगी यांची नाशक आहे. वाळलेली सुपारी—रुचिकारक, पाचक, रेचक आणि कंठरोगनाशक आहे. ही पानाबरोबर घेतली असतां पांडुरोग, वात, सूज यांची नाशक आहे.—**रा. नि.** मलभेदक आणि कफ, पित्त यांची नाशक आहे.– **ध. नि.** मधुर, जड, हृद्य आहे,–**के. नि.** पक्व सुपारी– वातुळ, चिक्कण, रक्तपित्तवर्धक; आणि कफवात, मुखदौर्गंध्य, कंडू, मेदोरोग, ओलावा यांची नाशक आहे.–**के. नि.** निर्मळ, कामवर्धक; आणि कफ, श्रम यांची नाशक आहे.–**म. नि.**

६९३ **नागवल्ली.** ( नागवेल. )—तिखट, तीक्ष्ण, कडू, रुचिकर, दाहकर, अग्निदीपक; आणि पीनस, वात, कफ, कास यांची नाशक आहे. शिरिवाडी पान—मधुर, तीक्ष्ण, रसाळ, सरस, रुचिकर, पाककाळीं थंड; आणि वात, पित्त, कफ, यांचें नाशक आहे. अंबाडें पान— तिखट, आंबट, कडू, तीक्ष्ण, उष्ण, मुखपाककारक, दाह, रक्तपित्त यांस कोपविणारें, मलावष्टंभक आणि वातनाशक आहे. सातसी पान— मधुर, तीक्ष्ण, तिखट, उष्ण, पाचक, रुचिकर, अग्निदीपक; आणि गुल्म, उदर, पोटफुगी यांचें नाशक आहे. गुहागर–अडगर-पान–यास सात शिरा असतात. हें अति रसभरित, अति रुचि-

कूर, सुगंधी, तीक्ष्ण, मधुर, अति दृढ, अग्निदीपक, पुंस्त्वकारक, बलकर, रेचक आणि मुखसौगंध्यदायक आहे. अगरापान, ( माळव्यांत प्रसिद्ध )-आंबट, सारक, तीक्ष्ण, मधुर, रुचिकर, थंड, अग्निदीपक, बलकर, मुखास सुगंध देणारें, स्त्रियांचें सौभाग्य वर्धक, मदकारक, राजास सर्वदां प्रिय; आणि दाह, पित्त, गुल्म, पोटफुगी, मलबद्धत्व, यांचें नाशक आहे. पोटकुली पान ( तैलंगणांत प्रसिद्ध )- तुरट, उष्ण तिखट, कंठील मलाला बाहेर काढणारें, पित्तकर; आणि वातनाशक आहे. घोरसमुद्र पान- तिखट, तीक्ष्ण, हृद्य, आंबट, रुचिकर, तिखट, अग्निदीपक, पाचक; आणि कफ, वात, यांचें नाशक आहे. नुकतेंच तोडलेलें पान.-- मुखरोगकारक, जडत्व देणारें, दोषकारक, दाहकारक, अरुचिदायक, रक्तदोषकारक, मलकारक, मलावष्टंभक; आणि वातिकारक आहे. अंगांत रस मुरलेलें असें पान---खाण्यास योग्य असून तें रुचिकर, कांतिदायक; आणि त्रिदोषनाशक आहे. काळें पान --- कडू, उष्ण, तुरट, दाहकारक, मुखजाड्यदायक आणि मलकारक आहे. पांढरें पान--- पथ्य, रुचिकर, अग्निदीपक, पाचक; आणि कफ, वात यांचें नाशक आहे. शिरा असलेलें पान – रक्तहारक, त्वग्रोगकारक व नित्य भक्षिलें असतां दुर्बलता देणारें आहे. पानाशिवाय सुपारी खाणारा दरिद्री होऊन त्यास मतिभ्रंश प्राप्त होतो व त्यास अंतकाळीं ईश्वराचें स्मरण होत नाहीं.

६९४ **चूर्ण**. ( चुना. )--अर्जुनवृक्षाचा चुना कफहारक आहे. रुईचा गुल्मनाशक आहे. कुड्याचा सूजनाशक आहे. करंजाचा रुचिकारक, आणि वातनाशक आहे. शंखाचा बलकर, अग्निदीपक आणि रुचिकारक आहे. दगडाचा पित्तकारक आहे. स्फटिकाचा दंतांला दृढता देणारा आहे आणि शिंपेचा रूक्ष आहे.

६९५ **तांबूललक्षण**--विड्यांत पानें जास्त झाल्यास तो अग्निदीपक आणि रंगदायक होतो. सुपारी जास्त झाली असतां तो रूक्ष आणि

मूत्रकृच्छ्रदायक होतो. क्वाथ जास्त झाला असतां शोषदायक होतो आणि चुना जास्त झाला असतां तो पित्तकर व मुखाला दुर्गंधदायक होतो.

## १० चंदनादिवर्ग.

६९६ **चंदन**–तिखट, कडू, शीतळ, वृष्य, कांतिदायक सुगंधी; आणि भ्रांति, पित्त, वांति, ज्वर, कृमि, तृषा, संताप, मुखरोग यांचा नाशक आहे. ज्या चंदनवृक्षास ढोल पडलेली आहे, ज्यास गांठी पुष्कळ आहेत, जो तोडला असतां लाल दिसतो, तसेंच घांसला असतां स्वच्छ व पीतवर्ण दिसतो, ज्याचा स्वाद कडू, तिखट, ज्यास सुगंध पुष्कळ, जो शीतळ, तो चंदन श्रेष्ठ जाणावा. याहून गुणांनीं कमी तो हलका आणि ज्यांत यांतील अर्धे गुण आहेत तो मध्यम जाणावा. चंदन दोन प्रकारचा आहे; बेट्ट आणि सुक्कड. जो ओला तोडतात तो बेट्ट आणि वृक्ष वाळल्यावर तोडतात तो सुक्कड. मलयाद्रिसमीप जे पर्वत आहेत त्यांस बेट्ट असें ह्मणतात. त्या पर्वतावर होणाऱ्या चंदनास बेट्टचंदन असें ह्मणतात. बेट्टचंदन—अति शीतळ; आणि दाह, पित्त, ज्वर, वांति, मोह, तृषा, कुष्ठ, तिमिर, रक्तदोष, कास यांचा नाशक आहे. सुक्कड चंदन.—कडू; मूत्रकृच्छ्र, रक्तपित्त, दाह यांचा नाशक आहे. ओला–शैत्य व सुगंध यांस देणारा आणि वाळलेला–लेपांत घालण्यास योग्य आहे.–**रा. नि.** अंतर्दाह, विष, रक्तपित्त, नेत्ररोग, व्रण यांचा नाशक आहे.–**ध. नि.** जड; आणि मळमळ, दाह, पित्त, कफ यांचा नाशक आहे.–**के. नि.** हृद्य, अल्हादकारक आहे.–**म. नि.**

६९७ **शबरचंदन**. ( किंचित् पीत चंदन. )— शीतळ, कडू; आणि कफ, वात, श्रम, पित्त, फोड, खरूज, तृषा, ताप, मोह यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

६९८ **पीतचंदन**. ( मलयागर पीतचंदन. ) – शीतळ, कडू, कांतिकारक; आणि कुष्ठ, कफ, वात, कंडू, खरूज, ओली खरूज, कृमि यांचा नाशक आहे.

६९९ **पत्रांग.** ( पतंग. )—तिखट, रूक्ष, आंबट, शीतळ, मदकारक; आणि वातपित्तज्वर, फोड, उन्माद, भूतबाधा यांचा नाशक आहे.—**रा. नि.** व्रणाला भरून आणणारा आहे.—**ध. नि.** पित्तकफनाशक आहे. —**के. नि.** मूत्राश्मरी (मूतखडा) नाशक आहे.—**द्र. र.**

७०० **रक्तचंदन.** ( रक्तचंदन. ) – अत्यंत शीतळ, कडू; आणि नेत्ररोग, भूतबाधा, कास, पित्त, कफ, कफपित्तज्वर, भ्रांति, कृमि, तृषा, वांति यांचा नाशक आहे. – **रा. नि.** रक्तपित्त, राक्षसपीडा, व पित्त यांचा नाशक आहे.—**ध. नि.** रक्तपित्त, व्रण, विष यांचा नाशक आहे.—**म. नि.** व्यंगनाशक आहे.—**द्र. र.**

७०१ **बर्बरक.** ( श्वेत रक्तचंदन. )—शीतळ, कडू; आणि कफ, वात, पित्त, कुष्ठ, कंडु, व्रण, रक्तदोष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** पांचाल व यवन या लोकांत बर्बरचंदन कनिष्ठ मानला आहे.—**गंधरत्ना.**

७०२ **हरिचंदन.** ( कुंकुमागरुचंदन. )—कडू, थंड, दिव्य, दुर्लभ आणि सूज, भ्रम, शोष, पित्त, मंदत्व; दाह यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

७०३ **चंदनसामान्यगुणाः.** ( चंदनाचे सामान्य गुण. )— सर्व जातींचे चंदन रसवीर्यादिकांत सारखे असून सुवासांत प्रथम सांगितलेले जास्त आहेत.

७०४ **देवदारु.** ( तेल्या देवदार. )—देवद्वार दोन प्रकारचा आहे. तेल्यादेवदार व काष्ठदेवदार. तेल्यादेवदार—कडू, चिक्कण; आणि कफ, वात, आंव, मलावष्टंभ, मूळव्याध, प्रमेह, ज्वर यांचा नाशक आहे.— **रा. नि.** उष्ण आणि कफवातनाशक आहे.— **ध. नि.** उचकी ज्वर, कंडु, पीनस यांचा नाशक आहे.—**के. नि.** तंद्रा, रक्तदोष कफ, श्वास, वात यांचा नाशक आहे.— **भा. प्र.**

७०५ **काष्ठदारु.** (काष्ठदेवदार )—कडू, उष्ण, रूक्ष; आणि कफ,वात, यांचा नाशक असून अंगास लाविला असतां भूतदोषनाशक आहे.-**रा. नि.**

उष्ण, चिक्कण; आणि आंव, मलस्तब्धत्व, प्रमेह, कफ यांचा नाशक आहे.—**ध. नि.**

७०६ **चीडा.** ( चिडादेवदार. ) —तिखट, उष्ण, अग्निदीपक; आणि खोकला, कफ यांचा नाशक असून अत्यंत सेवनानें पित्त व श्रम यांचा नाशक आहे.—**रा. नि.** रक्तपित्त, कफवात यांचा नाशक आहे.—**ध. नि.**

७०७ **सप्तपर्ण.** ( सातवीण. )—कडू, उष्ण, अग्निदीपक, मद्यगंधाची; आणि त्रिदोष, व्रण, रक्तदोष यांची नाशक आहे.—**रा. नि.** ज्वरनाशक आहे.—**ग. नि.** सारक; आणि शूल, गुल्म, कुष्ठ यांची नाशक आहे.—**ध. नि.** हृद्य, चिक्कण आणि श्वासनाशक आहे.—**के. नि.** कफवातनाशक आहे.—**म. नि.**

७०८ **सरल.**—(सरळ देवद्वार.)—तिखट, कडू, उष्ण, कोष्ठशुद्धिकर; आणि कफ, वात, त्वरोग, सूज, कंडू, व्रण यांचा नाशक आहे.—**रा. नि.** उवा आणि घाम यांचा नाशक आहे.—**भा. प्र.** मुखस्राव, स्वरभंग, नेत्ररोग, व्रण यांचा नाशक आहे.—**ध. नि.** रसकाळीं व पाककाळीं मधुर, तिखट, चिक्कण; आणि कास कंठरोग यांचा नाशक आहे.—**के. नि.**

७०९ **कुंकुम.** ( केशर. )—तिखट, उष्ण, कडू, सुगंधी, रुचिकर, कांतिकारक; आणि कास, वात, कफ, कंठरोग, मस्तकशूल, विष यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मस्तकरोगनाशक आहे.—**ध. नि.** त्रिदोष, उचकी, कृमि यांचें नाशक आहे.—**के. नि.** उष्ण आणि व्यंग ( वांग ) नाशक आहे.—**म. नि.**

७१० **तृणकुंकुम.** ( तृणकेशर. )—तिखट, उष्ण, तेजस्वी; आणि कफ, वात, सूज, कंडु, खरूज, कुष्ठ, आंव यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

७११ **प्रियंगु.** ( गहुला. )—शीतळ, कडू; आणि दाह, रक्तपित्त, वांति, भ्रांति, ज्वर, मुखजाड्य यांचा नाशक आहे.—**रा. नि.** याचे

फळ—कफपित्तनाशक आहे.—**भा. प्र.** केश्य, वृष्य; आणि रक्तदोष, संग्रहणी यांचें नाशक आहे. —**ग. नि.** प्रमेह, दाह यांचा नाशक आहे.—**ध. नि.** दुर्गंधी, घाम, गुल्म, तृषा, विष, रक्तदोष यांचा नाशक आहे. याचें फळ—बलकर; आणि मलबद्धत्व, पोटफुगी यांचें नाशक आहे. —**के. नि.**

७१२ **कस्तूरी.** ( कस्तूरी. )— कपिला, पिंगला आणि कृष्णा अशी तीन प्रकारची कस्तूरी आहे. ही नेपाळ, काश्मीर व कामरूप ( असाम ) या देशांत उत्पन्न होते. खरिका, तिलका, कुलित्था, पिंडा आणि नायिका असे इच्यांत पांच भेद आहेत. जी मृगाच्या नाभींतून जमिनीवर स्रवलेली, प्रतिपदेपासून तीन दिवसांत जी उत्पन्न झाली ती कस्तूरी उत्तम जाणावी. खरिका ही चूर्णासारखी असते, तिळाप्रमाणें तिलका असते, कुलित्थका ही कुळित्थासारखी असते, जी किंचित् स्थूल असते ती पिंडिका आणि पिंडिकेहून किंचित् अधिक स्थूल असते ती नायिका जाणावी. कस्तूरीलक्षण—स्वादास कडू, केवड्याप्रमाणें जीस सुगंध येतो, तोलण्यांत जी हलकी असते, पाण्यांत टाकली असतां जिचा रंग बदलत नाहीं ती कस्तूरी राजास उपभोग घेण्यास योग्य आहे. तसेंच —जिला केवड्याप्रमाणें सुगंध असून हस्तीच्या मदाप्रमाणें वास येतो, जी रुचीस कडू, तिखट, जी तोलण्यांत हलकी, जी मर्दन केली असतां चिक्कण होते, जी अग्नींत टाकली असतां जळत नाहीं व शिमिशिमि असा शब्द होतो व जळतांना चर्माप्रमाणें जिला वास येतो ती कस्तूरी उत्तम असून राजास उपभोग घेण्यास योग्य आहे. जो हरिण बाल व वृद्ध आहे, क्षीण व रोगी आहे, हस्तीच्या मदाप्रमाणें ज्यास वास येतो, जो कामातुर व तरुण अशा हरिणाची कस्तूरी अतिशय सुगंधी असते. कृत्रिमकस्तूरीलक्षण—जी चिक्कण असून जिला धुराप्रमाणें वास येतो, जी पाण्यांत टाकली असतां विरून जाते, जी अग्नींत टाकली असतां भस्म होते,

जी तोलण्यांत जड भरते, जिचें मर्दन केलें असतां रूक्ष होते ती कृत्रिम कस्तूरी आहे असें जाणावें. तिचें सेवन करूं नये. कस्तूरी-प्रशंसा– शुद्ध असो, मलिन असो, जी कोठेंही उत्पन्न झाली असो तिच्यांत सुगंध असला ह्मणजे ती पूज्य होते. ही कामोद्दीपन होण्यासाठीं कपाळ, गाल, गळा, बाहूचें मूळ, कुचमंडल याठिकाणीं स्त्रियांनीं लावावी. कस्तूरी—सुगंधी, कडू, चक्षुष्य; आणि मुखरोग, किलासकुष्ठ, कफ, दौर्गंध्य, वात, अलक्ष्मी, मल यांची नाशक आहे.–**रा. नि.** दोषशामक, हृद्य, बस्तिशोधक, उष्ण; आणि विष, कफ, वांति, सूज, वात यांची नाशक आहे.–**ध. नि., म. नि.** वृष्य आणि मुखशोषहारक आहे.–**ग. नि.** जी कस्तूरी कामरूप देशांत होते ती श्रेष्ठ, नेपाळांत होते ती मध्यम आणि काश्मीरांत होणारी कनिष्ठ आहे. कामरूप देशांत होणारी कस्तूरी काळ्या रंगाची असते. नेपाळांत होणारी नीलवर्ण आणि काश्मीरांत होणारी पिंगटवर्ण असते.

७१३ **गोरोचना**. ( गोरोचन. )—शीतळ, रुचिकर, पाचक, वश्यकारक, शृंगारवर्धक, मंगल, जनमोहक; आणि कृमि, विष कुष्ठ, भूतबाधा यांचें नाशक आहे.—**रा. नि.** नेत्ररोगहारक आहे.— **ध. नि.** सौभाग्यकारक आणि वृष्य आहे.—**द्र. र.** उन्माद, गर्भस्राव, क्षत, रक्तदोष यांचा नाशक आहे. – **के. नि.**

७१४ **कर्पूर**. ( कापूर. ) लक्षणें— शिर, मध्य आणि तल असा तीन प्रकारचा कापूर आहे. झाडाच्या स्तंभाच्या अग्रभागीं होणारा तो शिर, पानाचे ठायीं होणारा तो मध्य आणि तळीं होणारा तो तल. शिरोभागीं होणारा विशेष तेजस्वी व स्वच्छ असतो. मध्यभागीं होणारा मध्यम व स्वच्छ आणि तळीं होणारा सामान्य व स्वच्छ असतो. स्तंभाच्या गर्भांत होणारा कापूर श्रेष्ठ आणि स्तंभाच्या बाहेर होणारा मध्यम जाणावा. स्वच्छ, किंचित् हळदीच्या वर्णाचा तोही मध्यम जाणावा. सुवर्णाच्या भांड्याप्रमाणें स्वच्छ, हलका, निर्मळ, स्वादास कडू,

शीतळ, हृदयास हितकर, ज्यास सुगंध पुष्कळ येतो, निःस्नेह, जाड पत्र्यांचा असा कापूर श्रेष्ठ असून तो राजास योग्य आहे. कापूर हा व्रणाचा दाह शमन करण्यास योग्य आहे. कापूर—थंड, कडू, चिक्कण, उष्ण, रक्ताचा दाह करणारा आणि फार दिवसांचा दाह यांचा नाशक आहे. हा धुतला असतां शुभकारक जाणावा.—**रा. नि.** चक्षुष्य, मदकारक; आणि तृषा, मेदोरोग, विष यांचा नाशक आहे.—**ध. नि.** प्रमेह आणि विषदोष यांचा नाशक आहे.—**द्र. र.** कफ, शोष, मुखविरसता यांचा नाशक आहे.—**के. नि.**

७१५ **चीनकर्पूर.** ( चिनीकापूर.)—तिखट, कडू, उष्ण, किंचित् शीतळ, पवित्र, पाचक; आणि कफ, कंठदोष, कृमि यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

७१६ **जवादि.** (जवादी कस्तूरी. ) — सुगंधी, चिक्कण, उष्ण, सुखकर, वातास हितकर आणि राजास मनोह्लादक आहे. जवादी-लक्षण—नीलवर्ण, चिक्कण, किंचित् पिंवळी, सुगंधी, उन्हांत ठेविली असतां अतिशय सुगंध चालतो ती राजास योग्य आहे.—**रा. नि.** वृष्य आहे.—**द्र. र.** कंडुनाशक आहे.—**भा. प्र.** चक्षुष्य, वमनकारक आणि कफवातनाशक आहे.—**के. नि.**

७१७ **नंदिवृक्ष.** (नंदीवृष्य, तूणी.)--- तिखट, कडू, सुगंधी, पुष्टि-कर, वीर्यदायक; आणि रक्तदोष, दाह, मस्तकव्यथा, श्वेतकुष्ठ यांचा नाशक आहे.--**रा. नि.**

७१८ **जातिपत्री.** ( जायपत्री. )---तिखट, कडू, सुगंधी, मुखाला स्वच्छ करणारी; आणि कफ, जडत्व यांची नाशक आहे.---**रा. नि.** ग्राही आणि वातनाशक आहे.— **द्र. र.** कांतिकर, शांतिदायक आणि विषनाशक आहे.—**ध. नि.** लघु, उष्ण, रुचिकर; आणि कफ, कास, वांति, तृषा, कृमि यांची नाशक आहे.—**के. नि.**

७१९ **जातिफल.** ( जायफळ. ) —तुरट, उष्ण, तिखट, लघु,

वृष्य, अग्निदीपक; आणि कंठरोग, वात, अतिसार, प्रेमह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** ग्राही आणि पीनसनाशक आहे.—**म. नि.** कडू, रुचिकर, हृद्य, स्वरकारक; आणि कफ, वात, मुखदौर्गंध्य, वांग, कृमि, कास, वांति, श्वास, शोष, पीनस, हृद्रोग यांचें नाशक आहे.—**के. नि.**

७२० **कंकोल.** (कंकोळ.)—तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, पाचक, रुचिकर; आणि मुखजाड्य, कफ, वात यांचें नाशक आहे.—**रा. नि.** हृद्य आणि कफनाशक आहे.—**ध. नि.** अग्निमांद्य आणि वांति यांचा नाशक आहे.—**के. नि.** पोटफुगीचा नाशक आहे.—**भा. प्र.**

७२१ **लवंग.** ( लवंग. )—शीतळ, कडू, चक्षुष्य, रुचिकर, तीक्ष्ण; आणि वात, पित्त, कफ, शिरोरोग यांची नाशक आहे. तसेंच उष्ण, तीक्ष्ण, पाककाळीं मधुर, थंड; आणि वात, पित्त, कफ, आंव, क्षय, कास, रक्तदोष यांची नाशक आहे.—**रा. नि.** हृद्य, वृष्य, पवित्र आणि विषनाशक आहे.—**ध. नि.** पाचक; आणि उचकी, वांति यांची नाशक आहे.— **द्र. र.** शूल, मलबद्धत्व, क्षतक्षय, तृषा, श्वास, पीनस, पोटफुगी यांची नाशक आहे.—**के. नि.**

७२२ **अगरु.** ( अगर. )— उष्ण, तिखट, चिक्कण, कडू, पवित्र; आणि वात, कफ, कर्णरोग, नेत्ररोग, कुष्ठ यांचें नाशक आहे.—**रा. नि.**, **ध. नि.**

७२३. **स्वादु.** ( स्वादुगरु. )—तिखट, तुरट, उष्ण, धूपाच्या सुगंधानें वातनाशक आहे.

७२४ **कृष्णागरु.** ( कृष्णागर. )—तिखट, उष्ण, कडू, लेपानें शीतळ, उगाळून प्याल्यानें पित्तहारक आणि किंचित् त्रिदोषनाशक आहे.—**रा. नि.** चिक्कण; आणि वात, कफ, नेत्ररोग, कुष्ठ यांचें नाशक आहे.—**ध. नि.** त्वग्रोग, कफ, शीतवात यांचें नाशक आहे.—**के. नि.**

७२५ **काष्ठागरु.** ( काष्ठागर. ) — तिखट, उष्ण, लेपानें रूक्ष;

आणि कफ, वात, वांति, मुखरोग यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

७२६ **दाहागरु.** ( दाहागर. )— तिखट, उष्ण, कांतिकर, केशवर्धक, सुगंधी, केशांतील दोषांचें नाशक आहे.—**रा. नि.**

७२७ **मंगल्यागरु.** ( मगल्यागर. )— जड, थंड, सुगंधी आणि योगवाही आहे.

७२८ **मांसी.** (जटामांसी.)—सुगंधी, तुरट, तिखट, शीतळ, आनंदकारक, कांतिकर; आणि कफ, भूतबाधा, दाह, पित्त यांची नाशक आहे.— **रा. नि.** अंतर्धातुहारक आहे.—**ग. नि.** केशांना हितकर आहे.—**ध. नि.** विष, त्वग्रोग यांची नाशक आहे.— **द्र. र.** त्रिदोष, कुष्ठ, रक्तदोष, विसर्प यांची नाशक आहे.— **म. नि.**

७२९ **गंधमांसी.** ( गंधमांसी. ) कडू, शीतळ, कांतिकर; आणि कफ, कंठरोग, रक्तपित्त, विष, भूतज्वर यांची नाशक आहे.—**रा. नि.**

७३० **आकाशमांसी.** ( आकाशजटामांसी. )— थंड, कांतिकर; आणि सूज, व्रण, नाडीव्रण, लूता, गर्दभजाल ( क्षुद्ररोग ) इत्यादिकांची नाशक आहे.—**रा. नि.**

७३१ **तुरुष्क.** ( शिलारस, पिंडतैल. ) – सुगंधी, कडू, तिखट, चिक्कण; आणि कुष्ठ, कफ, पित्त, मूतखडा, मूत्राघात, भूतज्वर यांचा नाशक आहे.– **रा. नि.** कांतिकारक, तिखट, उष्ण, वीर्यवर्धक आहे.—**म. नि.** वृष्य; आणि घामाचा नाशक आहे.— **भा. प्र.** ज्वर, दाह, ग्रह, वात, प्रमेहपीटिका, ओलावा, कफ, पित्त यांचा नाशक आहे.—**ग. नि.**

७३२ **गुग्गुलु.** ( गुग्गुळ. )—तिखट, कडू, उष्ण, रसायन; आणि कफ, वात, कास, कृमि, वातोदर, प्लीहा (पाणथरी), सूज, मूळव्याध यांचा नाशक आहे. —**रा. नि.** तुरट, बुळबुळित, कांतिकर, स्वरकारक, रूक्ष, सूक्ष्म, चिक्कण, सारक, लघु, निर्मळ, तीक्ष्ण; आणि बस्तिरोग, मेदोरोग, व्रण, भूतबाधा, प्रमेह, सूज यांचा आहे. हा नवा—धातु-

वर्धक आणि वीर्यवर्धक आहे. जुना– अति लेखन ( दोषाला पातळ करणारा ) आहे.—**ध. नि.** अग्निदीपक, बलकर, मोडलेले हाडास सांधणारा; आणि ग्रंथिरोग, गलगंड, अपची, वातरक्त, आंव, कंडु, कृमि, कुष्ठ, विष यांचा नाशक आहे–**के. नि.** गंडमाला आणि आमवात यांचा नाशक आहे.—**भा. प्र.** मांसवृद्धिकर आणि राक्षसपीडानाशक आहे.—**ग. नि.**

७३३ **कणगुग्गुलु.** ( कणगुग्गुळ. )—तिखट, उष्ण, सुगंधी, रसायन; आणि वात, शूल, कफ, गुल्म, उदर, पोटफुगी यांचा नाशक आहे.

७३४ **भूमिजगुग्गुलु.** ( भूमिगुग्गुळ. )—कडू, तिखट, उष्ण, देवीला प्रिय, पवित्र, सुगंधदायक; आणि कफ, वात, भूतबाधा यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

७३५ **राल.** ( राळ. )—थंड, चिक्कण, तुरट, कडू, ग्राही; आणि वात, पित्त, फोड, व्रण, कंडु यांची नाशक आहे.—**रा. नि.** भग्नसंधानकारक, मधुर, उष्ण, मलस्तंभक, व्रणरोपण करणारी; आणि विष, भूतबाधा यांची नाशक आहे.–**ध. नि.** अतिसार, शूल, घाम, ज्वर, यांची नाशक आहे.—**भा. प्र.** रक्तदोष, विसर्प, गृहबाधा यांची नाशक आहे.—**के. नि.** कफ, पित्त, अग्निदग्धव्रण यांची नाशक आहे.–**ग. नि**

७३६ **कुंदरु.** ( सालईचा डीक. ) – मधुर, कडू, पान व लेप यांणीं थंड; आणि कफ, पित्त, दाह, प्रदर यांचा नाशक आहे.—**रा. नि.** तिखट आहे.—**ध. नि.** वात, कफ, रक्तप्रदर यांचा नाशक आहे. – **द्र. र.** मुखरोगनाशक आहे. – **भा. प्र.** ज्वर, घाम यांचा नाशक आहे.—**के. नि.** उवा, अलक्ष्मी, ग्रह आणि वळ यांचा नाशक आहे. **म. नि.** साखरेशीं घेतला असतां प्रमेह आणि अंडवृद्धि यांचा नाशक आहे.—**शोढलनि.**

७३७ **कुष्ठ**. ( कोष्ठ. ) –तिखट, उष्ण, कडू, कांतिकर; आणि कफ, वात, कुष्ठ, विसर्प, विष, कंडु, खरूज, दाद यांचें नाशक आहे.– **रा. नि.** त्रिदोष; आणि रक्तदोष यांचें नाशक आहे. — **ध. नि.** रसायन आणि वृष्य आहे.—**ग. नि** वातरक्त आणि कास यांचें नाशक आहे.—**के. नि.** वांति आणि तृषा यांचें नाशक आहे.–**द्र. र.** वीर्यवृद्धिकारक आहे.— **म. नि.**

७३८ **सारिवा**. (श्वेत उपलसरी.), **कृष्णसारिवा**. (काळी उपलसरी.)–मधुर; आणि कफ, वातरक्त, कुष्ठ, कंडु, ज्वर, प्रमेह, दुर्गंधि यांची नाशक आहे.–**रा. नि.** वृष्य; आणि पित्त, आंव, ज्वर यांची नाशक आहे.– **द्र. र.** कफ, रक्तदोष, विष, तृषा, दाह यांची नाशक आहे.– **ग. नि.** कास, अतिसार, त्रिदोष यांची नाशक आहे.–**के. नि.** जड, वीर्यवर्धक, चिक्कण, रक्तदायक; आणि विष, आमातिसार, अग्निमांद्य, अरुचि, श्वास, वांति, कास, तृषा, त्रिदोष, रक्तप्रदर, ज्वरातिसार यांची नाशक आहे.–**म. नि.** रक्तदोष, रक्तपित्त, विषमज्वर, शिरोरोग यांची नाशक आहे.—**शोढलनि.** काळी उपलसरी— ग्राही, थंड; आणि कफ, पित्त, तृषा, अरुचि, रक्तपित्त यांची नाशक आहे.—**रा. नि.**

७३९ **नख**. ( नखला. ) उष्ण, तिखट, आणि विष, कुष्ठ, कंडु, व्रण, भूतबाधा यांचा नाशक आहे.—**रा. नि.** कफनाशक आहे.— **ध. नि.** बलकर, वीर्यकर, लघु, हृद्य; आणि वातरक्त, ज्वर यांचा नाशक आहे—**म. नि.** पवित्र; आणि वातपित्त, वांति यांचा नाशक आहे.– **द्र. र.** कांतिकारक; आणि अलक्ष्मी, मुखदुर्गंधि यांचा नाशक आहे.—**भा. प्र.**

७४० **व्याघ्रनख**. ( वाघनख. )—कडू, उष्ण, तुरट, कांतिकर, सुगंधी; आणि कफ, वात, कंडु, कुष्ठ, व्रण, यांचें नाशक आहे.— **रा. नि.** पवित्र आणि ग्रहभूतबाधानाशक आहे.—**ध. नि.**

७४१ स्पृक्का (कपुरीमधुरी.)—तिखट, तुरट, कडू, सुगंधी; आणि कफ, कास, प्रमेह, मूतखडा, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे.—रा. नि. सुगंधी, शीतळ; आणि कुष्ठ, दुर्गंधी, घाम, तृषा, विष, दाह यांची नाशक आहे.—ध. नि. वृष्य, मधुर; आणि ग्रह, कंडू, ज्वर, त्रिदोष, यांची नाशक आहे.—के. नि.

७४२ स्थौणेयक.( थुणेर. )—सुगंधी, तिखट, कडू; आणि कफ-पित्त, पित्तप्रकोप यांचें नाशक आहे.—रा. नि. बलपुष्टिदायक, कडू, थंड, चिक्कण, मधुर; आणि त्रिदोषनाशक आहे.—के. नि. स्मृतिदायक, वीर्यकर; आणि राक्षसपीडा, ग्रह, ज्वर, कृमि, रक्तदोष, कुष्ठ, तृषा, दुर्गंधि, तिलकालक ( क्षुद्ररोग ) यांचें नाशक आहे.—भा. प्र.

७४३ मुरा. ( मोरमांसी. )—कडू, तिखट, शीतळ, तुरट; आणि कफपित्त, श्वास, रक्तदोष, विष, दाह, भ्रम, मूर्च्छा, तृषा यांची नाशक आहे.—रा. नि. थंड, मधुर; आणि पित्त, वात, ज्वर, भूतराक्षसबाधा, कुष्ठ, कास याची नाशक आहे.—के. नि.

७४४ शैलेय. ( दगडफूल. )—थंड, कडू, सुगंधी; आणि कफ, पित्त, दाह, तृषा, वांति श्वास, व्रणरोग यांचें नाशक आहे.—रा. नि. रुचिकर; आणि रक्तदोष, विष, कंडू, कफज्वर, हृद्रोग, मूतखडा यांचें नाशक आहे.—ध. नि. कुष्ठनाशक आहे.—के. नि. रक्तगुल्मनाशक आहे.—भा. प्र.

७४५ चोरक. ( भटोरा. )—तीव्रगंधी, उष्ण, कडू; आणि वातकफ, नासारोग, मुखरोग, जीर्णज्वर, कृमि यांचा नाशक आहे— रा. नि. विष, रक्तदोष, कुष्ठ, कंडू, आणि व्रण यांचा नाशक आहे.—ध. नि. वात, राक्षसपीडा, घाम, ज्वर, यांचा नाशक आहे.—के. नि. मधुर, रूक्ष; आणि मोह, थंडी, कुष्ठ, कंडू, मेदोरोग यांचा नाशक आहे.—भा. प्र. त्वग्रोगनाशक आहे.—ग. नि.

७४६ ग्रंथिपर्ण. ( गठोना. )—लघु, कडू, रुचिकर, उष्ण; आणि

कफवातनाशक आहे.—**रा. नि.** अग्निदीपक, तिखट; आणि विष, श्वास, कंडू दुर्गंधी, यांचा नाशक आहे.– **भा. प्र.**

७४७ **पद्मक.** ( पद्मकाष्ठ. )—शीतळ, कडू; आणि रक्तपित्त, मोह, दाह, ज्वर, भ्रांति कुष्ठ फोड यांचें नाशक आहे.–**रा. नि.** भ्रांतिनाशक आहे,—**ध. नि.** वातूळ, गर्भस्थापक, तुरट; आणि तृषा, विष, पित्त, कफ, रक्तदोष, व्रण, वांति, विसर्प यांचें नाशक आहे.—**के. नि.**

७४८ **प्रपौंडरीक.** ( पुंडरीकवृक्ष. )—चक्षुष्य, मधुर, कडू, शीतळ; आणि पित्त, रक्तदोष, व्रण, ज्वर, दाह, तृषा यांचा नाशक आहे.--**रा. नि.** वीर्यवृद्धिकर, कफकर आणि पित्तनाशक आहे. —**भा. प्र.**

७४९ **लामज्जक.** ( पीत वाळा. )—थंड, कडू, मधुर; आणि वात, पित्त, तृषा, दाह, श्रम, मूर्च्छा, रक्तपित्त यांचा नाशक आहे.–**रा. नि.** लघु; आणि त्रिदोष, घाम यांचा नाशक आहे.— **के. नि.** मूत्रकृच्छ्र, त्वग्रोग, विष, रक्तदोष यांचा नाशक आहे.—**ध. नि.**

७५० **मांसरोहिणी.** ( मांसरोहिणी. ), **रोहिणी.** ( रोहिणी. )—शीतळ, तुरट, कंटशुद्धिकर, रुचिकर; आणि कृमि, वात यांची नाशक आहे.—**रा. नि.** धातुवर्धक; आणि व्रणरोगनाशक आहे.—**के. नि.** सारक; आणि त्रिदोषनाशक आहे.–**म. नि.**

७५१ **श्रीवेष्ट.** ( विशेष धूप. )—तिखट, कडू, तुरट; आणि कफ, पित्त, योनिरोग, जीर्णज्वर, व्रण, पोटफुगी यांचा नाशक आहे.–**रा. नि.** ग्रह, रक्तदोष; आणि मस्तकरोग यांचा नाशक आहे.–**ध. नि.** मधुर, चिक्कण, सारक, उष्ण, पित्तकर, स्वरकारक; आणि नेत्ररोग, कफ, राक्षसपीडा, पीनस यांचा नाशक आहे.–**के. नि.** घाम, उवा, दुर्गंधि यांचा नाशक आहे.

७५२ **उशीर.** ( काळा वाळा. )–शीतळ, कडू, जळाला सुगंध

देणारा; आणि दाह, श्रम, पित्तज्वर यांचा नाशक आहे.—**रा. नि.** चिक्कण; आणि घाम, दुर्गंधि, पित्त यांचा नाशक आहे.—**ध. नि.** विसर्प, मूत्रकृच्छ्र, पित्त आणि कफ यांचा नाशक आहे.—**म. नि.** मळमळ, तृषा, विष, रक्तपित्त यांचा नाशक आहे.—**ग. नि.** रूक्ष, मधुर, पाचक, मलस्तंभक, लघु; आणि कुष्ठ, रक्तदोष, मेदोरोग, कृमि यांचा नाशक आहे.—**के. नि.** विसर्पनाशक आहे.—**भा. प्र.**

७५३ **नलिका.** ( नलुका, पवारी. )—कडू, तिखट, तीक्ष्ण, मधुर, थंड, मलशोधक; आणि कृमि, वात, उदर, आंव मूळव्याध, शूल, यांची नाशक आहे.—**रा. नि.** चक्षुष्य, वातुळ; आणि रक्तपित्त, विष यांची नाशक आहे.—**ध. नि.** पित्त, रक्तदोष, दाह, कंडू, ज्वर, कुष्ठ, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे— **के. नि.**

## ११ अनुक्तौषधिवर्ग.

७५४ **श्वेतवृंताक.** ( पांढरें वांगें. )—रुचिकर, मूळव्याधीचें नाशक आणि गुणांनीं अधिक आहे.

७५५ **किंकिरात.** ( कंकरी, देवबाभूळ. )—उष्ण, कडू; आणि कफ, मूळव्याध, सूज, यांची नाशक आहे. इचें फूल—सुगंधी, हर्षदायक आणि पुष्टिकर आहे—**ध. नि.** थंड; आणि पित्त, कफ, तृषा, शोष, वांति, कृमि यांची नाशक आहे.—**भा. प्र.** तुरट; आणि रक्तदोष, दाह, कफज्वर यांची नाशक आहे.—**द्र. र.**

७५६ **चपल.** ( चपल धातु. )—लेखन ( रसादिधातु व वातादि दोष यांना पातळ करणारा ), चिक्कण, देहाला लोहाप्रमाणें करणारा, पारदाच्या संयोगानें कडू, उष्ण, मधुर, स्फटिकाप्रमाणें तेजस्वी, षट्कोणाकृति, जड, अति वृष्य, रसबंधक आणि त्रिदोषनाशक आहे.—**ध. नि.**

७५७ **प्राचीनामलक.** ( पाणआंवळी. )— रुचिकर, जड, उष्ण; आणि विष, वात यांची नाशक आहे. इचें पक्क फळ—जिरण्यास

कठीण, जड; आणि कफ, पित्त, वात यांचें नाशक आहे.—**ध. नि.** कफ, वात, तृषा यांचें नाशक आहे.—**द्र. र.** त्रिदोषनाशक आहे.—**भा. प्र.** कफपित्तनाशक आहे.—**के. नि.**

७५८ **साराम्ल.** ( साराम्ल, निंबूभेद. )—आंबट, कफपित्तकारक आणि जड आहे.—**के. नि.**

७५९ **आर्तगल.** ( अर्गट, एरवणी. )—तुरट, कडू; आणि व्रणाचें शोधन करून त्यांस रोपण ( भरून आणणें ) करणारा आहे.—**के. नि.** याचें फळ—मधुर, कडू; आणि ज्वर, रक्तदोष, कफ, रक्तपित्त यांचें नाशक आहे.—**ग. नि.**

७६० **तूद.** ( तूत. ) अपक्व—जड, सारक, आंबट, कफपित्तकर आणि वातनाशक आहे. पक्व—मधुर, उष्ण, शीतळ आणि पित्तवातनाशक आहे.—**के. नि.** वात, रक्तपित्त यांचें नाशक आहे.—**द्र. र.** अपक्व—जड, सारक, आंबट आणि रक्तपित्तकारक आहे.—**भा. प्र.**

७६१ **गांगेरुक.** ( तोरण. )—लघु, ग्राही, आंबट, उष्ण, अग्निदीपक आणि पित्तकर आहे. पक्व फळ—चिक्कण, मधुर, तुरट आणि कफवातनाशक आहे. अपक्व—तुरट, आंबट, जड, उष्ण आणि रक्तपित्तकारक आहे. पक्व फळ—सारक, पित्तकर, ग्राही, लघु, अग्निदीपक; आणि वात, कफ, कफवात यांचें नाशक आहे.—**के. नि.** वातपित्तनाशक आहे.—**म. नि.**

७६२ **नदीभल्लातक.** (पाणबिबवा.) —कडू, तुरट, मधुर, थंड, ग्राही, मातुळ; आणि कफ, रक्तपित्त, व्रण यांचा नाशक आहे.—**के. नि.**

७६३ **वाताम.** ( बदाम. )—जड, चिक्कण, रसकाळीं व पाककाळीं मधुर, वृष्य, उष्ण, धातुवर्धक, बलकर, कफकर; आणि वात, दाह, पित्त, क्षतक्षय, मलबद्धत्व यांचा नाशक आहे.—**के. नि.** वीर्यवर्धक आहे.—**द्र. र.** याची मज्जा—चिक्कण, कफकारक, रक्तपित्तकर, उष्ण; आणि पित्त, वात यांची नाशक आहे.—**म. नि.**

७६४ **मुकूलक.** ( पिस्ते. )–जिरण्यास कठीण, चिक्कण, वृष्य, उष्ण, मधुर, धातुवर्धक, रक्तवर्धक, बलकर, विशेषेंकरून जड; आणि वात, कफ, पित्त यांचे नाशक आहेत.—**म. नि.**

७६५ **निकोचक.** ( जर्दाळू. ) – जड, चिक्कण, वृष्य, उष्ण, मधुर, धातुवर्धक, रक्तवर्धक, बलकर; आणि, वात, कफ, पित्त यांचें नाशक आहे.

७६६ **लवली.** ( हरपररेवडी, रायआवळी. ) इचें फळ–जड, निर्मळ, रुचिकर, रूक्ष, मधुर, आंबट, तुरट; आणि रक्तमूळव्याध, कफ, पित्त यांचें नाशक आहे.— **भा. प्र.** हृद्य, कडू, वातुळ; आणि सुगंधी आहे– **के. नि.** मूळव्याध, वात, आणि पित्त यांचे नाशक आहे.—**म. नि.**

७६७ **कालशाक.** ( कालशाक. ) – तिखट, दुग्धवर्धक, कडू, पाचक, अग्निदीपक; भेदी, वातुळ; आणि मूळव्याध, कफ, सूज, विष यांची नाशक आहे.–**के. नि.** सारक, आणि उष्ण आहे.—**द्र. र.** रुचिकर, बलकर, थंड आणि रक्तपित्तनाशक आहे.–**भा. प्र.**

७६८ **चतुष्पत्री.** ( सुणसुणा, चतुष्पत्री. )—थंड, मधुर, तुरट, लघु, अग्निदीपक, रूक्ष, हृद्य, वृष्य, ग्राही; आणि त्रिदोष, ज्वर, श्वास, कुष्ठ, प्रमेह, अरुचि, भ्रम यांचा नाशक आहे.—**के. नि.**

७६९ **दुग्धिका.** ( दुग्धी. )— मधुर, कडू, जड, दुग्धवर्धक, तिखट, तीक्ष्ण, रूक्ष, उष्ण, वातुळ, हृद्य, मलमूत्रस्तंभक, मलावष्टंभक, गर्भकारक; आणि कृमि, कुष्ठ, कफ यांची नाशक आहे.–**के. नि.**

७७० **उत्तानका.** ( फुरडी, नागरमोथ्याचा भेद, इच्या मुळास कचऱ्याचे कंद असें ह्मणतात. )–रसकाळीं व पाककाळीं मधुर; आणि ज्वर, पित्त, मुखशोष, श्वास, मेदोरोग, तृषा यांची नाशक आहे.– **के. नि.**

७७१ **शिरीषिका.** ( पाणशिरस. ) सारक, उष्ण; आणि

कुष्ठ, मूळव्याध, कफ, पित्त, विष, सन्निपात, मेदोरोग यांचा नाशक आहे.- के. नि.

७७२ **ब्रह्मसोमा**. ( श्वेतवरधारा. )-तिखट, कडू, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक, सारक, पाचक, पित्तकर; आणि कफ, कास यांची नाशक आहे.-के. नि.

७७३ **चोहार**. ( किरमाणी ओंवा. ) तिखट, कडू, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक, वृष्य; आणि त्रिदोष, अजीर्ण, कृमि, शूल यांचा नाशक आहे.--के. नि.

७७४ **लताकस्तूरिका**. ( मुसकदाणा. )-- कडू, मधुर, वृष्य, लघु, थंड, चक्षुष्य; आणि बस्तिरोग, मुखरोग यांचा नाशक आहे.

७७५ **अस्थिशृंखलिका**. (हाडसंधी, हाडसाखळ.)-शीतळ, मधुर, वृष्य, बलकर, अस्थिसंधानकारक, कफकर; आणि वातनाशक आहे.

७७६ **मृगदंती**. ( मखमाल, झेंडू. )-लघु, मधुर; आणि पित्त-कफ नाशक आहे.-के. नि.

७७७ **कंचुका**. ( कोबी. )-पाककाळीं तिखट, कडू, ग्राही, थंड, लघु, अग्निदीपक, रुचिकर, हृद्य, वातुळ; आणि कफपित्तज्वर, कुष्ठ, कास, प्रमेह यांची नाशक आहे.-के. नि.

७७८ **भूमिछत्र**. ( भुईफोड, अळंबें. ) -मधुर, वृष्य, बलकर, रूक्ष, थंड, रुचिकर, जिरण्यास कठीण आणि मलभेदक आहे.- के. नि. सर्व दोषाला कोपाविणारें आणि पीनसकारक आहे.-म. नि.

७७९ **मानकंद**. ( मानकंद. )—जड, शीतळ, मधुर, तिखट, वातुळ; आणि रक्तपित्त, सूज यांचा नाशक आहे.

७८० **राजकदंबक**. ( राजकळंब.)—मधुर, तुरट, आंबट; आणि विषदोषनाशक आहे. याचें फळ— मधुर, शीतळ, जड; आणि रक्त, पित्त, वात यांचें नाशक आहे.

७८१ **जिंगिणी**. ( मोई, मोक. )—मधुर, उष्ण, तुरट, योनिशोधक, पाककाळीं तिखट; आणि वात, व्रण, हृद्रोग, अतिसार यांची नाशक आहे.—**के. नि.** इच्या नाराचें नस्य केल्यानें अनेक रोगांचा नाश होतो.

७८२ **लोबान.** ( लोहबंदी ऊद. )—ग्राही, उष्ण; आणि कफ, वांत, व्रण यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

७८३ **भूमंडली.** ( जलमांडवी. )—लघु, थंड; आणि विष, पित्त, कफ यांची नाशक आहे.—**द्र. र.**

७८४ **वनजा गंधनिशा**. ( वन आंबेहळद. )— तीक्ष्ण, अग्निदीपक, कफकर, वातकारक आणि पित्तकर आहे.—**द्र. र.**

७८५ **मिष्टनिंब**. ( कढी निंब. )— शीतळ, कडू; आणि दाह, मूळव्याध, कृमि, शूल यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

७८६ **हन्वंती**. ( हनुमंती. )— तुरट आणि वृष्य आहे. इचें बीज—ग्राही आणि प्रमेहनाशक आहे.—**द्र. र.**

७८७ **खुरसाना.** ( खुरासनी ओंवा. )—तिखट, उष्ण, ग्राही आणि कफवातनाशक आहे.—**द्र. र.** मादक आणि जड आहे.—**म. नि.** पाचक आहे.—**भा. प्र.**

७८८ **तोयमंजरी**. ( पाणअघाडा. )— सूज, कास आणि वात यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

७८९ **आकल्ल**. ( अक्कलकारा. )—उष्ण, तीक्ष्ण, बलकर; आणि सूज, कफ, वात यांचा नाशक आहे.—**द्र. र.** अग्निदीपक, वृष्य, कामवर्धक आणि मदकारक आहे.—**भा. प्र.**

७९० **तमालपत्र**. ( तमालपत्री, सांभारपान. )—वात, पित्त, कफ आणि मस्तकरोग यांचें नाशक आहे.—**द्र. र.**

७९१ **समुद्रशोष**. (समुद्रशोक.)—ग्राही, पित्तकर; आणि ग्रंथिरोग, वात, सूज यांचा नाशक आहे.—**द्र. र.**

७९२ **शंखेसरी**. ( शंखासूर, गुलतुरा. )–उष्ण; आणि शूल, वात यांचा नाशक आहे.—द्र. र.

७९३ **रक्तरंगा**. ( मेहेंदी. )—वांतिकर; आणि दाह, कफ, कुष्ठ, यांची नाशक आहे.—द्र. र.

७९४ **सर्पदंष्ट्रा**. (सताप.)–कडू, उष्ण, सारक; आणि कफ,वात, यांचा नाशक आहे.–द्र. र.

७९५ **रक्तपुष्प**. ( गुलाब. )– रक्तदोष आणि विंचवाचें विष यांचा नाशक आहे.– द्र. र.

७९६ **अंजीर**. ( अंजीर. )–शीतळ, मधुर; आणि दाह, रक्तपित्त यांचें नाशक आहे.–द्र. र.

७९७ **कुकुरुंद**. ( कुकरबंध.) — रक्तदोष, ज्वर, तृषा आणि कफ यांचा नाशक आहे.–द्र. र.

७९८ **फाफणाकतरु**. ( फोपटें. ) —तुरट आणि ग्राही आहे. याचें फळ–वातनाशक आहे.– द्र. र.

७९९ **विशल्या**. ( वेहकळभेद. ) — कडू; आणि लूता, व्रण यांची नाशक आहे.–द्र. र.

८०० **वनमेथिका**. ( रानमेथी. )–गुणांनीं अल्प असून अश्वरोग-नाशक आहे.— द्र. र.

८०१ **फोग**. ( फोगूशाक. ) — शीतळ, ग्राही; आणि रक्तपित्त, कफ यांची नाशक आहे.—द्र. र.

८०२ **गोलिक**. ( गोलीशाक. ) सारक, रूक्ष, कफकर, जड– आणि पित्तनाशक आहे.– द्र. र.

८०३ **चिरपोटा**. ( चिरपोटाणी. )–थंड, रूक्ष, भेदी; आणि श्वास, कास यांची नाशक आहे.–द्र. र.

८०४ **तिलपर्णी**. ( तिलपर्णी. ) तिखट, उष्ण; आणि सन्निपात, पोटफुगी यांची नाशक आहे.– द्र. र.

८०५ **झुंझुरु.** ( झुंझुरूशाक. ) किंचित् उष्ण; आणि वात, श्वास, कफ यांची नाशक आहे.–द्र. र.

८०६ **वृश्चिकाली.** ( आग्या. )–सारक, उष्ण, दाहकारक; आणि त्रिदोषनाशक आहे.– द्र. र.

८०७ **शंखालु.** ( श्वेत अळूं. ) – जड, मलावष्टंभक, धातुवर्धक, बलकर आणि वीर्यवृद्धिकारक आहे.–द्र. र.

८०८ **कटूदरी.** ( लघु वाघांटी. ) – कडू, उष्ण; आणि विषूची ( मोडशी ), कफ, वात यांची नाशक आहे.–द्र. र.

८०९ **तारसत्त्व.** ( मुरदाडशिंग. )—केशांना काळे करणारें आणि वातनाशक आहे.–द्र. र.

८१० **सस्यक.** ( सस्यकमणि. ) –कडू; आणि त्वग्रोग , उदर, शूल, विष यांचा नाशक आहे.—द्र. र.

८११ **चुंबक.** ( लोहचुंबक. )–लेखन ( दोषांना पातळ करणारा ), शीतळ; आणि विष, मेदोरोग, वात यांचा नाशक आहे.–द्र. र.

८१२ **काच.** ( कांच. )–व्रणाला फोडणारी, चक्षुष्य, सारक आणि शूलनाशक आहे.–द्र. र.

८१३ **सेव.** ( शेव. )—कफकर, धातुवर्धक, जड, वृष्य, रसकाळीं व पाककाळीं मधुर आणि थंड आहे.—म. नि. वीर्यवृद्धिकर आहे.– भा. प्र.

८१४ **महत्सिंचितिकाफल.** ( सफरचंद. )—हें शेवाप्रमाणेंच गुणांनीं असून विशेषेंकरून तुरट आणि थंड आहे.—म. नि.

८१५ **अमृतफल.** ( नासपात. )—मधुर, आंबट, जड, रुचिकर, वीर्यवर्धक आणि वातनाशक आहे.– म. नि. वृष्य आणि त्रिदोषनाशक आहे.—भा. प्र.

८१६ **आलूक.** ( सपाळू. )—रसकाळीं शीतळ, मधुर, आंबट; आणि वातपित्तनाशक आहे.—म. नि.

८१७ **कपित्थपत्री**. ( कवठपत्री. )—तीक्ष्ण, उष्ण; आणि कफ, प्रमेह, विष यांची नाशक आहे.—**म. नि.**

८१८. **डिंडिश**. ( धेंडसं )—रुचिकर, मलभेदक, शीतळ, वातुळ, रूक्ष, मूत्रकारक; आणि पित्त, कफ, मूतखडा यांचें नाशक आहे.–**म. नि.**

८१९ **मरुद्भव**. ( माठ. )—मधुर, शीतळ, मलावष्टंभक, जड, वातकारक, कफकर; आणि पित्त, रक्तपित्त, विषमाग्नि यांचा नाशक आहे.—तांबडा माठ—किंचित् जड, खारट, मधुर, कफकर, पाककाळीं तिखट आणि किंचित् दोषांना कोपविणारा आहे.–**भा. प्र.**

८२० **छिक्कनी**. ( नाकशिंकणी. )—तिखट, रुचिकर, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक, पित्तकर; आणि वातरक्त, कुष्ठ, कृमि, वांत, कफ यांची नाशक आहे.–**म. नि.**

८२१ **चंद्रशूर** . ( रानमेथीभेद. )—बलपुष्टिकारक, उचकी, वात, कफ, अतिसार हे रोग ज्यांस झाले आहेत त्यांस हितकर; आणि रक्तदोष, वात, विष यांची नाशक आहे.–**भा. प्र.**

८२२ **खसखसफलोद्भूतवल्कल**. ( खसखशीच्या फळाचें बोंड, पोस्त )—शीतळ आणि लघु आहे.–**भा. प्र.**

८२३ **चणकाम्ल**. ( हरभऱ्याची आंब. )—अति उष्ण, अग्निदीपक, दांतांना शिवशिवणारी; आणि शूल, अजीर्ण, मलबद्धत्व यांची नाशक आहे.–**भा. प्र.**

८२४ **गंधकोकिला**. ( गंधकोकिला. )—चिक्कण, उष्ण, कडू, सुगंधी आणि कफनाशक आहे. इच्याप्रमाणेंच गंधमालतीचेही गुण आहेत.–**भा. प्र.**

८२५ **सुदर्शना**. ( सुदर्शना.) —मधुर, उष्ण; आणि कफ, सूज, वातरक्त यांची नाशक आहे.–**भा. प्र.**

८२६ **मखान्न**. ( मखाणे. )—हे गुणांनीं कमळाक्षाप्रमाणेंच आहेत.–**भा. प्र.**

८२७ **कुमुदिनीबीज**. ( कुमुदिनीचें बीज. )—मधुर, रूक्ष, थंड, जड; आणि प्रमेह, श्वास, पांडु यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

८२८ **यसद.** ( जस्त. )—तुरट, कडू, शीतळ, चक्षुष्य; आणि कफ, पित्त, प्रमेह, पांडु, श्वास यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

८२९ **स्थूलग्रंथि**. ( थोरकोळिंजन. )—कोळिंजनाहून कमी गुणाचें, सुगंधी आणि कफनाशक आहे.—**भा. प्र.**

८३० **द्वीपांतरवचा.** ( चोपचीनी. )—तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, मलमूत्रशोधक; आणि मलबद्धत्व, पोटफुगी, शूलवातरोग, अपस्मार, उन्माद, शरीरवेदना, फिरंगोपदंश यांची नाशक आहे.—**भा.प्र.**

८३१ **कलंबी**. ( कलंबीशाक. )—दुग्धवर्धक, मधुर आणि वीर्यवर्धक आहे.—**भा. प्र.**

८३२ **शुकनासा.** ( शुकनासा. )—अतिवीर्यवान्, रसायन आणि पित्तनाशक आहे.

८३३ **तमाखु.** ( तमाखु. )—तीक्ष्ण, उष्ण, वातानुलोमनकारक ( अधोगतीनें वाताचें बाहेर पडणें ), बस्तिशोधक, मदकारक, पित्तकर, भ्रमकारक, वांतिकारक, रेचक, दृष्टीला मांद्य करणारी, वीर्याला क्षीणत्व आणणारी; आणि कफवात, श्वास, कास, कोष्ठवात, दंतरोग, कृमि, उवा यांची नाशक आहे. **धूम्रपान.** —विशेषेंकरून दृष्टि आणि वीर्य यांचा नाश करणारें आहे. तमाखु ही देशभेदेंकरून तीक्ष्ण व अति पित्तकर आहे. ही वामक असल्याकारणानें वृश्चिकादिकांचें विष उतरतें. रेचक असल्याकारणानें वात, कफ यांची नाशक आहे. **गुडाखू**—तिखट, उष्ण, धूम्रपान करण्यास प्रशस्त; आणि श्वास, कास, उचकी, कफ, वात, गुल्म, प्लीहा, कृमि, आंव, शूळ, कटिरोग, कृमिजनितरोग यांची नाशक आहे. तपकीर ओढल्यानें पीनसरोगाचा नाश होतो.

## १२ सुवर्णादिवर्ग.

८३४ **सुवर्ण**. ( सोनें. ) सुवर्णजाति—तीन प्रकारचें सोनें आहे.

भूमिज, रसवेधज आणि लोहसंकरज. त्यांत पहिलें रक्तवर्ण. दुसरें पीतरक्तवर्ण आणि तिसरें पांढुरकें असतें; हें गुणांनीं कमी आहे. सुवर्ण-परीक्षा—जें तापविलें असतां लाल दिसतें, कानस मारिली असतां पांढुरकें दिसतें, कसोटीवर घासलें असतां केशराच्या वर्णाप्रमाणें दिसतें, जें तोललें असतां चिक्कण आणि जड असतें व जें मृदु असून रक्तपीत वर्णाचें असतें तें उत्तम सोनें जाणावें. सोनें—चिक्कण, तुरट, कडू, रसायन (व शरीराची जरा दूर करणारें), मधुर, मृदु, शीतळ, चक्षुष्य रुचिकर, आयुष्यवर्धक, वीर्यवृद्धिकर, बलकर, स्मृतिदायक, कामोद्दीपक, बुद्धिवर्धक, कांतिदायक, लक्ष्मीदायक; आणि त्रिदोष, पातक यांचें नाशक आहे.- **रा. नि.** धातुवर्धक, वृष्य, पाककाळीं मधुर, कडू, हृद्य; आणि उन्माद, विष, विषमज्वर यांचें नाशक आहे.—**के. नि.** पित्त, दाह, क्षय, यांचें नाशक आहे.—**द्र. र.** सुजेचें नाशक आहे.— **म. नि.** स्थावरजंगमविष, त्रिदोष यांचें नाशक आहे.— **भा. प्र.**

८३५ **रौप्य**. ( रुपें, चांदी. )-चिक्कण, तुरट, आंबट, पाककाळीं मधुर, रुचिकर; आणि वात, पित्त, वलीपलित यांचें नाशक आहे. जें तापविलें असतां व कसोटीवर घासलें असतां पांढरें दिसतें, चिक्कण, जड, घासलें असतां जास्त तेजस्वी दिसतें तें रुपें उत्तम जाणावें.— **रा नि.** लेखन, शीतळ आणि तारुण्यदायक आहे.— **के. नि.** विषनाशक आहे.—**ध. नि.** पित्त, कफ, रक्तदोष, प्रमेह यांचें नाशक आहे.—**द्र. र.** सारक आहे.– **म. नि.**

८३६ **ताम्र**. (तांबें.) मारण केलेलें—तुरट, मधुर, शीतळ, तिखट; आणि मलबद्धत्व, कफ, पांडु, उदर, शूल, गुल्म यांचें नाशक आहे. जें घणानें ठोकलें असतां चिक्कण असतें, पत्रे केले असतां रक्तवर्ण, शुद्ध, मृदु, शुद्ध खाणींत उत्पन्न झालेलें आणि ज्यांत कांहीं मळ नाहीं तें ताम्र उत्तम जाणावें.—**रा. नि.** रसायन, मलभेदक; आणि मूळव्याध, कृमि, सूज, कुष्ठ, प्लीहा, मोह, दाह, भ्रम, उचकी, यांचें नाशक आहे.—**ध. नि.**

लेखन; आणि कास, श्वास, क्षय यांचें नाशक आहे.—**के. नि.** वृष्य, सारक, आणि पीनस, ज्वर, पित्त यांचें नाशक आहे.—**भा. प्र.**

८३७ **त्रपु.** ( कथील. )--तिखट, कडू, तुरट, खारट, थंड, सारक, रसायन, कांतिकारक; आणि प्रमेह, कृमि, पांडु, दाह यांचें नाशक आहे.—**रा. नि.** पांढरें, लघु, मृदु स्वच्छ, चिक्कण, उष्णतानाशक, थंड, पारदाचे पत्रे करणारें तें कथील उत्तम जाणावें.--**रा. नि.** पलित आणि विष यांचें नाशक आहे. -- **ध. नि.** किंचित् पित्तकर आणि श्वासनाशक आहे.—**म. नि.** चक्षुष्य, उष्ण, पुष्टिकर; आणि बलकर आहे.—**भा. प्र.** मलभेदक, लघु, उष्ण, लेखन, रूक्ष, वृष्य; आणि कफ, श्वास, वात यांचें नाशक आहे.

८३८ **सीसक.** ( शिसें. )—रसवीर्यविपाकानें शिसें हें वंगाप्रमाणें ( कथिलाप्रमाणें ) असून उष्ण, जड, लेखन; आणि कफ वात, मळव्याध यांचे नाशक आहे. जें सोन्यांत घातलें असतां नीलवर्ण, मृदु, चिक्कण, निर्मळ, जड, आणि जें रुप्याचें त्वरित शोधन करितें तें शिसें उत्तम जाणावें.—**रा. नि.** शिसें ( मारण केलेलें ) —हें हत्तीप्रमाणें बल देतें, रोगांचा नाश करून आयुष्य वाढवितें, वीर्याला वाढवितें आणि अपमृत्यूला दूर करितें.—**ध. नि.** पांडुरोगनाशक आहे.--- **द्र. र.** अग्निदीपक, बलकर आणि कामोद्दीपक आहे.—**म. नि.**

८३९ **पित्तल.** ( पितळ. )—पित्तळ व सोन पितळ असें दोन प्रकारचें पितळ आहे. हें कडू, शीतळ, खारट, शोधन करणारें; आणि पांडुरोग, वात, कृमि, प्लीहा, पित्त यांचें नाशक आहे. जें शुद्ध, चिक्कण, मृदु, शीतळ, रंगदार, ज्याचें सूत व पत्रें करितां येतात, जें सोन्याप्रमाणें दिसतें, निर्मळ आणि स्वच्छ तें पितळ उत्तम जाणावें.—**रा. नि.** रूक्ष, सारक, आयुष्यवृद्धिकारक, बलकर, धातुवर्धक; आणि विष, वलीपलितरोग यांचें नाशक आहे.—**ध. नि.** गुल्म, रक्तपित्त यांचें नाशक आहे.— **द्र. र.** कफपित्तनाशक आहे.—**म. नि.**

८४० **कांस्य.** ( कांसें. )—पथ्य, कडू, उष्ण, चक्षुष्य, रुचिकर, तुरट, रूक्ष, अग्निदीपक, लघु, पाचक; आणि कफवातकारक आहे. जें पांढरें, चकचकित, मृदु, तेजस्वी, ज्याला नाद फार असें, चिक्कण, निर्मळ, घण आणि अग्नि यांस सहन करणारें, सरळ, असें कासें उत्तम जाणावें.—**रा. नि.** देहाला दृढ करणारें, कामवृद्धिकर, बलकर; आणि कफनाशक आहे.—**ध. नि.** लेखन आणि निर्मळ आहे.—**के. नि.** मलभेदक आणि कफपित्तनाशक आहे.—**द्र. र.** सारक आहे.—**म. नि.**

८४१ **वट्टलोह.** ( बटलोह. )—तिखट, उष्ण, कडू, थंड, मधुर; आणि कफ, पित्त, दाह, प्रमेह यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

८४२ **कांतलोह.** ( कांतलोह. )—तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष, रसायन; आणि पांडु, कफ, सूज, पित्त यांचें नाशक आहे.—**रा. नि.** मेदोरोग, उदर, त्रिदोष, दाह यांचें नाशक आहे.—**द्र. र.** पुष्टिकर, बलकर, वीर्यवृद्धिकर, देहाची शुद्धि करणारें; आणि गुल्म, मूळव्याध, शूल, वात, आंव, भगंदर, कावीळ, कुष्ठ, यकृत्, प्लीहा, आम्लपित्त, शिरोरोग यांचें नाशक आहे.—**भा. प्र.** भ्रामक, चुंबक वगैरे कांतलोहाचे प्रकार असून तें रसायन आणि देहाची शुद्धि करणारें आहे. याऱ्याखेरीज कांताचें सेवन योग्य नाहीं व कांताखेरीज पारदाला तेज नाहीं. पारद व लोहकांत यांच्या संयोगानें देहाची सिद्धि होते ( जरा दूर होतें ).

८४३ **लोहकिट्ट.** ( लोहकीट, मंडूर. )—मधुर, तिखट, उष्ण, आणि कृमि, वात, परिणामशूल, वातशूल, प्रमेह, गुल्म, सूज यांचें नाशक आहे.— **रा. नि.** कफ आणि प्लीहा यांचें नाशक आहे.—**द्र. र.** गुणांनीं लोहाप्रमाणें असून मलभेदक; आणि पांडुरोग, उदर यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

८४४ **मुंड.** ( लोखंड. )–**तीक्ष्ण.** ( पोलाद. ).— रूक्ष, उष्ण, कडू; आणि वात, पित्त, कफ, प्रमेह, पांडु, शूल यांचें नाशक आहे. तीक्ष्ण हें मुंडाहून गुणांनीं अधिक आहे.–**रा. नि.** आयुष्यवर्धक, बलकर, वीर्यवृद्धिदायक, शोधक, शीतळ, सारक, तुरट, मधुर, जड, रूक्ष चक्षुष्य, लेखन; आणि आमवात, कुष्ठ, वलीपलित, वातरक्त, विष, शूल, मूळव्याध, सूज, कृमि, मेदोरोग, ग्रहणी, अतिसार, अर्धांगवात, सर्वांगवात, ओकारी, श्वास, परिणामशूल यांचें नाशक आहे.—**के. नि., ध. नि**

८४५ **अशोधितधातुदोष.**-अशुद्ध सुवर्णभस्म–श्रमकारक, खेदकारक आणि दुःसह आहे. अशुद्ध रौप्यभस्म—उदर, जडत्व, मंदत्व यांस करणारें आहे. अशुद्धताम्रभस्म—वांति आणि भ्रांति करणारें आहे. अशुद्ध नागभस्म व वंगभस्म —अंगरोग, गुल्म यांस करणारें आहे. अशुद्ध पोलादभस्म—शूलकारक, कांतिनाशक, कृशत्वदायक आणि अंगावर फोड उत्पन्न करणारें आहे. अशुद्ध मुंड आणि पोलादभस्म–क्षुधानाशक, जडत्व देणारें आणि गुल्मरोगकारक आहे. अशुद्ध कांशाचें भस्म—शरीराला आर्द्रता देणारें आणि दाहकारक आहे. अशुद्ध पितळेचें भस्म—मोह आणि शोष यांस देणारें आहे.

८४६ **मनःशिला.** ( मनशील. )—तिखट, चिक्कण, लेखन, पथ्यकारक; आणि विष, भूतबाधा, भीति, उन्माद यांची नाशक आहे–**रा. नि.** लेप व तिलक यांणीं भूतबाधा दूर करणारी, जड, सारक; आणि कफ, वात, अग्निमांद्य, कंडु, कास, क्षय, दोष, श्वास, रक्त, विष यांची नाशक आहे.—**ध. नि.**

८४७ **सिंदूर.** ( शेंदूर. )—तिखट, कडू, उष्ण, व्रणाला भरून आणणारा; आणि कुष्ठ, रक्तदोष, विष, कंडू, विसर्प यांचा नाशक आहे.—**रा. नि.** मस्तकांतील व्रणांचा नाशक आहे.—**ध. नि.** मोडलेल्या हाडास सांधणारा; आणि विष; सूज, त्रिदोष यांचा नाशक आहे.— **द्र. र.** **सिंदूरलक्षण**—रंगदार, अग्नीचा ताप सहन करणारा

सूक्ष्म, चिक्कण, स्वच्छ, जड, मृदु, सुशोभित, शुद्ध असा शेंदूर मंगलकारक जाणावा.

८४८ भूनाग. ( गांडूळ. )—हिऱ्याला मारणारा, नानाविज्ञानकारक; पारदाचे जारणाच्या कामीं पडणारा असून याचें सत्त्व रसायन आहे.—**रा. नि.** याचें सत्त्व विषनाशक आहे.—**द्र. र.**

८४९ **हिंगुल.** ( हिंगूळ. )—मधुर, कडू, उष्ण; आणि वातकफ, त्रिदोषज्वर, द्वंद्वजज्वर ( द्विदोषज ) यांचा नाशक आहे.—**रा. नि.** रसकाळीं व पाककाळीं तिखट; आणि नेत्ररोग, कुष्ठ, विष, विसर्प, कफ, पित्त, उचकी, कावीळ, प्लीहा ( पाणथरी ), आमवात यांचा नाशक आहे.—**भा. प्र., के. नि.**

८५० **गैरिक.** ( गेरू. )—मधुर, शीतळ, तुरट, व्रणरोपक, सुवर्णाला रंग आणणारी, चक्षुष्य; आणि फोड, मूळव्याध, अग्निदग्धव्रण, रक्तपित्त, रक्तदोष, कफ, उचकी, वांति, ज्वर, विष यांची नाशक आहे.—**रा. नि., ध. नि.**

८५१ **सुवर्णगैरिक.** (सोनगेरू.)—मधुर, चिक्कण, थंड, चक्षुष्य, तुरट; आणि रक्तपित्त, उचकी, वांति, विष, रक्तदोष यांची नाशक आहे.—**रा. नि.**

८५२ **सौराष्ट्री.** ( गोपीचंदन. )—कडू, तिखट, तुरट, आंबट, लेखन, चक्षुष्य; आणि संग्रहणी, वांति, पित्त यांचें नाशक आहे.—**रा. नि.** शीतळ, लेपानें विसर्पनाशक, पडणाऱ्या गर्भाला स्थिर करणारें; आणि दाह, व्रण, विष, क्षतरक्त, प्रदर यांचें नाशक आहे.

८५३ **हरिताल.** ( हरताल. )—तिखट, उष्ण, चिक्कण; आणि त्वग्रोग, भूतबाधा, भ्रांति, विष, वात यांची नाशक आहे.—**रा. नि.** अग्निदीपक; आणि स्त्रियांचा विटाळ, कुष्ठ, कंडु, कफ, रक्तपित्त, केश, ग्रहबाधा, मूतखडा, व्रण, गलगंड यांची नाशक आहे.—**के. नि., द्र. र., म. नि., भा. प्र.**

८५४ शिलाजतु. ( शिलाजित. )---कडू, तिखट, उष्ण, रसायन; आणि प्रमेह, उन्माद, मूतखडा, सूज, कुष्ठ, अपस्मार, क्षय, उदर, मूळव्याध, बस्तिरोग यांचें नाशक आहे.—रा. नि. पाककाळीं तिखट, योगवाही ( सर्वरोगनाशक ); आणि कफ, कुष्ठ, कृमि, श्वास, उदर, वांति, पांडु, श्वास, मूत्रशर्करा यांचें नाशक आहे.—के. नि., म. नि., भा. प्र.

८५५ गंधक. ( गंधक. ) — तिखट, उष्ण, तीव्रगंधी, अति-अग्निदीपक; आणि विष, कुष्ठ, कंडू, खरूज, त्वग्रोग यांचा नाशक आहे.—रा. नि. रसायन, मधुर, पाककाळीं तिखट, उष्ण, पाचक, पारदाला मारणारा, पारदाला वीर्यदायक, पित्तकर, सारक, पारद व लोह यांचा हारक; आणि विसर्प, आंव, कृमि, प्लीहा, कफ, वात, क्षय यांचा नाशक आहे.—ध. नि., के. नि., द्र. र., भा. प्र.

८५६. सिक्थक ( मेण. )—बुळबुळीत, मधुर, मृदु, तिखट, चिक्कण; आणि कुष्ठ, वातरोग व लेपानें फुटलेले अंगास भरून आणणारें आहे. रा. नि. व्रणाला भरून आणणारें, मोडलेल्या हाडास सांधणारें; आणि वातरक्त, विसर्प, कंडू यांचें नाशक आहे.—ध. नि.

८५७ कासीस. ( हिराकस. ) —तुरट, थंड, चक्षुष्य, कांतिवर्धक; आणि विष, कुष्ठ, खरूज, कृमि यांची नाशक आहे.- रा. नि. उष्ण, आंबट केशांना काळा रंग आणणारी; आणि कफ, वात नेत्ररोग, विष, श्वेतकुष्ठ, व्रण, कुष्ठ, मूत्रकृच्छ्र, मूतखडा यांची नाशक आहे.—ध. नि.

८५८ पुष्पकासीस .( पुष्पकासीस. )—कडु, शीतळ, नेत्ररोग हारक; आणि लेपानें खरूज, कुष्ठ, अनेक प्रकारचे त्वग्रोग यांची नाशक आहे.—रा. नि.

८५९ सुवर्णमाक्षिक. ( सुवर्णमाक्षिक. )—मधुर, कडू, किंचित् तिखट; आणि कफ, भ्रम, उचकी, मूर्च्छा, श्वास, कास, विष यांचे नाशक आहे.—रा. नि. रसायन, वृष्य, चक्षुष्य, उष्ण; आणि बस्ति-

रोग, मूळव्याध, सूज, उदर, क्षय, त्रिदोष, यांचें नाशक आहे.—ध.नि.

८६० तारमाक्षिक. ( रौप्यमाक्षिक. ) —सुवर्णमाक्षिक व तारमाक्षिक असें दोन प्रकारचें माक्षिक असून रसवीर्यविपाकानें हें भिन्न गुणाचें आहे. रौप्यकर्मांत तारमाक्षिक योजावें व रोगनाशाकरितां सुवर्णमाक्षिक योजावें. हें रोगनाशक, बलपुष्टिकर आहे.—रा. नि.

८६१ सौवीर. ( काळा सुरमा. )—शीतळ, तिखट, कडू, तुरट, चक्षुष्य, रसायन; आणि कफवात, विष यांचा नाशक आहे.—रा. नि.

८६२ कुलत्थिका. ( विवळ्या. )— चक्षुष्य, तुरट, कडू, शीतळ; आणि विष, फोड, कंडू, व्रण, यांचा नाशक आहेत.—रा. नि.

८६३ पुष्पांजन. ( पितळेचें कीट. )—थंड; आणि पित्त, उचकी, दाह, विष, कास, सर्व नेत्ररोग, विषज्वर, काचबिंदु, पडळ, कफ, नेत्रचर्म यांचे नाशक आहे.—रा. नि , ध. नि., के. नि.

८६४ रसांजन. ( रसांजन )—थंड, कडू, कांतिकर, चक्षुष्य, तिखट, दृष्टीला शांत ठेवणारें; आणि रक्तपित्त, कफ, उचकी, श्वास, मुखरोग, विष यांचें नाशक आहे.—रा. नि.

८६५ स्रोतोंजन ( लालसुरमा. ) —शीतळ, तिखट, तुरट, स्तनवर्धक; आणि रसायन आहे.—रा. नि.

८६६ कंपिल्लक. ( कपिला. )—रेचक, तिखट, उष्ण, अग्निदीपक, आणि व्रण, कफ, कास, गुल्म, उदर, मलबद्धत्व, पोटफुगी, कृमि, सूज, शूल, ज्वर, कफपित्त, विष, मलमूत्रबद्धत्व, मूतखडा, यांचीं नाशक आहे. इचीं फुलें—शीतळ, कडू, ग्राही, वातुळ; आणि कफ, रक्तपित्त यांचीं नाशक आहेत. हिचा क्षार—अग्निदीपक, ग्राही आणि शीतळ आहे.—रा. नि, ध. नि., के. नि., म. नि.

८६७ तुत्थ. (मोरचूत.) —तिखट, तुरट, उष्ण, सर्व प्रकारच्या विषावर देण्यास प्रशस्त, वांतिकारक; आणि श्वेत कुष्ठ, नेत्ररोग यांचें नाशक आहे.—रा. नि.

८६८ **खर्परीतुत्थ.** (कलखापरी.)—तिखट, कडू, चक्षुष्य, रसायन, रुचिकर, अग्निदीपक, पुष्टिदायक, नेत्राला निर्मळ, करणारी; आणि त्वग्रोग, सर्व प्रमेह, कफ, पित्त, क्षय यांची नाशक आहे.—**रा. नि., ध. नि.**

८६९ **पारद.** (पारा.)—षड्रसयुक्त, सर्वरोगनाशक, पंचभूतात्मक, देहाला लोहाप्रमाणें बळकटी आणणारा आहे. मूर्च्छित पारा सर्व रोगांचा नाशक आहे. बद्ध झाला असतां आकाशगामी करणारा आहे. लीन झाला असतां सर्व सिद्धि करणारा, आणि भस्म झाला असतां देहाची सिद्धि करणारा आहे.—**रा. नि.** रसायन, चक्षुष्य, योगवाही अत्यंत वृष्य; आणि कुष्ठनाशक आहे.—**के. नि.**

८७० **अभ्रक.** (अभ्रक.)—पांढरें, पिंवळें, तांबडें आणि निळें असें चार जातींचें अभ्रक आहे. यांत निळें गुणांनीं अधिक आहे. यांत चार जाति आहेत. दर्दुर, नाग, पिनाक आणि वज्र. जें अभ्रक अग्नींत तापविलें असतां बेडकाप्रमाणें शब्द करितें तें दर्दुर; जें फूत्कार करितें तें नाग; धनुष्याच्या टणत्काराप्रमाणें शब्द करितें तें पिनाक; आणि जें अग्नींत तापलें असतां कांहींच विकार पावत नाहीं तें वज्र. हें सेवन करण्यास योग्य आहे. इतर जातींचें अभ्रक सेवन केलें असतां गुल्म, व्रण, कुष्ठादिरोग हे प्राप्त होतात. अभ्रक—अमृततुल्य, बुद्धिवर्धक, वृष्य, आयुष्यवर्धक, बलकर, चिक्कण, रुचिकर, अग्निवर्धक, शीतवीर्य, योगवाही, मधुर, तुरट, जड, धातुवर्धक, वाजीकरण; आणि वात, पित्त, क्षय, ज्वर, आंव, कफ, कुष्ठ, व्रण, प्रमेह, विष, प्लीहा, उदर, कृमि, त्रिदोष, ग्रंथिरोग यांचें नाशक आहे.—**रा. नि., के. नि., भा. प्र.**

८७१ **स्फाटिकी.** (तुरटी.)—तिखट, चिक्कण, तुरट, रंगदायक, योनिसंकोचकारक; आणि प्रदर, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, वांति, शोष, सूज, कफ, पित्त, विष, व्रण, श्वेतकुष्ठ, विसर्प यांची नाशक आहे.—**रा. नि., द्र. र., म. नि., भा. प्र.**

८७२ **क्षुद्रशंख.** (नदींतील लहान शंख.)—तिखट, कडू, अग्निदीपक, शीतळ; आणि शूळ, नेत्ररोग, कर्णशूल, व्रण, गुल्म, आंव, संग्रहणी, शीतज्वर यांचा नाशक आहे.—**रा. नि., ध. नि.**

८७३ **शंख.** ( शंख.)—तिखट, शीतळ, पुष्टिकर, वीर्यवर्धक, बलकर, आणि गुल्म, शूल, श्वास, विष यांचा नाशक आहे.—**रा. नि.** पाककाळीं तिखट, उष्णवीर्य, चक्षुष्य; आणि परिणाम शूळ, रक्तपित्त यांचा नाशक आहे.— **ध. नि.**

८७४ **कृमिशंख.** ( कृमिशंख. )—रसवीर्यादिकांत शंखासारखेच याचेही गुण आहेत.

८७५ **कपर्द.** ( कवडी. )— तिखट, कडू, उष्ण; आणि कर्णशूल, व्रण, गुल्म, शूल, नेत्ररोग यांची नाशक आहे.—**रा. नि.**

८७६ **मुक्ताशुक्ति.** ( मोत्यांची शिंप. )—तिखट, चिक्कण, रुचिकर, मधुर, अग्निदीपक; आणि शूल, हृद्रोग यांची नाशक आहे.—**रा. नि.**

८७७ **जलशुक्ति.** ( नदींतील शिंप. )—तिखट, चिक्कण, अग्निदीपक, रुचिकर, पाचक, बलदायक; आणि गुल्म, शूल, विष यांची नाशक आहे.—**रा. नि.**

८७८ **खटिका.** ( खडी. )—मधुर, कडू, शीतळ; आणि पित्त, दाह, व्रणरोग, कफ, रक्तदोष यांची नाशक आहे.—**रा. नि.** प्रमेह, वांति, उचकी यांची नाशक आहे.—**भा. प्र.**

८७९ **दुग्धपाषाण.** ( शिरगोळा. )— रुचिकर, किंचित् उष्ण; आणि ज्वर, पित्त, हृद्रोग, शूल, कास, पोटफुगी यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

८८० **कर्पूरमणि.** ( कर्पूरमणी.)—वातादिरोगनाशक आहे.—**रा. नि.**

८८१ **विमला.** ( विमला.)—तिखट, कडू; आणि त्वग्रोग, व्रण, ज्वर, सूज, पांडु, प्रमेह, अरुचि, मूळव्याध, संग्रहणी, शूल, क्षयरोग, कावीळ, वात, पित्त यांची नाशक आहे.—**रा. नि., ध. नि.**

८८२ **सिकता**. ( वाळू. )—मधुर, शीतळ, लेखन, शेक घेतल्यानें शैत्य, वात यांस घालविणारी; आणि संताप, श्रम, व्रण, उरक्षत यांची नाशक आहे.—**रा. नि., द्र. र., भा. प्र.**

८८३ **कंकुष्ठ**. ( कंकुष्ठ. )—तिखट, उष्ण, रेचक, उष्णवीर्य, कांतिकर; आणि कफ, वात, व्रण, शूल, गुल्म, कृमि, सूज, उदर, मलबद्धत्व, पोटफुगी यांचें नाशक आहे.—**रा. नि., ध. नि., के. नि., भा. प्र.**

८८४ **आखुपाषाण**. ( सोमल. )—लोहसंकरकारक आहे.

८८५ **माणिक्य.** ( माणिक. )—मधुर, चिक्कण, रसायन; आणि वात, पित्त, व्रण यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

८८६ **मौक्तिक** ( मोतीं. )—मधुर, शीतळ, वीर्यवर्धक, बलपुष्टिकारक; आणि नेत्ररोग, विष, क्षयरोग, त्रिदोष, यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

८८७ **प्रवाल**. ( पोंवळें. )—मधुर, आंबट, वीर्यवृद्धिकर, कांतिवर्धक; आणि कफ, पित्त यांचें नाशक आहे.— **रा. नि.** कांतिकारक, पाचक; आणि क्षय, रक्तपित्त, कास, विष, भूतभाधा, नेत्ररोग, यांचें नाशक आहे.—**ध. नि.** सारक, आणि त्रिदोषनाशक आहे.—**द्र. र.**

८८८ **गारुत्मत**. ( पाचरत्न. )—शीतळ, रसकाळीं मधुर, रुचिकर, पुष्टिदायक; आणि विष, आंव, पित्त, भूतबाधा, यांचें नाशक आहे.—**रा. नि.**

८८९ **पुष्पराग**. ( पुष्कराज. )—आंबट, शीतळ, कांतिकारक, बुद्धिवर्धक, आयुष्यवर्धक, लक्ष्मीदायक; आणि वातनाशक आहे.—**रा. नि.**

८९० **हीरक**. ( हिरा. )—षड्रसयुक्त; आणि सर्वरोगनाशक आहे.—**रा. नि.** बलकर, सुखकर, आयुष्यवर्धक, वृष्य; आणि रोगसमूह, पलितरोग, त्रिदोष यांचा नाशक आहे.—**ध. नि.**

८९१ **नील.** ( नीलरत्न. )—कडू, उष्ण; आणि कफपित्तनाशक आहे.—**रा. नि.**

८९२ **गोमेद.** ( गोमेद. )—आंबट, उष्ण, अग्निदीपक, पाचक आणि; वात, पातक यांचा नाशक आहे.–रा. नि.

८९३ **वैडूर्य.** ( वैडूर्य, लसण्या. ) – उष्ण, आंबट; आणि कफ, वात, गुल्म, यांचा नाशक आहे.–रा. नि.

८९४ **स्फटिक.** ( स्फटिक. )–समवीर्य; आणि पित्त, दाह यांचा नाशक आहे.—रा. नि.

८९५ **सूर्यकांत.**( सूर्यकांतमणि. )—उष्ण, निर्मळ, रसायन, पवित्र; आणि कफनाशक आहे.—रा. नि.

८९६ **वैक्रांत.** ( वैक्रांत. )—हिऱ्याप्रमाणें असून रसायन, पुष्टिकर; आणि क्षय, कुष्ट, विष यांचा नाशक आहे.–रा. नि. आयुष्यवर्धक, बलकर, आहे.–ध. नि. प्रमेहनाशक आहे.—द्र. र.

८९७ **चंद्रकांत.** ( चंद्रकांतमणि. )—थंड, चिक्कण; आणि रक्तपित्त, दाह यांचा नाशक आहे.–रा. नि.

८९८ **राजावर्त.** ( राजावर्तमणि. )—तिखट, चिक्कण, थंड; आणि पित्तनाशक आहे.—रा. नि.

८९९ **पेरोज.** ( पेरोज. )–तुरट, मधुर, अग्निदीपक; आणि स्थावरजंगमविष, शूल, भूतबाधा यांचा नाशक आहे.

## १३ पानीयवर्ग.

९०० **पानीय.** ( पाणी. )—मधुर, थंड, रुचिकर, भुक्तान्नाचें पाचक, थकलेल्यास तृप्तिकर, बुद्धिवर्धक, पुष्टिकर; वीर्यवर्धक आणि शोष, तृषा, मोह, भ्रम, निद्रा, आळस, विष यांचें नाशक आहे.–रा. नि. पित्त, व्रण, अजीर्ण, वांति, मूर्च्छा, मद यांचें नाशक आहे.–द्र. र.

९०१ **आकाशोदक.** ( आकाशांतून पडणारें पाणी. )–मधुर, पथ्यकर, रुचिकर, अग्निदीपक; आणि त्रिदोष, तृषा, भ्रम, प्रमेह यांचें नाशक आहे.

१०२ भुईवरील पावसाचें पाणी—गढूळ, आणि दोषदायक आहे. तेंच फार दिवस सांचलेलें – हलकें, स्वच्छ, पथ्यकर, मधुर; आणि सुखकर आहे.

१०३ समुद्रोदक.( समुद्राचें पाणी. )–विस्र (आमगंधी), खारट, रक्तदोषकारक, उष्ण, कांतिनाशक, त्रिदोषकर, दाहकारक; आणि पित्तकर आहे.–रा. नि.

१०४ नादेय.( नदीचें पाणी. )–निर्मल, लघु, अग्निदीपक, पाचक, रुचिकर, तृषाशामक, पथ्य, मधुर; आणि किंचित् उष्ण आहे.

१०५ गंगोदक. ( भागीरथीचें पाणी. )–शीतळ, मधुर, स्वच्छ, अतिरुचिकर, पथ्य, पाचक, पवित्र, पापनाशक, अग्निदीपक, बुद्धि-वर्धक; आणि तृषा, मोह यांचें नाशक आहे.–रा. नि.

१०६ यमुनोदक.–मधुर, वातकर, पाचक, अग्निदीपक, रुचिकर, बलकर; आणि पित्त, दाह, वांति, श्रम यांचें नाशक आहे.

१०७ नर्मदोदक.—लघु, शीतळ, पथ्य, पित्तकर, कफकर, रुचि, कर, मधुर; आणि सर्वरोगनाशक आहे.

१०८ सरस्वतीजल.—मधुर, पवित्र, रुचिकर, अग्निदीपक, पथ्य, कांतिवर्धक; आणि सर्वरोगनाशक आहे.

१०९ चंद्रभागाजल.—शीतळ, वातुळ आणि दाहपित्तनाशक आहे.

११० शतद्रु, बिपाशा, सिंधु आदीकरून नद्यांचें पाणी.–शीतळ, लघु, मधुर, निर्मळ, अग्निदीपक, पाचक, बलकर, बुद्धिवर्धक, स्मृति-दायक, आयुष्यवर्धक आणि सर्व रोगनाशक आहे.

१११ शोणभद्रजल.–रुचिकर, पथ्य, अग्निदीपक, बलकर, क्षीणास पुष्टिदायक; आणि संताप, शोष यांचें नाशक आहे.

११२ वेत्रवतीजल.–मधुर, कांतिवर्धक, पुष्टिकर, वृष्य, अग्निदी-पक; आणि बलकर आहे.

९१३ **पयोष्णीजल.**—रुचिकर, पवित्र, सुखदायक, बलकर, कांतिप्रद, लघु; आणि पातक, सर्वरोग यांचें नाशक आहे.

९१४ **वितस्ताजल.**—मधुर, लघु, स्मृतिदायक, बुद्धिवर्धक, पथ्य, आणि त्रिदोष, संताप, जडत्व यांचें नाशक आहे.

९१५ **महीजल.**—मधुर, बलकर, पित्तकर आणि लघु आहे.

९१६ **शरयूजल.** —मधुर, बलकर आणि पुष्टिदायक आहे.

९१७ **गोदावरीजल.**—पथ्य, अग्निदीपक; आणि पित्त, रक्तदोष, वात, पातक, कुष्ठ, दुष्ट रोग, तृषा यांचें नाशक आहे.

९१८ **कृष्णाजल.**—काळें, जडत्वदायक, मधुर, पवित्र, रक्तपित्तवर्धक, स्वच्छ, रुचिकर, अग्निदीपक आणि पाचक आहे.

९१९ **घटप्रभाजल.**—कृष्णेच्या पाण्याप्रमाणें असून पथ्य, लघु, मधुर, कांतिवर्धक आणि मलनाशक आहे.

९२० **भीमरथीजल.**—पथ्य, लघु, मधुर आणि कांतिवर्धक आहे.

९२१ **तुंगभद्राजल.**—चिक्कण, निर्मळ, रुचिकर, जड, पथ्यकर; आणि कंडू, रक्तपित्त यांचें नाशक आहे.

९२२ **कावेरीजल.**—मधुर, लघु, अग्निदीपक, स्मृतिकारक, बुद्धिदायक, रुचिकर; आणि श्रम, दाह, कुष्ठ, यांचें नाशक आहे.

९२३ **देशभेदानें नद्यांचे विशेष गुण**—ज्या नद्या पूर्वेकडे वाहत जातात त्यांचें पाणी जड असतें. ज्या पश्चिमेकडे वाहत जातात त्यांचें पाणी हलकें असतें; विंध्याद्रीपासून पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या दिशेकडे जाणाऱ्या नद्या अनुक्रमें वात, कफपित्त, पित्त यांच्या नाशक आणि पथ्यकर आहेत.

९२४ **ताम्रपर्णीजल.**—पवित्र, पुण्यवर्धक आणि स्नानपानास हितकर आहे.—**रा. नि.**

९२५ **कालभेदेंकरून नदीच्या पाण्याचे गुण**—वर्षाऋतूंतील पाणी—पीनस, कफ, श्वास, कास यांचें नाशक आहे. शरदृतूंतील—

पथ्यकर आणि वातकफनाशक आहे. हेमंतऋतूंतील पाणी बुद्धिवर्धक आहे. शिशिर व वसंत ऋतूंतील पाणी—सुखकर आणि संतापनाशक आहे. ग्रीष्मऋतूंतील पाणी——तृषा, दाह, वांति व श्रम यांचें नाशक आहे.

१२६ **अनूपदेशजल.**—मधुर, चिक्कण, जड; आणि खरूज, कंडू, कफ, वात, ज्वर यांस करणारें आहे.

१२७ **जांगलजल.**——मधुर, रुचिकर, पथ्य, आयुष्यवर्धक, बलकर, वीर्यवृद्धिकारक, पुष्टिकर, कांतिवर्धक; आणि त्रिदोष नाशक आहे.

१२८ **साधारणजल.**—रुचिकर, अग्निदीपक, पाचक, लघु, पुष्टिकारक; आणि श्रम, तृषा, वात, कफ, प्रमेह यांचें नाशक आहे.

१२९ **विशेषजल.**——तांबड्या जमिनींत होणारें पाणी——वातादिदोषकारक, जड आणि जिरण्यास कठीण आहे. धूसर ( किंचित् पांढरी ) जमिनींतील पाणी दोषनाशक आहे. पर्वतांतून पाझरून येणारें पाणी— निर्मळ, पथ्य, लघु आणि मधुर आहे. काळ्या जमिनींतील पाणी उत्तम, त्रिदोषशामक; आणि सर्व रोगनाशक आहे.

१३० **ऱ्हदवारि.** ( डोहाचें पाणी. )—अग्निदीपक, मधुर, पथ्य आणि कफवातनाशक आहे.

१३१ **प्रस्रवणजल.** ( ओहळाचें पाणी. )—स्वच्छ, लघु, मधुर, रुचिकर आणि अग्निदीपक आहे.

१३२ **तडागसलिल.** ( तळ्याचें पाणी. ) –मधुर, तुरट आणि किंचित् वातूळ आहे.

१३३ **वापीजल.** ( विहिरीचें पाणी. ) –तापदायक, जड आणि वातकफकारक आहे.

१३४ **कूपोदक.** ( आडाचें पाणी. )— खारट, पित्तकर, लघु आणि कफनाशक आहे.

१३५ **औद्भिदजल.** ( भुईंतून येणारें. )— पित्तनाशक आणि लघु आहे.

१३६ **केदारसलिल.** ( पाटाचें पाणी. )— पाककाळीं मधुर, दोषकारक, जड आणि बंद करून सोडलेलें पाणी विशेषंकरून दोषकारक, आहे.

१३७ **हंसोदक.**—नदीचें पाणी मातीच्या भांड्यांत घालून तें उन्हांत ठेवावें. नंतर रात्रीं तें पाणी चांदण्यांत दोरीला टांगून वाऱ्यावर ठेवावें. त्यांत वेलदोडे वगैरे घालून सुवासित करावें. यास हंसोदक असें ह्मणतात. हें श्रमहारक आणि पित्त, उष्ण, दाह, विष, मूर्च्छा, रक्तदोष, मदात्यय यांस हितकर.

१३८ **नाकानें पाणी पिण्याचे गुण.**—जो नित्य मध्यरात्रीं अथवा प्रातःकाळीं थंड आणि मधुर पाणी पिईल, तसेंच तें पाणी नाकानें पिईल त्याचे नेत्र गरुडाप्रमाणें पाहण्यास समर्थ होतील; तो बृहस्पतीप्रमाणें बुद्धिवान् होईल आणि अश्विनीकुमारांप्रमाणें निरोगी होईल.

१३९ **दूषितजल.**—जें पाणी विष्ठा, मूत्र यांणीं मिश्रित, लाल, निळें, विषारी, तापविलें असतां दाट व फेंसाळ होतें, रुचीनें खारट, शेवाळ्यानें मिसळलेलें, ज्यांत किडे पडले आहेत, जें जड, ज्यांत पानें व चिखल हीं पडलीं आहेत, ज्यावर सूर्यचंद्रांचा प्रकाश पडत नाहीं तें पाणी जड आणि दोषकारक आहे. **शीताम्बुपरिवर्जन.**—पाठीचा शूळ, पडसें, वातरोग, नवज्वर, उचकी, पोटफुगी, इत्यादि रोगांत थंड पाणी देऊं नये. **शृतशीतजल.** ( तापवून थंड केलेलें पाणी )—धातुक्षय, रक्तविकार, वांति, रक्तप्रमेह, विष, भ्रम, जीर्णज्वर, शिथिलता, सन्निपात यांत देण्यास प्रशस्त आहे. **तप्तादिजल**—एकभाग आटवून तीन भाग राहिलेलें पाणी पथ्य आणि वातापासून झालेले रोग यांचें नाशक आहे; अर्धाभाग आटविलेलें पाणी वातपित्तनाशक आहे आणि तीन भाग आटविलेलें पाणी त्रिदोषनाशक आहे. एक भाग आटविलेलें पाणी हेमंतऋतूंत सेवन करावें.

तीन भाग आटविलेलें पाणी शरदृतूंत द्यावें आणि अर्धे आटविलेलें पाणी वर्षा, वसंत, शिशिर व ग्रीष्म या ऋतूंत द्यावें. आडाचें आणि ओहळाचें पाणी शिशिर व वसंत या ऋतूंत सेवन करावें; तसेंच ग्रीष्म ऋतूंत **चौंडोदक** ( जें पाणी शिलांनीं वेष्टित व ज्याच्या भोंवतालीं वृक्षादिक आहेत असें ) सेवन करावें. अन्यथा सेवन केल्यास दोषकारक आहे. रात्रीं तापविलेलें पाणी दिवसा प्याल्यास जड आहे. दिवसा तापविलेलें पाणी रात्रीं प्याल्यास जड आहे. या करितां तें वेळचेवेळेस तापवून घ्यावें. कधीं उष्ण, कधीं थंड, कधीं मंदोष्ण, कधीं तापवून निवालेलें, असें पाणी विचार करून सेवन करावें. मध्यरात्रीं उष्ण पाणी सेवन केलें असतां वातरोग, कफ, अरुचि, इत्यादिकांचा नाश होतो. रात्रीचें पाणी प्यालें असतां अजीर्णदोषाचा नाश होतो. सूर्योदयाचे वेळेस पाणी सेवन केलें असतां सर्व रोगनाशक आहे. भोजनानंतर पाणी प्यालें असतां पुष्टिकर आहे. भोजनाचे पूर्वी पाणी प्यालें असतां शक्तिहारक आहे. भोजनाचे मध्यें पाणी प्यालें असतां रुचिकर, अग्निदीपक, निरोगी आणि पथ्यकर आहे. **जलपान लक्षण.**—फार पाणी प्याल्यापासून अन्नाचें पचन होत नाहीं, तसेंच थोडें पाणी प्याल्यानेंही असाच प्रकार होतो. याकरितां अग्निप्रदीप्त होण्यासाठीं वारंवार पाणी प्यावें. **जलभेद.**—अंतरिक्षांतून पडणारें पाणी चार प्रकारचें आहे. **धार, कारक, तौषार** आणि **हैम**, पावसाच्या पडणाऱ्या पाण्यास धार असें ह्मणतात. गारा पडून जें पाणी होतें तें कारोदक. दंवाचें जें पाणी तें तौषार; आणि सकाळीं बर्फ पडून जें पाणी होतें तें हैम. धारोदक दोन प्रकारचें आहे. गांग आणि सामुद्र. गांग—गुणकारक, दोषनाशक; आणि पाचक आहे. जेव्हां आश्विनमासीं स्वाति व विशाखा या नक्षत्रावर सूर्य असतो तेव्हां मेघांतून जें पाणी पडतें तें गांग; आणि त्याखेरीज मृगशीर्षादि नक्षत्रावर जें पाणी मेघवृष्टींतून पडतें त्यास सामुद्र असें ह्मणतात. रौप्यपात्रांत

पावसाचें पाणी धरून त्यांत दधिमिश्रित भाताची पिंडी टाकावी आणि दोन घटका तशीच ठेवावी. ती पिंडी जर सफेतच्या सफेत राहिली तर तें गांग जल आहे असें समजावें व जर त्यांत कांहीं रंगाला बदल झाला तर तें दुसरें पाणी आहे असें समजावें. **गांगजल**—मधुर, शीतळ, रुचिकर, निर्दोष, स्वच्छ, लघु आणि पित्तकफनाशक आहे. चंद्रकांताच्या पात्रांत ठेवलेलें पाणी—स्वच्छ, लघु, पित्तनाशक; आणि मूर्च्छा, रक्तपित्त, दाह, कास, मदात्यय या रोगांत हितकर आहे. **सामुद्रजल**—शीतळ, कफकर, वातकारक, जड; आणि चित्रा व अश्विनी या नक्षत्रांतील गुणावह असून गांगजलाप्रमाणें हितकर आहे. गांग असो किंवा सामुद्र असो, एकदां जमीनीवर तें पाणी पडलें कीं, त्या जमीनीच्या गुणांप्रमाणें त्यांत रस उत्पन्न होतात. पाणी हें स्वभावतः मधुर आहे. तेजाच्या योगानें त्यांत तिखट व कडू हे रस उत्पन्न होतात; वायूच्या योगानें त्यांत तुरट रस उत्पन्न होतो आणि आकाशतत्त्वाच्या योगानें त्यांत अव्यक्त ( अस्पष्ट ) रस उत्पन्न होतो. यांत आकाशतत्त्वाचें ( नाभस् ) जल उत्तम आणि निर्दोष आहे. आश्विनमासांत वृष्टि न झाल्यामुळें गांगतोयाच्या अभावानें रोगाची वृद्धि जास्त होते. कधीं उष्ण, कधीं थंड, कधीं तापवून निवालेलें, कधीं औषधाबरोबर, याप्रमाणें पाणी द्यावें. तें सहसा वर्ज्य करूं नये.

९४० **सितेक्षु.** ( पांढरा ऊंस. )—कठीण, रुचिकर, जड, कफकर, मूत्रल, अग्निदीपक, पाककाळीं किंचित् उष्ण; आणि पित्त, दाह यांचा नाशक आहे.—**रा. नि.**

९४१ **पुंड्रक.**— ( पुंडा ऊंस. )—अति मधुर, शीतळ, कफकर, रुचिकर, तृप्तिकारक; आणि पित्त, दाह, श्रम यांचा नाशक आहे.

९४२ **करंकशालि.** ( रसाळ ऊंस. )—मधुर, शीतळ, रुचिकर, मृदु, वृष्य, कांतिकर, बलकर; आणि पित्त, दाह यांचा नाशक आहे,

९४३ **कृष्णेक्षु**. ( काळा ऊंस.) –मधुर, हृद्य, पाककाळीं गोड,

रसकाळीं तिखट, वीर्यवृद्धिकर, बलकर, आणि त्रिदोषनाशक आहे.—**रा. नि.**

१४४ **रक्तेक्षु.** ( तांबडा ऊंस. ) – पाककाळीं मधुर, शीतळ, मृदु, वृष्य, कांतिकर, बलकर; आणि पित्त, दाह यांचा नाशक आहे. ऊंस हा मुळाजवळ मधुर आहे. मध्यभागीं अति मधुर आहे आणि शेंड्याकडे नीरस व खारट आहे.

१४५ **इक्षुरस.** ( उंसाचा रस. )–यंत्रानें काढलेला–वातुळ, जडत्वकारक, पडशास उत्पन्न करणारा; आणि कफ, वात, वांति यांचा नाशक आहे. दांतांनीं चावून खाल्लेला ऊंस–शीतळ, किंचित् कफकर, चिक्कण, हृद्य, रुचिकर, मूत्रशुद्धिकर, कांतिकर, बलकर, धातुवर्धक, तृप्तिकर, वृष्य; आणि रक्तपित्त, त्रिदोष यांचा नाशक आहे. पाणी घातलेला उंसाचा रस–कफवातकारक आहे.– **रा. नि.**

१४६ **गुड.** ( गूळ. ) – मधुर, खारट, जड, उष्ण, रक्तपित्तास अहितकारक आणि कफवातनाशक आहे. जुना गूळ रसायन आहे. यावनाल ( जोंधळ्याचा ) गूळ– खारट, तिखट, मधुर आणि कफवातनाशक आहे.– **रा. नि.** जुना गूळ–रसायन, रुचिकर, हृद्य, अति मधुर, चिक्कण, श्रमहारक; आणि पित्त, वात, त्रिदोष, प्रमेह यांचा नाशक आहे.–**रा. नि.**

१४७ **मीनांडी.** ( खडीसाखर. ) मधुर, शीतळ; आणि पित्त, दाह, श्रम, रक्तदोष, भ्रांति, कृमि यांची नाशक आहे.

१४८ **यावनाली शर्करा.** ( जोंधळीसाखर. )—मदकर, उष्ण, कडू, अति चिक्कण, सारक, रुचिकर, दाह, रक्तपित्त यास करणारी आणि वातनाशक आहे.

१४९ **माध्वी सिता.** ( मधाची साखर. )—ज्या गुणाचा मध असेल त्याप्रमाणें त्याच्या साखरेचेही गुण आहेत; आणि विशेषेंकरून क्षीण झालेल्यांस बलकर, वृष्य आणि तृप्तिकारक आहे.

९५० **यवराजशर्करा.** (यवासशर्करा.)—अति मधुर, वृष्य, सारक आणि पित्त, श्रम, तृषा, दाह, मूर्च्छा, भ्रांति यांची नाशक आहे.

९५१ **साधारणशर्करा.**—इंद्रियास तृप्तिकर, शीतळ, मधुर; आणि दाह, संताप, तृषा, मोह, मूर्च्छा, श्वास यांची नाशक आहे. पुंड्या उंसाची साखर—क्षीण, क्षयी, अरुचि झालेल्यांस हितकारक, चक्षुष्य, बलवर्धक आणि मधुर आहे. वंशशर्करा—रूक्ष आहे. काळ्या उंसाची साखर—शीतळ आणि चिक्कण आहे. पुंड्या उंसाची साखर—कांतिकारक आहे. तांबड्या उंसाची साखर—पित्तनाशक आहे.

९५२ **मधु.** ( मध. ) मधाच्या जाति—माक्षिक, भ्रामर, क्षौद्र, पौत्तिक, छात्रक, अर्घ्य, औद्दालक आणि दाल अशा मधाच्या आठ जाति आहेत. अनेक प्रकारच्या फुलांचा रस सेवन करितात व ज्या पिंगट वर्णाच्या असून शरीरानें स्थूल असतात त्या माशांपासून जो मध उत्पन्न होतो त्यास माक्षिक असें ह्मणतात. जे भ्रमर कृष्णवर्णाचे व पुष्पांतील रस सेवन करण्यांत कुशल असतात त्यांपासून जो मध उत्पन्न होतो त्यास भ्रामर असें ह्मणतात. ज्या पिंगटवर्ण व बारीक माशा असतात त्यांपासून जो मध उत्पन्न होतो त्यास क्षौद्र असें ह्मणतात. अन्नापासून उत्पन्न झालेल्या व पिंगटवर्णाच्या अशा माशा, त्यांस पुत्तिका असे ह्मणतात. या माशांपासून जो मध उत्पन्न होतो त्यास पौत्तिक असें ह्मणतात. छत्राप्रमाणें आच्छादन असलेल्या पिंवळट पिंगटवर्णाच्या माशा, यांजपासून जो मध उत्पन्न होतो त्यास छात्रक असें ह्मणतात. तीक्ष्ण तोंड आहे ज्यांचे व ज्या भ्रमरांप्रमाणें असतात, त्यांपासून जो मध उत्पन्न होतो त्यास अर्घ्य असें ह्मणतात. औद्दाल या नांवाचे पिंगटवर्णाचे कीटक आहेत. हे वारुळांत राहतात. यांजपासून जो मध उत्पन्न होतो त्यास औद्दालक असें ह्मणतात. इंद्रनीलाच्या कांतीप्रमाणें व सूक्ष्म आणि ज्या झाडाच्या

ढोलींत राहतात, त्यांजपासून जो मध उत्पन्न होतो त्यास दाल असें ह्मणतात. याप्रमाणें मधाचे ८ प्रकार सांगितले. माक्षिक जातीचा मध तेलाच्या रंगासारखा असतो; भ्रामर पांढऱ्या रंगाचा असतो. क्षौद्र पिंगट वर्णाचा असतो. पौत्तिक तुपासारखा असतो; छात्रक पीतवर्णाचा असतो; अर्घ्य पिंगट रंगाचा असतो; औद्दालक सोन्यासारख्या रंगाचा असतो आणि दाल पिंवळ्या रंगाचा असतो. माक्षिक—मधुर, रूक्ष, लघु आणि श्वासादिरोगनाशक आहे. भ्रामर—बुळबुळीत, रूक्ष, मधुर; आणि मुखजाड्यनाशक आहे. क्षौद्र—शीतळ, चक्षुष्य, बुळबुळीत आणि पित्तवातनाशक आहे. पौत्तिक —मधुर, रूक्ष, उष्ण, दाहकारक आणि रक्तपित्तकारक आहे. छात्रक—चित्रकुष्ठ, प्रमेह, कृमि यांचा नाशक असून गुणांनीं जास्त आहे. अर्घ्य—अति गोड, चक्षुष्य आणि कफपित्तादिदोषनाशक आहे. औद्दालक —सर्वसिद्धिदायक आणि कुष्ठादिरोगनाशक आहे. दाल —तिखट, तुरट, आंबट, मधुर आणि पित्तकर आहे. नवा मध — स्थूलत्वदायक आणि फार कफकर नाहीं. जुना मध—ग्राही, लेखन आणि स्थूलत्वनाशक आहे. पक्क केलेला मध – रुचिकर, बलकर, बुद्धिकर, स्मृतिदायक, वीर्यवृद्धिकर; आणि त्रिदोष, अनेक प्रकारचे रोग, जडत्व, जिव्हारोग यांचा नाशक आहे. अपक्कमध — आंव, गुल्म, वातरोग, पित्त, दाह, रक्तदोष, स्थूलत्व यांचा नाशक आहे. व्रणशोधन व व्रण भरून आणणें या कामीं मध हितकर आहे. तशीच मधुशर्करा आहे. उष्णपदार्थांशीं, उष्णकाळांत अथवा तापवून घेतलेला असा मध सेवन केला असतां तो मनुष्यास तापदायक होतो. कृमिकीटकयुक्त, आंबट पदार्थांच्या योगानें बिघडलेला, आंबलेला, कंटकवृक्षाच्या ढोलींत झालेला, अनेक रंगाचा, तसेंच घरांत झालेला असा मध दोषकारक आहे. आघात व दंश यांचे ठायीं मध हितकर आहे, रसायन आहे आणि उचकी, मूळव्याध, सूज, कफ, व्रण

यांचा नाशक आहे. अन्यत्र उपयोग केला असतां दोषकारक आहे.

९५३ **मद्य.** ( दारू. )–मधुर, बलकर, कांतिकर, हृद्य, सारक, मदकारक; आणि कफ, वात यांची नाशक आहे. दारू ही तीन प्रकारची आहे; गौडी, माध्वी आणि पैष्टिका. तसेंच सिंधी वगैरे द्रव्यांच्या संयोगानें केलेली अनेक प्रकारची आहे. धायटीचीं फुलें व गूळ यांजपासून केलेली ती गौडी, पुष्पांच्या रस व मध यांपासून केलेली ती माध्वी आणि धान्यादि पदार्थांपासून करितात ती पैष्टी. पूर्वी सांगितलेल्या या एकापेक्षां एक जास्त मदकारक आहेत. ताडादिकांच्या रसापासून जी दारू करितात तीस सैंधी असें ह्मणततात. अनेक द्रव्यांच्या मिश्रणापासून केलेल्या दारूस कादंबरी असें ह्मणतात. सैंधी व कादंबरी असे मद्याचे दोन प्रकार आहेत. गौडी—तीष्ण, उष्ण, मधुर, पित्तकर, बलकर, अग्निदीपक, पथ्य, कांतिकारक, तृप्तिकारक आणि वातनाशक आहे. माध्वी—मधुर, हृद्य, साधारण उष्ण; आणि पित्त, वात, पांडु, कावीळ, गुल्म, मूळव्याध, प्रमेह यांची नाशक आहे. पैष्टी–तिखट, उष्ण, तीक्ष्ण आणि थोडी गोडी प्रमाणेंच आहे.

## १४ क्षीरादिवर्ग.

९५४ **गोदुग्ध.** ( गाईचें दूध. )— पथ्यकर, अति रुचिकर, मधुर, चिक्कण, कांति, ज्ञान, बुद्धि, स्मृति, पुष्टि यांस देणारें, वीर्यवृद्धिकर; आजि पित्त, वात यांचें नाशक आहे.

९५५ **महिषीक्षीर.** ( ह्मशीचें दूध. ) —मदकर, पाककाळीं शीतळ, जड, बलकर, पुष्टिकर, वृष्य; आणि पित्त, दाह, रक्तदोष यांचे नाशक आहे.

९५६ **अजापय.** ( शेळीचें दूध. )—शेळीचें शरीर हलकें असून ती अनेक प्रकारच्या वनस्पति भक्षण करिते व पाणी थोडें पिऊन व्यायाम करिते ह्मणून तिचें दूध सर्व व्याधिनाशक आहे. हें गाईच्या दुधापेक्षां वीर्यानें अधिक असून क्षीण झालेल्यास पथ्यकर आहे. लहान शेळीपेक्षां मोठ्या शेळीचें दूध जास्त हितकर आहे.

९५७ **आविकं पयः** ( मेंढीचें दूध. )-चिक्कण, पथ्य, जड, धातुवर्धक; आणि कफ, पित्त, स्थूलत्व, प्रमेह, यांचें नाशक आहे.

९५८ **हस्तिनीपयः** ( हत्तिणीचें दूध. )—मधुर, वृष्य, जड, तुरट, चिक्कण, वयाला स्थिर करणारें, शीतळ, चक्षुष्य, आणि बलवर्धक आहे.

९५९ **अश्वीक्षीर.** ( घोडीचें दूध. )—रूक्ष, आंबट, खारट, अग्निदीपक, लघु, वयाला स्थिर करणारें, बलकर आणि कांतिकारक आहे.

९६० **गर्दभीपयः.** ( गाढवीचें दूध. )—बलकर, मधुर; आंबट, रूक्ष, अग्निदीपक, पथ्य; आणि वात, श्वास यांचें नाशक आहे.

९६१ **उष्ट्रीपयः.** ( उंटिणीचें दूध. )—कुष्ठ, सूज, पित्त, मूळव्याध, कफ, मलबद्धत्व, कृमि, गुल्म, उदर, श्वास, उचकी यांचें नाशक आहे.

९६२ **मानुषीपयः.** ( स्त्रीचें दुध. )— मधुर, तुरट, थंड, लघु, चक्षुष्य, अग्निदीपक, पथ्य, पाचक आणि रुचिकर आहे.

९६३ **सामान्यदुग्ध.**—कास व श्वास वाढविणारें, जड आणि दोषकारक आहे. हेंच तापविलें असतां पथ्यकर आहे. स्त्रीचें दूध न तापविलेलें रोगनाशक आहे. गाईचें धारोष्ण दूध अमृताप्रमाणें आहे. हें सर्व रोगनाशक आणि पथ्यकर आहे. दूध काढल्यापासून न तापवितां फार वेळ राहिलें तर तें दोषकारक आहे. मेंढीचें दूध तापविलेलें पथ्यकर आहे. शेळीचें तापवून निवालेलें पथ्यकर आहे. धार काढून थंड झालेलें म्हशीचें दूध पिण्यास हितावह आहे आणि गाईचें धारोष्ण दूध प्राशन केलें असतां तें वृष्य, धातुवर्धक आणि अग्निवर्धक आहे. मध्याह्नकाळीं दूध सेवन केलें असतां तें बलकर, रतिवर्धक आणि मूत्रकृच्छ्रनाशक आहे. बाळतपणांत नित्य दूध प्राशन केलें असतां अग्निदीपक, आणि बलकर आहे. म्हातारपणांत दूध प्राशन केलें असतां तें वीर्यवर्धक आहे. रात्रींच्या प्रहरीं दूध प्राशन केलें असतां तें अनेक

दोषशामक आहे; याजकरितां दूध हें सर्वकाळ सेवन करावें. दूध काढल्यापासून सहा घटिकांनंतर न तापवितां सेवन केल्यास विकृतिकारक होतें. तसेंच तें न तापवितां वीस घटिका राहिलें असतां विषासमान होतें. जीर्णज्वर, कफ, क्षीणत्व यांवर दूध सेवन केलें असतां तें अमृताप्रमाणें आहे. त्याप्रमाणेंच नवज्वरांत दूध प्राशन केलें असतां तें विषाप्रमाणें मनुष्यास मारितें. दुधाचे चतुर्थांश त्यांत पाणी घालून तापवून तें सेवन केलें असतां सर्व रोग नाशक, बलपुष्टिकारक आणि वीर्यवर्धक आहे. सकाळीं गाईचें दूध सेवन करणें हितावह आहे. तसेंच रात्रीं म्हशीचें दूध सेवन करणें हितकर आहे. साखर टाकून दूध प्राशन करणें पथ्यकर आहे. तापवून थंड झालेलें दूध पित्तनाशक आहे. तापविलेलें उष्ण दूध कफनाशक आहे. न तापविलेलें दूध अपाचक आणि मलावष्टंभक आहे. धारोष्ण दूध—अमृततुल्य, श्रमहारक निद्राकारक कांतिदायक, वृष्य, धातुवर्धक, अग्निदीपक, अति मधुर; आणि त्रिदोषनाशक आहे. दूध हें तापविल्या खेरीज कधींही सेवन करूं नये; तसेंच तापविलेलें दूध लवणयुक्त, किंवा पीठ, मूग, उडीद, दोडका, कंद, फळें इत्यादिकांबरोबर सेवन करूं नये. मत्स्य, मांस, गूळ, मूग, मूळा यांशीं दूध सेवन केलें असतां कुष्ठरोग होतो. शाका व जांभळ यांशीं दूध सेवन केलें असतां तें सर्पाप्रमाणें मारक होतें. दूध चिक्कण, शीतळ जड आहे म्हणून सर्वकाळ सेवन करूं नये. हें दीप्ताग्नीला मंद करितें आणि मंदाग्नीला नाहींसें करितें. ज्याचा अग्नि तीव्र आहे त्याणें नित्य तापविलेलें म्हशीचें दुध सेवन करावें; तेणेंकरून सर्व धातूंची वृद्धि होऊन बल व पुष्टि प्राप्त होते. नवीन प्रसूत झालेल्या गाईम्हशींचें दूध—मधुर, खारट, रूक्ष, पित्तकारक, दाहकर; आणि रक्तदोषकारक आहे. मध्य प्रसूत गाईम्हशींचें दूध—मधुर आणि त्रिदोषशामक आहे. प्रसूत होऊन फार दिवस झालेल्या गाईम्हशींचें दूध खारट, मधुर आणि दाहकारक आहे. प्रथम व्यालेल्या गाईचें दूध—निःसार आणि हीनगुण

आहे. मध्यमवयाच्या गाईचें दूध—रसायन; आणि दुर्बल व वृद्ध यांस हितावह आहे. तीन महिने प्रसूत होऊन झालेल्या गाईचें दूध— दाहकारक, खारट, मधुर आणि पित्तकर आहे; पांढऱ्या गाईचें दूध वातनाशक आहे; काळ्या गाईचें दूध पित्तनाशक आहे; तांबड्या गाईचें दूध कफनाशक आहे आणि कपिला गाईचें दूध त्रिदोषनाशक आहे. देशादेशांतील गाईच्या दुधांत चारा व पाणी यांच्या सेवनाच्या योगानें फरक. होतो, दुधावरील फेंस—शीतळ, चिक्कण, जड, मदकर, वृष्य आणि पित्तनाशक आहे.

१६४ **गोदधि.** ( गाईचें दहीं. )—अति पवित्र, शीतळ, चिक्कण, अग्निदीपक, बलकर, मधुर, ग्राही, आणि अरुचि, वातरोग यांचें नाशक आहे.

१६५ **महिषीदधि.** ( म्हशीचें दहीं. )—मधुर, चिक्कण, कफकर, बलकर, रक्तवृद्धिकर, वृष्य, शोधक; आणि रक्तपित्त, श्रम यांचें नाशक आहे.

१६६ **अजादधि.** ( शेळीचें दहीं. )—लघु, उष्ण, रुचिकर, अग्निदीपक, पाचक; आणि कफ, वात, नेत्ररोग, मूळव्याध, श्वास, कास यांचें नाशक आहे.

१६७ **आविकं दधि.** ( मेंढीचें दहीं. )—चिक्कण, कफकर, पित्तकर, जड, वातरोग व रक्तपित्त यांस पथ्यकर; आणि सूज, व्रण यांचें नाशक आहे.

१६८ **हस्तिनीदधि.** ( हत्तिणीचें दहीं. )—तुरट, लघु, उष्ण, रुचिकर, अग्निदीपक, वीर्यवर्धक, बलकर; आणि अन्नद्रवशूळ, कफरोग यांचें नाशक आहे.

१६९ **अश्वीदधि.** ( घोडीचें दहीं. )—मधुर, तुरट, रूक्ष, किंचित् वातकारक, अग्निदीपक; आणि कफ, मूर्च्छा, नेत्ररोग यांचें नाशक आहे

१७० **गर्दभी दधि.** ( गाढवीचें दहीं. ) रूक्ष, उष्ण, लघु अग्नि-दीपक, पाचक, मधुर, आंबट, रुचिकर; आणि वातरोग यांचें नाशक आहे.

१७१ **उष्ट्रिदधि.** ( उंटिणीचें दहीं. )—तिखट, मधुर, किंचित् आंबट; आणि कुष्ठ, कृमि, शूल, उदर, याचें नाशक आहे.

१७२ **स्त्रीदधि.** (स्त्रीचें दहीं.)—पाककाळीं मधुर, बलकर, आंबट, तृप्तिकर, जड, चक्षुष्य; आणि ग्रहबाधानाशक आहे.

१७३ **सामान्य दधि.**—आंबट, जड, ग्राही, बलकर, सुजेला करणारें, रुचिकर, क्षुधेला शमविणारें, शांतिकर, रक्तपित्तकारक, वीर्य-वर्धक, कास, श्वास, पीनस, विषमज्वर, शीतज्वर, यांस हितकर; आणि मूत्ररोगनाशक आहे. मीठ, मिरें, तूप, साखर, मूग, धायटीचीं फुलें यांच्या खेरीज नित्य दहीं सेवन करूं नये. शरद्, वसंत, उन्हाळा, या ऋतूंत, रात्रीं आणि कफ, पित्त हे विकार असतां दहीं सेवन करूं नये त्रिकटु ( सुंठ मिरें, पिंपळी ) आणि मोहरीचें चूर्ण मिश्रकरून दहीं सेवन केलें असतां तें अग्निप्रदीपक, आणि कफवातनाशक होतें. थंडीच्या दिवसांत व शिशिर ऋतूंत दहीं सेवन केलें असतां तें अति-पथ्यकर, देहाला दृढत्व, देणारें आणि कांतिवर्धक आहे.

१७४ **मस्तु.** ( दह्याचें पाणी. ) –उष्ण, आंबट, षड्विधरुचिकर, बलकर, तुरट, क्षुधाशामक, शिराशोधक, लघु; आणि मळकट, तृषा, उदर, प्लीहा, मूळव्याध, कफ, वात, मलावष्टंभ, शूल, पांडु श्वास, गुल्म, यांचें नाशक आहे.

१७५ **तक्र.** ( ताक. )—मथित तक्र—वातनाशक आहे. उदश्वित् तक्र—रुचिकर आणि कफपित्तनाशक आहे. तक्र—मंदाग्नि, अरुचि, दाह, विषमज्वर, श्वास, कास यांना पथ्यकर; आणि त्रिदोष शामक आहे. तसेंच तक्र—रुचिकर, अग्निदीपक; आणि त्रिदोष, अरुचि, वांति, श्रम, मळमळ यांचें नाशक आहे. उदश्वित्—बलकर;

आणि वातनाशक आहे. घोल—कफ, श्रम, वात, वांति यांचे ठायीं प्रशस्त आहे. ताक हें आंबट आहे ह्मणून कफाचा नाश करितें. जसें देवांना-अमृत प्रिय आहे तसें मनुष्यांना ताक हें हितकर आहे. आमातिसार, मोडशी, वातज्वर, पांडु, कावीळ, प्रमेह, गुल्म, उदर, वातशूळ या रोगांत ताक पिणें हें पथ्यकर आहे. शीतकाळीं, अग्निमांद्य, कफ, पांडु, मार्ग चालून थकलेला, कुष्ठरोग यांत ताक सेवन करणें हितकर आहे. वातोदरी यानें पिंपळी व सैंधव घालून ताक प्यावें. पित्तोदरी यानें साखर व मिरें यांशीं ताक प्यावें. कफोदरी यानें ओंवा, सैंधव, जिरें, सुंठ, मिरें, पिंपळी यांशीं ताक प्यावें. सन्निपातोदरी यानें त्रिकटु, जवखार व सैंधव यांशीं ताक प्यावें. क्षत( व्रण )रोग झालेला यास, उष्णकाळांत, तसेंच दुर्बलत्व, तृषा, मूर्च्छा, भ्रांति, रक्तपित्त आणि वाळंतरोग यांत ताक देऊं नये. लोण्यासह ताक हें उदर, निद्रा व जडत्व यांस देणारें आहे.

९७६ **नवनीत.** ( लोणी. )—शीतळ, कांतिकर, बलकर, मधुर, वृष्य, रुचिकर, सुखकर, पुष्टिदायक, चक्षुष्य; आणि पित्त, वात, कफ, सर्वांगशूळ, कास, श्रम, सर्व दोष यांचे नाशक आहे. **गाईचें व ह्मशीचें लोणी.**—बाल व वृद्ध यांना हितकर, बलकर आणि धातुवर्धक आहे. **ह्मशीचें लोणी.**—रसकाळीं तुरट, मधुर, शीतळ, वृष्य, ग्राही, बलकर आणि पित्तनाशक आहे. **शेळीचें लोणी.**—लघु, मधुर, तुरट, चक्षुष्य, अग्निदीपक ,बलकर आणि त्रिदोषनाशक आहे. **शेळीचें नवें लोणी.**—बलकर, अग्निदीपक ;आणि क्षय, कास, नेत्ररोग, कफ यांचें नाशक आहे. **मेंढीचें लोणी.**—उग्रगंधी, शीतळ, स्मृतिनाशक, जड, पुष्टिकर, स्थूलत्वकारक आणि मंदाग्निदीपक आहे. **एडकीचें लोणी.**—पाक-काळीं थंड, लघु; आणि योनिशूळ, कफ, वात, मूळव्याध यांस हित-कर आहे. **हस्तिणीचें लोणी.**—तुरट, शीतळ, लघु, कडू, मलावष्टं-भक; आणि कृमि, जंतु, कफ, पित्त यांचें नाशक आहे. **घोडीचें**

**लोणी**.-तुरट, चक्षुष्य, तिखट, उष्ण, किंचित् वातहारक; आणि कफ, कास यांचें नाशक आहे. **गाढवीचें लोणी**.- तुरट, बलकर, अग्निदीपक, पाककाळीं लघु, उष्ण; आणि कफ, वात, मूत्रदोष यांचें नाशक आहे. **उंटिणीचें लोणी**-पाककाळीं शीतळ, लघु; आणि व्रण, कृमि, कफ, रक्तदोष, वात, विष यांचें नाशक आहे. **स्त्रीचें लोणी**.-रस, काळीं व पाककाळीं लघु, चक्षुष्य, अग्निदीपक; आणि सर्वरोग, विष- यांचें नाशक आहे. **साधारण लोणी**. ( ताजें )-शीत, रुचिकर, मधुर, वृष्य, ग्राही, बलकर, पुष्टिकर, चक्षुष्य, तृप्तिकारक; आणि वात, कास, कृमि, कफ, शूल, श्रम, पित्त यांचें नाशक आहे. **जुनें लोणी, तूप**.-एका दिवसाहून जास्त दिवस राहील तसतसें दुर्गंधदायक, हृद्यास अहितकारक आणि सर्व रोगकारक आहे.

१७७ **गाईचें तूप**.-बुद्धिवर्धक, कांतिकारक, स्मृतिदायक बलकर, मतिदायक, पुष्टिकर, हृद्य, अग्निदीपक, पाककाळीं मधुर, वृष्य, वयाला स्थिर करणारें, पूज्य, अनेक गुणकारक, भाग्यवंतासच मिळणारें, आणि वात, कफ, श्रम, पित्त, यांचें नाशक आहे. **म्हशीचें तूप**.- उत्तम, स्मृतिदायक, सुखकारक, कांतिवर्धक, बलकर, अग्निदीपक, चक्षुष्य, हृद्य, मनोल्हादक; आणि वात, कफ, मूळव्याध, संग्रहणी यांचें नाशक आहे. **शेळीचें तूप**.- चक्षुष्य, अग्निदीपक, बलवर्धक आणि कास, श्वास, कफ, क्षयरोग यांचे ठायीं प्रशस्त आहे. **एडकीचें तूप**.-पाककाळीं लघु, पित्तशामक; आणि योनिरोग, कफ, वात, शोष, कंप यांचे ठायीं हितकर आहे. **मेंढीचें तूप**. -अतिजड आहे. म्हणून सुकुमार प्रकृतीच्या मनुष्यास वर्ज्य, बुद्धिदायक आणि बलकर आहे. **हस्तिनीचें तूप**.— तुरट, लघु, मलावष्टंभक, कडू, अग्निदीपक; आणि कफ, पित्त, विष, कृमि यांचें नाशक आहे. **घोडीचें तूप**.—तिखट, मधुर, तुरट, किंचित अग्निदीपक, किंचित् वातुळ, जड, आणि मूर्छानाशक, आहे. **उंटिणीचें तूप**.-मधुर, पाककाळीं तिखट, शीतळ;आणि कुष्ट, कृमि, विष,

वात, कफ, गुल्म, उदर, यांचें नाशक आहे. **स्त्रीचें तूप.**—चक्षुष्य, पथ्यकर, अग्निदीपक, रुचिकर, पाककाळीं लघु; आणि विष व सर्वरोग यांचें नाशक आहे. **जुनें तूप.**——व्रणशोधक, व्रणाला भरून आगणारें; आणि उन्माद, अपस्मार, मूर्छा, मस्तकशूळ, कर्णरोग, नेत्ररोग यांचें नाशक आहे. **सामान्य तूप.**—आयुष्यवर्धक, देहाला मजबुती आणणारें, सुकुमारत्व देणारें, कांतिदायक, स्मृतिदायक, बलकर, बालत्व, तारुण्य व वार्धक्य यांत हितकर अतिबलकर, आणि वांतिनाशक असून त्रैलोक्यांत यासारखें दुसरें हितकर औषध नाहीं.

१७८ **कांजी.** —वात, सूज, पित्तज्वर, दाह, मूर्च्छा, भ्रम, शूल पोटफुगी; आणि मलबद्धत्व यांची नाशक आहे. **कांजीशीं सिद्ध केलेले तिळाचें तेल.**—लेपानें दाहकारक; आणि पलितरोग, वातरोग, गात्रशैथिल्य यांचें नाशक आहे.

. १७९ **चुक्र.** (कांजीचाभेद.)—कडू, आंबट; मधुर; आणि कफ, कास, नाकांतील दुर्गंधि, मस्तकरोग यांचें नाशक आहे. **सौवीर.** ( तुषोदक.) —आंबट, केशांना हितकर, बलकर, तृप्तिकारक; आणि मस्तकरोग, वृद्धत्व, शिथिलत्व यांचें नाशक आहे. **तांदुळाचें धुवण.**—तुरट, मधुर, ग्राही; आणि विष, वांति, तृषा, दाह, व्रण यांचें नाशक आहे. **शिवरस.** (तीन दिवसांची शिळी पेज. )—अग्निदीपक, मधुर, आंबट, लघु, तृप्तिकारक; आणि दाहनाशक आहे.

१८० **गोमूत्र.**—तिखट, कडू, उष्ण, लघु, पित्तकर, अग्निदीपक, पवित्र, मतिदायक; आणि कफ, वात, त्वग्रोग यांचें नाशक आहे. **शेळीचें मूत्र.**—तिखट, उष्ण, रूक्ष, लघु; आणि नाडीव्रण, विष, प्लीहा ( पाणथरी ), कफ, श्वास, गुल्म, सूज, यांचें नाशक आहे. **महिषीमूत्र.**—तिखट, उष्ण; आणि मलबद्धता, सूज, गुल्म, कुष्ठ, कंडू, शूल, उदर यांचें नाशक आहे. **मेंढीचें मूत्र.**—कडू, तिखट, उष्ण; आणि कुष्ठ, मूळव्याध, उदर, शूल, रक्तदोष, सूज, प्रमेह विष यांचें-

नाशक आहे. **घोड्याचें मूत्र**.—कडू, उष्ण, तीक्ष्ण, पित्तकारक, अग्निदीपक; आणि विष, वात, यांचें नाशक आहे. **गाढवाचें मूत्र**.—तिखट, खारट, तीक्ष्ण; आणि कफ, महावात, भूतबाधा, कंप, उन्माद यांचें नाशक आहे. **उंटाचें मूत्र**.—तिखट, कडू, उष्ण, खारट, पित्तकर, बलकर; आणि उदर, वात, यांचें नाशक आहे. **हत्तीचें मूत्र**.—कडू, उष्ण, खारट; तुरट; आणि वात, भूतबाधा, शूल, उचकी, श्वास यांचें नाशक आहे. **नरमूत्र**.—कडू, उष्ण, खारट, रूक्ष; आणि आंव, कृमि, व्रण, विष, भूतबाधा, त्वग्रोग वात यांचें नाशक आहे. शूल, गुल्म, उदर, मलबद्धता, वात, वांति यांचे ठायीं मूत्र प्रशस्त असून सर्वांचे अभावीं गोमूत्र योजावें.

९८१ **तिळाचें तेल**.—केशांना काळे करणारें, मधुर, कडू, तुरट, उष्ण, तीक्ष्ण, बलकर, कांतिदायक; आणि कफ, वात, जंतु, खरूज, व्रण, कंडू, यांचें नाशक आहे. **शिरसेल**.—कडू, तिखट, उष्ण, रक्तपित्तकारक, चक्षुष्य; आणि वात, कफ, कृमि, कुष्ठ यांचें नाशक आहे. **कर्डईचें तेल**.—त्रिदोषकारक, नेत्राला अहितकारक, कंडू उत्पन्न करणारें; आणि कृमि, तेज, बल, क्षयरोग, मल, पुष्टि यांचें नाशक आहे. **जवसाचें तेल**.—मधुर, बुळबुळीत, मद्यासारखा वास येणारें, तुरट; आणि वात, कफ, कास यांचें नाशक आहे. **धान्यांचें तेल**.—गहूं, जोंधळे, तांदूळ, जव, इत्यादि धान्यांचें तेल, चक्षुष्य आणि वात, कफ, पित्त, कंडू, कुष्ठ, यांचें नाशक आहे. **एरंडेल**—मधुर, उत्तम रसायन, पित्तकर, अग्निदीपक; आणि कृमि, वात, सर्वांगशूळ, ( सर्व अंग दुखणें ), कुष्ठ यांचें नाशक आहे. **करंजेल**.—उष्ण, तीक्ष्ण; आणि नेत्ररोग, वातरोग, कुष्ठ, कंडू, खाज यांचें नाशक असून लेप केला असतां नानाप्रकारचें त्वग्रोगनाशक आहे. **हिंगणाचें तेल**.—चिक्कण, मधुर, शीतळ, कांतिवर्धक, बलकर कफकर, आणि केशवर्धक आहे. **निंबोळ्यांचें तेल**.—अति उष्ण नसून कृमि, कुष्ठ, कफ,

यांचें नाशक आहे. **बेहड्यांचें तेल.**—मधुर, थंड, केशांना हितकर, जड; आणि पित्त, वात यांचें नाशक आहे. **शेवग्याचें तेल.**—तिखट, उष्ण, चिक्कण; आणि वात,कफ, त्वग्रोग, व्रण, कंडू, सूज यांचें नाशक आहे. **मालकांगोणीचें तेल.**—तिखट, कडू, उष्ण, पित्तकर, स्मृति-वर्धक, ज्ञानवर्धक, बुद्धिवर्धक, पथ्य; आणि वात, सर्वव्याधि, अनेक प्रकारचे त्वग्रोग यांचें नाशक आहे. **हिरड्यांचें तेल.**—शीतळ, तुरट, मधुर आणि तिखट आहे. **मोहरीचें तेल.**—तीक्ष्ण, थंड, केशांना हितकर; आणि वात,कंडू, त्वग्रोग यांचें नाशक आहे. **कोशिं-बतेल.**—सारक, कडू, आंबट, मधुर, बलकर,पथ्य, रुचिकर, पाचक; आणि कृमि, कुष्ठ, व्रण यांचें नाशक आहे. **कांटेधोत्र्याच्या बियांचें तेल.**—पाककाळीं तिखट, लेखन, रुचिकर, तुरट, किंचित् शीतळ आणि कफवातनाशक आहे. **कापुराचें तेल.**—तिखट, उष्ण, दांतांना दृढत्व देणारें, पित्तकर; आणि कफ, वात यांचें नाशक आहे. **कांकडी, वाळूक इत्यादिकांचें तेल.**—मधुर, जड, थंड, केशांना हितकर, कांतिकर आणि कफपित्तनाशक आहे. कोणतेंही तेल सहजवृत्त्या कधींही खाऊं नये; तें विषवत् मारक होतें. जेथें औषध ह्मणून तेल सेवन करण्यास सांगितलें असेल तेथें मात्र सेवन करावें. विषांत व तेलांत कांहीं अंतर नाहीं; तसेंच मेलेला व निजलला; रिणको व दास आणि मूर्ख व काष्ठ यांच्यांतही कांहीं अंतर नाहीं, ह्मणजे हे सारखेच आहेत.

## १५ शाल्यादिवर्ग.

९८२ **राजान्न.** ( रायभोग. )—चिक्कण, मधुर, लघु, अग्निदीपक, पथ्यकर, बलकर, कांतिवर्धक, वीर्यवर्धक; आणि त्रिदोषनाशक आहे. रायभोगसाळ तीन प्रकारची आहे. पांढरी, तांबडी व काळी. या गुणांमीं एकाहून एक अधिक आहेत. यांचे तांदूळ हिरवट, पांढरे व तांबडे असे होतात. हे आंध्र ( तेलंगण ) देशांत व कर्नाटकांत प्रसिद्ध आहेत.

९८३ **षष्ठिक.** ( साठे तांदूळ. )—हे पिंवळे व निळे असे दोन

प्रकारचे आहेत. त्यांत प्रथमचे रुचिकर, शीतळ, दोषहारक, बलकर, पथ्य, अग्निदीपक आणि वीर्यवृद्धिकर आहेत. दुसरे गुणांनीं थोडे कमी आहेत.

९८४ **कृष्णशालि.** ( काळी साळ. )—मधुर, पुष्टिकारक, स्वरकारक, कांतिवर्धक, बलकर, वीर्यवर्धक; आणि त्रिदोष, दाह यांची नाशक आहे.

९८५ **रक्तशालि.** ( तांबडी साळ. )—मधुर, लघु, चिक्कण, बलहारक, रुचिकर, अग्निदीपक, पथ्य; आणि पित्त, दाह, वातरक्त, मुखजाड्य, सर्वरोग यांची नाशक आहे.

९८६ **मुंडशालि.** ( निःशूकशाली. )—मधुर, आंबट, बलकर आणि त्रिदोषनाशक आहे.

९८७ **स्थूलशालि.** ( थोरसाळ. )—गोड, मधुर, थंड, पित्तशामक; आणि जीर्णज्वर, दाह, उदर यांची नाशक आहे.

९८८ **सूक्ष्मशालि.** ( बारीक साळ. )—मधुर, लघु, अग्निदीपक, पाचक, पथ्य, किंचित् वातहारक; आणि रक्तपित्त, दाह यांची नाशक आहे.

९८९ **सुगंधशालि.** ( सुगंध शाल. ) — मधुर, अति वृष्य, दुग्धवर्धक, गर्भाला स्थिर करणारी, किंचित् वातुळ, पुष्टिकर, किंचित् कफकर, बलकर; आणि पित्त, श्रम, रक्तदोष, अरुचि, दाह यांची नाशक आहे.

९९० **तिरीयशालि.** — मधुर, चिक्कण, शीतळ, रुचिकर, पथ्य; आणि दाह, पित्त, त्रिदोष, सर्वरोग यांची नाशक आहे.

९९१ **गौरशालि.** — मधुर, थंड, तुरट, चिक्कण, वृष्य, पुष्टिकर वीर्यवर्धक, अति रुचिकर, आल्हादकारक; आणि पित्त, कृमि, कफ, दाह, रक्तदोष, श्रम यांची नाशक आहे. मिश्रवर्णाची साळ — वातुळ आहे.

१९२ **धवलयावनाल.** ( पांढरे जोंधळे. )—मदकर, बलकर, वृष्य, रुचिकर, पथ्य; आणि त्रिदोष, मूळव्याध, गुल्म, व्रण यांचे नाशक आहेत.

१९३ **तुवरयावनाल.** ( तुर जोंधळे. ) —तुरट, उष्ण, सुजेला उत्पन्न करणार, ग्राही, वातशामक, दाहकारक आणि शोषकारक आहेत.

१९४ **शारदीयावनाल.** ( शाळू जोंधळे. ) —कफकर, बुळबुळीत, जड, थंड, मधुर, वृष्य, बलकर, पुष्टिकारक आणि दोषनाशक आहेत.

१९५ **गोधूम.** ( गहूं. )—चिक्कण, मधुर, पित्तकर, दाहकर, जड, कफकर, बलकर, रुचिकर, वीर्यवर्धक आणि वातनाशक आहेत. **बारीक गहूं.**—चिक्कण, जड, वृष्य, आंवेला उत्पन्न करणार, बलकर, मधुर, वीर्यवर्धक, पुष्टिकर आणि कफनाशक आहेत.

१९६ **यव.** ( जव. ) तुरट, मधुर, शीतळ; आणि प्रमेह, पित्त, कफ यांचे नाशक आहेत. यांचा मंड- बलकर, वृष्य, वीर्यवर्धक आणि पुष्टिकारक आहे.

१९७ **वेणुयव.** ( वेळूचें बीं. )—शीतळ, तुरट, मधुर, रूक्ष, पुष्टिकर, वीर्यवर्धक, बलकर; आणि प्रमेह, कृमि, कफ, विष, पित्त यांचें नाशक आहे.

१९८ **कृष्णमुद्ग.** ( काळे मूग. )—मधुर, लघु, अग्निदीपक, पथ्य, बलकर, वीर्यवर्धक, पुष्टिकर; आणि त्रिदोष, वात यांचे नाशक आहेत. **हरिन्मुद्ग** ( हिरवे मूग. )—तुरट, आंबट, मधुर, शीतल लघु, अग्निदीपक; आणि कफ, पित्त, रक्तदोष, मूत्ररोग यांचे नाशक आहेत. **धूसरमुद्ग.** ( पिंवळे मूग. )—रसवीर्यादिकांत वरच्याप्रमाणें असून तुरट, मधुर, रुचिकर; आणि पित्त, वात, मलबद्धता यांस करणारे आहेत. **मुद्गयूष.** ( मुगांचें कढण. )—लघु, रक्तवर्धक; आणि पित्तज्वर, संताप, अरुचि यांचें नाशक आहे. हें सैंधवाशीं युक्त असें घेतलें असतां सर्व रोगनाशक आहे.

१९९ **माष.** ( उडीद. ) चिक्कण, मलकारक, शोषक, कफकर,

उष्णवीर्य, रक्तपित्तकारक, जड, बलकर, रुचिकर, मधुर, सुखकारक आणि वातनाशक आहेत. **राजमाष.** ( निळे उडीद. )—रुचिकर, वातकारक, बलकर; आणि कफपित्तनाशक आहेत.

१००० **चणक.** ( हरबरे. )—मधुर, रूक्ष, वातकारक, पित्तकर, अग्निदीपक, स्वरकारक, बलकर, रुचिकर, पोट फुगविणारे आणि प्रमेह-नाशक आहेत.

१००१ **मकुष्ठ.** ( मठ. )—तुरट, मधुर, पथ्य, रुचिकर; आणि रक्तपित्त, ज्वर, दाह व सर्व रोग यांचे नाशक आहेत.

१००२ **मसूर.** ( मसूर. )—मधुर, शीतळ, ग्राही, वातनाशक, लघु; आणि कफ, पित्त, मूत्रकृच्छ्र यांची नाशक आहे.

१००३ **कलाय.** ( वाटाणे. )—वातुळ, रुचिकर, पुष्टिकारक शीतळ, तुरट, आंवेला उत्पन्न करणारे; आणि पित्त, दाह, कफ यांचे नाशक आहेत.

१००४ **लांका.** ( लांक. )—रुचिकर, थंड, मदकर, वातकारक, जड आणि पित्तनाशक आहेत.

१००५ **आढकी.** ( तुरी. ) तुरट, मधुर, किंचित् वातकारक, रुचि-कर, जड, ग्राही आणि कफपित्तनाशक आहेत. पांढऱ्या तुरी.—हित-कर, रुचिकर, बलकारक; आणि त्रिदोष, पित्त, दाह यांच्या नाशक आहेत. काळ्या तुरी.—अग्निदीपक, बलकर; आणि पित्त, दाह यांच्या नाशक आहेत.

१००६ **कुलित्थ.**—तुरट, उष्ण, रूक्ष; आणि वात, कफ यांचे नाशक आहेत.

१००७ **क्षव.** ( चवळ्या. )—तुरट, मधुर, शीतळ, वृष्य, रुचि-कर, वातुळ, पोट फुगविणाऱ्या आणि कफपित्तनाशक आहेत.

१००८ **मधुरनिष्पाव.** ( गोड पावटे. )—रुचिकर, मधुर, किंचित् तुरट, शीतल, बलकर, पोट फुगविणारे, जड आणि पुष्टिकर आहेत. कडू पावटे—कडू, तिखट, रक्तदोषकारक, जड, वातूळ, कफकर, रूक्ष, तुरट आणि विषदोषनाशक आहेत.

१००९ **तिल.** ( तीळ. )—चिक्कण, कांतिकर, बलकर, अग्निदीपक, दुग्धवर्धक, जड, उष्ण, पित्तकारक, किंचित् मूत्रकारक, केशांना हितकर, व्रणाला पथ्यकर, ग्राही, मधुर, तुरट, पाककाळीं कडू, तिखट आणि वातनाशक आहेत. काळे तीळ गुणांनीं अधिक आहेत. पांढरे गुणांनीं कमी आहेत. बाकीचे तीळ हलके आहेत. **पलल.** ( तिळाचें चूर्ण. )—मधुर, रुचिकर, पित्तकर, रक्तवर्धक, बलकर आणि पुष्टिदायक आहे. तिळाची पेंड.—तिखट, मदकर; आणि कफ, वात, प्रमेह यांची नाशक आहे.

१०१० **अतसी.** ( अळशी, जवस. )—मद्यासारखा वास येणारी, मधुर, बलकारक, किंचित् कफकर, वातकारक; आणि पित्त, पाठीचा शूल यांची नाशक आहे.

१०११ **आसुरी.** ( मोहरी. )—तिखट, कडू, उष्ण, दाहकर, पित्तकर; आणि वात, पाणथरी, शूल, कफ, गुल्म, कृमि, व्रण यांची नाशक आहे

१०१२ **राजसर्षप.** ( काळी मोहरी. )—कडू, तिखट, उष्ण, पित्तकर, दाहकारक; आणि वात, शूळ, गुल्म, कंडू, व्रण, यांची नाशक आहे.

१०१३ **सिद्धार्थ.** ( पांढरे शिरस. )—तिखट, कडू, उष्ण, रुचिकर; आणि वातरक्त, ग्रहबाधा, त्वग्रोग, विष, भूतबाधा, व्रण यांचे नाशक आहेत.

१०१४ **श्यामाक.** ( सांवे. )—मधुर, चिक्कण, तुरट, लघु, शीतळ, वातकारक, ग्राही; आणि कफ, पित्त, विष यांचे नाशक आहेत.

१०१५ **कोद्रव.** ( कोद्रू, हरीक. )—मधुर, कडू, व्रणास पथ्यकर, रूक्ष, मोहकारक, वातुळ, जड आणि कफपित्तनाशक आहेत.

१०१६ **वरक.** ( वरई. )—मधुर, रूक्ष, तुरट आणि वातपित्तकारक आहे.

१०१७ **कंगुनी.** ( कांग धान्य, राळा. ) मधुर, रुचिकर, तुरट, गोड, शीतळ, वातकर, रूक्ष, भग्नास्थीला सांधणारें; आणि पित्त,

दाह यांचे नाशक आहे.

१०१८ **नीवार.** (देवभात, पाकड, रानसाळी.)—मधुर, चिक्कण, पवित्र, पथ्यकर आणि लघु आहे.

१०१९ **बहुदल.** (नाचणी.)—कडू, मधुर, तुरट, शीतळ, बलकर आणि रक्तपित्तनाशक आहे.

१०२० **कुरी.** (कुरी धान्य.)—मधुर, बलकर आणि घोड्यांस पुष्टिकारक आहे.

१०२१ **लाजा.** (लाह्या.)—साळी भाजून करितात त्यांस लाह्या ह्मणतात आणि जव वगैरे भाजून करितात त्यांस धाना असें ह्मणतात. या तृप्तिकारक आणि पित्तशामक आहेत.

१०२२ **अन्न.**—गहू, जोंधळे इत्यादींचें किंचित् उष्ण आणि अग्निदीपक आहे.

१०२३ **आकुला.** (ओंब्या.)—रसभरित ओले गहूं भाजून घ्यावे त्यांस ओंब्या असें ह्मणतात. त्या जड, वृष्य, मधुर आणि बलकारक आहेत.

१०२४ **पृथुक.** (पोहे.)—साळी अर्धवट शिजवून करितात ते. हे जिरण्यास कठीण, चिक्कण, हृद्य आणि मंदपणा देणारे आहेत.

१०२५ **दुग्धबीजा.** (हुरडा.)—मधुर, जिरण्यास कठीण, वीर्यवर्धक आणि पुष्टिकारक आहे.

१०२६ **तप्तचणक.** (फुटाणे.)—कफहारक, तृषाशामक, रुचिकर, पित्तकर, किंचित् वातूळ, सुखकारक, रूक्ष, हृद्य; आणि ह्मातारे, तरुण व बालक यांस हितकर आहेत.

१०२७ **घुगऱ्या.**—मलावष्टंभक आणि पोट फुगविणाऱ्या आहेत.

१०२८ **पक्वहरितलून.** (पक्व झालेलें हिरवें धान्य.)—गुणकारक आहे. वाळलेलें धान्य—निःसार, रूक्ष आणि व्रणनाशक आहे. नवें, जुनें धान्य—एक वर्षाच्या आंतील धान्य नेत्रांस अहितकर आणि

लघु आहे. तीन वर्षे राहिलेलें धान्य निर्बळी आहे. हरभरे, जव, गहू, तीळ, उडीद हे नवे हितकर आहेत. जुने असल्यास नीरस, रूक्ष, दुर्जर आणि हीनबळ आहेत. पेरलेलें धान्य—उत्तम आहे. उपटून लावलेलें धान्य मध्यम आहे आणि न पेरलेलें धान्य कनिष्ठ, निःसार आणि दोषकारक आहे. भाजलेल्या जमिनींत उत्पन्न झालेल्या साळी यांस **छिन्नभवा** ह्मणतात. या विण्मूत्रबंधक आहेत.

१०२९ **उदकभेदभूमिभेदधान्यगुणाः**—खारट जमिनींतील धान्य सर्वरोगनाशक आहे. गोड व शुभ्र पाण्यानें झालेलें धान्य सर्व-रोगनाशक आहे. चिक्कण जमीनींतील धान्य ओज आणि बल यांचें नाशक आहे. वाळूच्या जमीनींतील धान्य—बलपुष्टिनाशक आहे.

१०३० **धान्यविशेषगुणाः**—धान्यांत साठ तांदूळ व राय-भोग तांदूळ हे श्रेष्ठ आहेत. मांसांत शेळीचें, तित्तिरि व लावापक्षी यांचें श्रेष्ठ आहे. पाणी हें काळ्या जमीनींतील श्रेष्ठ आहे. दूध आणि तूप हीं गाईचीं व शेळीचीं श्रेष्ठ आहेत.

१०३१ **सज्जक.** ( सजगुरे, बाजरी. )—पाककाळीं जड, अवृष्य, लघु, शीतळ, सुजेला उत्पन्न करणारी, रूक्ष, तुरट, मधुर, वाताला कोपविणारी आणि रक्तपित्तनाशक आहे.

